ऐतिहासिक कादंबरी नं. १०.

# कालकूट.



रचणार

## हरि नारायण आपटे.



आवृत्ति १ री.



सोल एजंटः—केशव भिकाजी ढवळे,
गिरगांव, मुंबई. ४.



सन १९३१ किंमत सवा [redacted] रुपया.

# प्रस्तावना.

---

मराठी वाङ्मयातील कादंबरीकारांत कै. हरिभाऊ आपट्यांचें पहिलें स्थान अढळ होऊन राहण्यास त्यांच्या कादंबऱ्यांतील उत्कृष्ट गुण जितके कारणीभूत झाले आहेत, तितकेंच सामाजिक व ऐतिहासिक या दोन्ही प्रकारच्या कादंबऱ्या सारख्याच कुशलतेनें लिहिण्याचें सव्यसाचित्व हेंहि कारण आहे. पाश्चात्य देशांतील प्रसिद्ध कादंबरीकार डिकन्स किंवा थॅकरे यांच्या लेखणींतून कांहीं सुंदर ऐतिहासिक कादंबऱ्या उतरल्या असतांहि त्यांची कीर्ति विशेषेंकरून सामाजिक कादंबरीकार या नात्यानेंच आहे. उलटपक्षीं स्कॉट, लिटन आणि ड्यूमास यांचें लेखनकौशल्य सर्वस्वी कादंबऱ्यांवरच खर्च झालें. आधुनिक इंग्लिश कादंबरीकारांतून हा एकांगीपणा तर विशेषच दिसून येतो. रायडर हगार्ड. हॉल केन, कॉरेली इत्यादि कादंबरीकार केवळ सामाजिकच आहेत. या दृष्टीनें हरिभाऊंच्या कादंबऱ्यांकडे पाहिलें तर त्यांचें लेखनकौशल्य दोन्हीं प्रकारच्या कादंबऱ्यांवर सारखेंच व तितक्याच सुलभतेनें वाटलेलें पाहून आश्चर्य वाटल्याशिवाय रहात नाहीं. 'पण लक्ष्यांत कोण घेतो' आणि 'उषःकाल' या दोन्ही कादंबऱ्या आपापल्यापरी इतक्या उत्कृष्ट आहेत कीं, त्यामध्यें पहिलें स्थान कोणास द्यावें हें ठरविणें अशक्य आहे इतकेंच नव्हे, तर एका हिंदु अबलेच्या दुःखमय जीविताचें करुणरसपूर्ण चित्र इतक्या यथातथ्यत्वानें रेखाटणाऱ्या मृदु लेखणींतूनच 'उषःकाला'-सारखी वीररसपूर्ण आणि देशाभिमानाची ज्योत प्रज्वलित करणारी कादंबरी लिहिली जावी, हें पाहून कादंबरीकाराच्या कल्पनेच्या अनेकविधतेनें आणि त्यांच्या लेखणीच्या सामर्थ्यानें मन चकित होतें. हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांनीं समाजाच्या मनास जितका चटका लावला आहे, तितकाच चटका त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांनींही लावला आहे. किंबहुना कालांतरानें समाजस्थिति पालटल्यावर त्यांच्या सामाजिक कादंबऱ्या तितक्या सद्यःस्थितिनिदर्शक न राहिल्यामुळें त्यांचें चित्ताकर्षकत्व कदाचित् कमी होण्याचा संभव आहे; पण, त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांची गोडी व महत्त्व मात्र, इतिहास अस्तित्वांत आहे तोंपर्यंत केव्हांही कमी होणार नाहीं.

हरिभाऊंच्या ऐतिहासिक कादंबऱ्या ऐतिहासिक सत्यास धरून नाहींत असा त्यांजवर एक आरोप घेण्यांत येतो. पण हा आक्षेप घेतांना प्रथम हें लक्ष्यांत

ठेविलें पाहिजे कीं ज्याकाळी हरिभाऊंनीं या कादंबऱ्या लिहिल्या त्या काळी इतिहाससंशोधनाच्या कार्याचा नुकता कोठें आरंभ झालेला असून, आज जी इतिहाससाधनें व कागदपत्र उपलब्ध झाले आहेत त्यांचा त्याकाळी मागमूससुद्धां नव्हता. म्हणून आज जी ऐतिहासिक माहिती संशोधित झाली आहे, तिच्या सहाय्यानें २५।३० वर्षांपूर्वी हरिभाऊंनीं लिहिलेल्या कादंबऱ्यांचें परिक्षण करूं पाहणें अन्यायाचें आहे. उलट त्या वेळच्या अपुऱ्या ऐतिहासिक माहितीच्या पायावर हरिभाऊंनीं आपल्या कल्पनेची जी इमारत उभारली आहे ती पाहून त्यांच्या विलक्षण कल्पनाशक्तीचें कौतुकच वाटतें. त्यांच्या या कादंबऱ्यांतून लिहिलेल्या काहीं गोष्टी नव्या ऐतिहासिक शोधानी जशा काल्पनिक ठरल्या, तशा 'उषःकाला 'न त्यांनीं वर्णिलेल्या मारुतीच्या देवळांतील कटाप्रमाणें कांही काल्पनिक गोष्टी त्याच शोधांनी पुढें खऱ्याहि ठरल्या, हेंही तितकेंच आश्चर्य-कारक नाही काय ?

पण ऐतिहासिक कादंबरीची परिक्षा खऱ्या इतिहासाच्या कसावर घासून करणें हेंच मुळी चुकीचें आहे. इतिहासांतील कांहीं ठळक व महत्त्वाच्या गोष्टींच्या संबंधांत सत्य पाळलें म्हणजे इतर बाबतींत कादंबरीकार स्वतंत्र असला पाहिजे हें लक्षात ठेवणे जरूर आहे. किंबहुना आपल्या कल्पनाशक्तीचा अशा कादंबरी-कारानें उपयोग न केल्यास ती कादंबरी न होतां तो एक इतिहासाचाच ग्रंथ होईल. इतिहासांत प्रत्येक कार्यकारणभाव मनोरंजक किंवा अद्भुत असेलच असें नाहीं; पण तेंच कार्य कादंबरीकारास वर्णन करावयाचें असल्यास कार्यकारणभावांतील मनोरंजकतेची ही उणीव त्याला कल्पनाशक्तीच्या साह्यानेंच भरून काढली पाहिजे; मात्र त्यामुळें ऐतिहासिक सत्य विकृत किंवा विपर्यस्त होत नाही एवढी काळजी घेतली म्हणजे झालें. या दृष्टीनें पाहिलें तर हरिभाऊं-च्या हातून अशी चूक त्याच्या कादंबऱ्यात झालेली आपणास कोठेंहि आढळणार नाही. ऐतिहासिक कादंबऱ्या, नाटकें किवा काव्यें यांजकडे कोणत्या दृष्टीनें पाहिलें पाहिजे याजबद्दल ग्लॅडस्टन् यांचे पुढील उद्गार विचार करण्यासारखे आहेत. शिलरच्या " मराया स्टुअर्ट " बद्दल लिहितांना ग्लॅडस्टन् म्हणतात, " History should not be violated without a reason. It may be set aside to fill up poetical verisimiltude. If history assigns a cause, inadequate to its effect, or an effet in-adequate to its cause, poetry may supply the deficiency,

for the sake of an impressive whole. But it is too much to overset a narrative and call it a historical play."
इतिहास आणि काव्य यांच्या मिश्रणाची ही मर्यादा हरिभाऊंच्या इतक्या ऐतिहासिक कादंबऱ्यांत त्यांजकडून क्वचित्च उल्लंघिली गेली आहे असें आपणांस आढळून येईल व ज्या थोड्या ठिकाणी उल्लंघिली गेली आहे तेथें तो दोष हरिभाऊंचा नसून ज्या काव्यावरून किंवा ग्रंथावरून त्यांनीं तें कथानक घेतलें आहे त्या मूळ काव्याचा व ग्रंथाचा आहे.

प्रस्तुत " कालकूट " या कादंबरीचीहि गोष्ट अशीच होईल असें वाटतें. रजपुतांच्या इतिहाससंबंधी ही त्यांची दुसरी कादंबरी असून दिल्लीच्या तक्तावरून हिंदु राजसत्तेचें कायमचें उच्चाटन होऊन भरतखंडांत मुसलमानी सत्तेचा पाया कायमचा रोंवला गेला त्यावेळचें हे कथानक आहे. हरिभाऊंच्या सर्व ऐतिहासिक कादंबऱ्या वाचल्या असतां त्यांत दोन वर्ग दिसून येतात. पहिला वर्ग म्हणजे मुसलमानी सत्तेशीं झगडून, गमावलेलें स्वातंत्र्य मिळविण्याकरितां रजपुतांनी आणि मराठ्यांनी जे निकराचे व धाडसाचे प्रयत्न केले त्याचें वर्णन करून आपल्या गतेतिहासाबद्दल वाचकास अभिमान उत्पन्न करणाऱ्या कादंबऱ्यांचा. यांत ' उषःकाल, ' केवळ स्वराज्यासाठी ' इत्यादि मराठ्यांच्या इतिहासावरील, आणि ' रूपनगरची राजकन्या ' या कादंबऱ्यांचा समावेश होईल; आणि दुसरा वर्ग म्हणजे आपलें पहिलें स्वातंत्र्य जाऊन पारतंत्र्याची शृंखला आपल्या पायांत का पडली याची कारणें दाखवून त्या दोषाची समाजास जाणीव करून देणाऱ्या कादंबऱ्यांचा. ' वज्राघात ' आणि प्रस्तुतची ' कालकूट ' या दोन कादंबऱ्या या प्रकारच्या म्हणतां येतील. दक्षिणेतील बलाढ्य हिंदु राजसत्तेचा पाडाव कसा झाला व त्याला कोणते दोष कारण झाले त्याचें चित्र ' वज्राघात ' मध्यें काढलें असून, उत्तर हिंदुस्थानातील हिंदु राजसत्तेच्या नाशाच्या कारणांची मीमांसा ' कालकूटांत ' येणार होती असें स्पष्ट दिसतें. कारण या कादंबरीचा काल दिल्लीचा राजा अनंगपाल याच्या वेळचा घेतला असून, त्यावेळी शहाबुद्दीन किंवा महंमद घोरी हिंदुस्थान जिंकण्याच्या प्रयत्नांत होता असें दाखविलें आहे; आणि पृथ्वीराजाचा पराभव होऊन महंमद घोरीनें मुसलमानांचा पाय या देशांत रोंवला तेथपर्यंत् या कादंबरीच्या कथानकाची मर्यादा असावी असें दिसतें. कथानकाच्या क्रियेस नुकताच प्रारंभ झाला असून कादंबरी तेथेंच अपूर्ण राहिल्यामुळें तिच्याबद्दल निश्चयात्मक असें अनुमान करणें अवघड

असलें तरी, अनगपाल, त्याच दोन नातू, अजमीरचा युवराज पृथ्वीराज, व कनोजचा युवराज जयचंद, पृथ्वीराजाचा मित्र चांद्भाट या नांवांवरून कथानक इतिहासांतल्या कोणत्या प्रसंगावर उभारलेलें आहे व त्याची परिसमाप्ति कशात झाली असती हें सांगणें अवघड नाही. अनंगपाल आणि पृथ्वीराज व जयचंद यांचा आजानातवाचा संबंध दाखविला असल्यामुळें कथानकातील गोष्ट हरिभाऊंनी चांद्भाटविरचित रास या काव्यावरून घेतली असावी असें दिसतें; आणि तसें असल तर पुढील कथानक पृथ्वीराज–संयोगितेच्या कथेमुळें फारच अद्भुतरम्य, व शेवटीं तितकेंच करुणरसात्मक वठलें असतें यांत संशय नाहीं. पृथ्वीराज व संयोगिता यांची कथा ही हिंदुस्थानच्या इतिहासांतील एक अत्यंत अद्भुत व लोकप्रिय कथा असून, मुळांतच इतकी सुंदर पण शोकपर्यवसायी असलेली गोष्ट हरिभाऊंसारख्या प्रतिभाशाली कादंबरीकाराच्या हातून किती उत्कृष्ट व परिणामकारक वठली असती हें केवळ कल्पनेनेंच जाणलें पाहिजे !

काव्याच्या फाजील मिश्रणानें इतिहासाचा सत्यापलाप झाल्याचीं जीं कित्येक उदाहरणें आहेत म्हणून वर म्हटलें त्यांपैकी प्रस्तुत कादंबरी हें एक होण्यासारखें आहे. पण येथेंहि त्याचा दोष कादंबरीकारावर येत नसून तो चाद कवीच्या ‘ रास ’ या काव्याचा आहे. कारण त्या काव्यांतील पुष्कळशा गोष्टी इतिहासदृष्ट्या चुकीच्या असल्याचें अलीकडे सिद्ध झालें आहे. अनंगपाळ दिल्लीवर राज्य करीत असल्याचा काळ १०८५ इ. स. चा असून घोरीच्या हिंदुस्थानावरील स्वाऱ्या बाराव्या शतकाच्या अखेरीस झाल्या. तसेंच पृथ्वीराज हा अनंपाळाचा नातू असल्याबद्दलचा चांदाचा उल्लेखही चुकीचा असल्याचें सिद्ध झालें आहे. शिवाय साध्या तर्कशास्त्रानें विचार केला तरी पृथ्वीराज व जयचंद हे समवयस्क होते असें मानिलें तर जयचंदाच्या तरुण मुलीचें आपल्या बापाच्या वयाच्या पृथ्वीराजावर प्रेम जडणें असंभवनीय वाटतें. तसेंच जयपालानें घोरीस पृथ्वीराजाचा नाश करण्यासाठी निमंत्रण केलें या गोष्टीसहि कांहीं आधार नाहीं असें रा. रा. चिं. वि. वैद्यांच्या “ मध्ययुगीन भारताच्या ” इंग्रजी ग्रंथाच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या तिसऱ्या विभागांत म्हटलें आहे. त्यांतील हकीकत वाचतां चांदकवीच्या कथेपैकीं बराचसा भाग काल्पनिक म्हणून सोडून देणें भाग पडेल. संयोगितेचें स्वयंवर व पृथ्वीराजाकडून झालेलें तिचें हरण या गोष्टीहि अतिशयोक्तीच्या असल्या पाहिजेत. संयोगिता ही पृथ्वीराजाची एक राणी होती एवढाच त्यांतील भाग खरा असावा असेंहि वैद्यांचें मत आहे. या सर्व गोष्टी पाहिल्या असतां

चांदकवीच्या अद्भुत काव्याचे व त्यामुळें त्यावरून घेतलेल्या कथानकाचे ऐतिसिक महत्त्व अर्थात्‌च कमी होतें; पण या कादंबरीचा विचार करावयाचा तो मागाहून उपलब्ध झालेल्या खऱ्या इतिहासाशी तिच्या कथानकाची तुलना करून करावयाचा नसून कादंबरी लिहितेवेळी कर्त्यासमोर असलेल्या ग्रंथांतील मूळ कथानकावरूनच करणें अधिक युक्त होईल; आणि त्यावरून पाहतां मूळ कथेंतील अद्भुतता व बोधप्रदता प्रस्तुत कादंबरींत नुसती कायमच राहिली असती असें नव्हे, तर ती कितीतरी अधिक वाढली असती असे आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या अपूर्ण भागावरूनहि म्हणावयास मुळींच हरकत नाही. पृथ्वीराजाचा जयचंदाच्या कन्येशी विवाह, त्याचा शहाबुद्दीन घोरीनें केलेला पराभव, त्यावेळीं त्याला साह्य करण्याबद्दल जयचंदानें दाखविलेलें औदासिन्य इतक्या गोष्टी इतिहासप्रसिद्ध असतां ग्लॅडस्टननीं म्हटल्याप्रमाणें काव्यात्मक सत्याभास (poetical verisimilitude) साधण्यासाठीं इतिहास तेवढ्यापुरता बाजूस सारून, ऐतिहासिक गोष्टींचा कार्यकारणभाव अधिक अद्भुत, बोधप्रद, व थरारून टाकणारा असा व्हावा म्हणून त्याजवर कल्पनेचा पेहेराव चढविण्यास निरंकुश कवीला कां हरकत घ्यावी ? मात्र तो इतिहास नव्हे, काव्य आहे एवढें लक्षांत ठेविलें म्हणजे झालें.

परंतु तें कसेंहि असलें तरी ही अद्भुत कथा रंगविण्यांत हरिभाऊंचा हेतु केवळ पृथ्वीराज-संयोगितेची प्रेमकहाणी सांगण्याचा नव्हता हें मात्र प्रसिद्ध झालेल्या भागावरूनहि सांगतां येईल. देशाचें स्वातंत्र्य कां गेलें, देशात इतके शूर योद्धे व बलाढ्य राजे असतां, देश परकीयांच्या सामर्थ्यापुढें हतबल होऊन त्यांतलि अनेक राज्ये पारतंत्र्याच्या खोल गर्तेत एकामागून एक भराभर कशीं पडलीं हेंच वाचकांच्या मनावर मुख्यतः ठसलें जावें, हाच ही कादंबरी लिहिण्यांत हरिभाऊंचा हेतु असला पाहिजे आणि कादंबरीचें ' कालकूट ' हें नांवहि हेंच दर्शविते. ज्या कालकूट विषप्राशनानें हिंदुस्थानची स्वातंत्र्यदेवता मृत झाली, तें विष म्हणजे एकमेकांचा मत्सर व द्वेष हें होय; आणि हें कसें हे या पुस्तकांतील १६ व्या प्रकरणांत खुद्द शहाबुद्दीन घोरीच्याच तोंडून हरिभाऊंनीं वदविलें आहे. ही कादंबरी अपुरी असली तरी, कथेंत ज्याप्रमाणें आरंभीं एक मूळपद घेऊन त्याचा पुढें आख्यानांत विस्तार होतो, त्याप्रमाणें या कादंबरीचें मूळपद व उपदेशाचा सारांश, शहाबुद्दीन घोरीच्या या भाषणांत आला असल्यानें, ती पूर्ण झाली असती तरी तिचें मर्म काय असतें हें समजण्यासाठीं त्याचा येथें विस्तृत उतारा घेणें अयुक्त होणार नाहीं. तो वाचला म्हणजे त्यांतच सर्व कादंबरीचें सार

आलें असें म्हणावयास हरकत नाही. शहाबुद्दीन हिंदु लोकांबद्दल म्हणतो, "कोणत्या तरी एका राज्यांत आपला पाय चांगला शिरकला पाहिजे. तेवढा शिरकला म्हणजे आपल्यासारखे दुसरे केव्हां होतील या बुद्धीनें हेच लोक मदत करूं लागतील. मी ज्या त्यांच्या स्वभावाच्या गुप्त बातम्या आणल्या आहेत, त्या सगळ्या एक केल्या म्हणजे परस्परविरोधी भाग कितीहि जरी काढून टाकले तरी एक अगदीं सर्व बाजूंनीं सारखा असा भाग आहे तो हा कीं, एक बळी गेला, की तो बाकीच्यांना आपल्यासारखे बळी देण्यासाठीं धडपड करायला लागतो. तसा एक मोठासा राजा आपल्याला गिळायला सांपडला पाहिजे. तो गिळला तर त्याला सोडवावयाला कांही कोणी धांवायचे नाहीत. तो आपल्यांतून गेला म्हणून नाद सोडतील किंबहुना त्याचा द्वेष करूं लागतील. सुटण्यासाठी त्यानें धडपड केली तर ती दाबून टाकतील, असा कांहीं या लोकांचा प्रकार आहे. म्हणून तर मी तरी एवढी धडपड करितों आहें, कीं एकदां एक प्रांत मिळाला की तो आपल्याला पचला. मग तो राजा आपला अंकित. तो इतरांना आपल्या जाळ्यांत आणून टाकणार ! फितुरी करायला या लोकांसारखे लोक नाहींत ! "

शहाबुद्दीनच्या तोंडून वदविलेला हिंदी लोकाचा हा मोठा दोष मराठ्याच्या इतिहासानेहि पुढें तितक्याच खेदकारक रीतीनें सिद्ध झाला नाही काय ? हिंदुस्थानच्या पारतंत्र्याचें हरिभाऊंनीं केलेलें निदान तें हेंच आणि या कादंबरींतलें **'कालकूट'** तरी हेंच !

हरिभाऊंच्या या अपूर्ण कादंबरीचें हृद्गत माझ्या दृष्टीनें जें वाटलें तें वाचकांपुढें ठेविलें आहे. हरिभाऊंच्या कादंबरीस आणि प्रस्तावना ही कल्पनाच विलग आहे. पण एकादें बालक स्वतःच्या पायांवर उभें राहूं लागण्यापूर्वींच मातृविहीन झालें म्हणजे, तें कितीही मोठें असलें तरी, त्याला आरंभीं कडेवर घ्यावयास एकाद्या सामान्य मनुष्याचीहि जरूरी लागते व तोच प्रकार दुर्दैवानें या कादंबरीच्या संबंधांत झाला आहे. हरिभाऊंची ही सेवा करण्याची संधि मला देऊन **आर्यभूषण** छापखान्याच्या चालकांनीं माझा जो गौरव केला आहे त्याबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहें. तथापि ही बहुमानाची कामगिरी यथाशक्ति पार पाडतांना, माझ्यासारख्या खद्योताला प्रस्तावनाद्वारें चमकण्याचा योग हरिभाऊंसारख्या सूर्याचा अस्त झाल्यामुळेंच येत आहे हा विचार मनांत येऊन, चित्ताला खेद वाटल्याशिवाय मात्र रहात नाहीं.

सातारा, ७ मार्च १९२६. **वाग्भट नारायण देशपांडे.**

## प्रकाशकाचे दोन शब्द.

## आवृत्ति पहिली.

हीं कादंबरी **करमणुकींत** सन १९०९–१० मध्यें प्रसिद्ध झाली, तरी आज-पर्यंत प्रसिद्ध करणेची राहिली याचें कारण ती अपूर्ण आहे हें होय. कै. हरिभाऊ आपटे यांचे सर्व लेख छापून निघावेत व त्यांचें समग्र वाङ्मय लोकांचे वाचनांत यावें म्हणून आहे त्या स्थितींत प्रस्तुतची कादंबरी हरिभाऊंच्या इतर अपूर्ण कादंबऱ्याप्रमाणें छापून आज प्रसिद्ध करीत आहें.

या कादंबरीस प्रस्तावना लिहिण्याबद्दल रा. रा. वाग्भट नारायण देशपांडे यांस विनंति करण्याचे कारण ते कै. हरिभाऊंच्या वाङ्मयाचे चहाते व विद्यार्थी आहेत. रा. देशपांडे यांनी माझ्या विनंतीस मान देऊन प्रस्तावना लिहून दिली याबद्दल त्यांचा मी आभारी आहें.

पुणें, आर्यभूषण प्रेस,
ता. १५ मार्च १९२६.

**प्रकाशक.**

## आवृत्ति दुसरी.

कैलासवासी हरिभाऊ आपटे यांचें सर्व वाङ्मय वाचकांस उपलब्ध व्हावें या हेतूनें प्रस्तुतची अपुरी कादंबरी हरिभाऊ यांच्या इतर अपूर्ण कादंबऱ्याप्रमाणें सन १९२६ साली मार्च महिन्यांत छापून प्रसिद्ध केली होती. सदर साली मे महिन्यांत **आर्यभूषण** छापखाना किबेवाड्यांत असतांना सदर वाड्यास आग लागून **आर्यभूषण** छापखान्याच्या मालकीच्या पुऱ्या अपुऱ्या अशा सर्व पुस्तकांचा संचय अग्निसात् झाला.

प्रस्तुतची कादंबरी नुकतीच छापून तेव्हां प्रसिद्ध झाली असल्यामुळें तिच्या प्रती निरनिराळ्या बुकसेलर्सकडे गेलेल्या होत्या. त्यामुळें अग्निप्रलयानंतर हरिभाऊ

यांचीं पुस्तकें छापण्यास क्रमाक्रमानें हातीं घेण्याचे वेळी साहजिकपणें ही कादंबरी क्रमांत सर्वांत खालीं ठेवावी लागली. कै० हरिभाऊ आपटे यांनी एक मृत्युपत्र करून आपली वाङ्मयसंपत्ति **आर्यभूषण** छापखान्यामार्फत सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीच्या स्वाधीन मालक या नात्यानें केली असल्यामुळें कै० हरिभाऊ यांचीं पुस्तकें महाराष्ट्र वाचकांपुढें विक्रीकरितां छापून बाजारात ठेवण्याची जबाबदारी सदर संस्थेवर येऊन पडलेली होती. हरिभाऊ यांच्या पुस्तकांपैकीं कोणचीं पुस्तकें बाजारांत आहेत अगर कोणचीं नाहीत याबद्दल पूर्ण चौकशी करून क्रमाक्रमानें बहुतेक सर्व कादंबऱ्या आज तारखेपर्यंत पुनर्मुद्रित करण्यांत आलेल्या आहेत. हरिभाऊ यांच्या कादंबऱ्यांबद्दल प्रकाशकानें अभिप्राय देणें म्हणजे " लहान तोंडीं मोठा घास घेणें " यासारखें होणार आहे. या कादंबरीच्या पहिल्या आवृत्तीच्या प्रकाशनाचे वेळीं सातारचे वकील रा. रा. वाग्भटराव देशपांडे यांचेकडून प्रस्तावना लिहून घेऊन ती पहिल्या आवृत्तीस जोडलेली होती. ती प्रस्तावना, कै. हरिभाऊ यांचें चारित्र व चित्र हीं आवृत्तीत समाविष्ट केलेलीं आहेत. महाराष्ट्र वाचकांस ही कादंबरी हरिभाऊंच्या इतर कादंबऱ्यांप्रमाणें आश्रयास पात्र आहे असें दिसून येईल याबद्दल खात्री आहे.

आर्यभूषण छापखाना कचेरी, पुणे.
ता. १९।२।१९३१ इ.

प्रकाशक.

---

# हरि नारायण आपटे.



जन्म–ता. ८।३।१८६४.] [मृत्यु–ता. ३।३।१९१९.

# हरि नारायण आपटे यांचें
# अल्प चरित्र

### वि. जी. नाडकर्णी यांनीं लिहिलेलें

दृष्टीसमोर असलेल्या माणसाचें अंतरंग शोधणारी, ओष्ठ संभाषणासाठीं आतूर, मुखावर स्मिताची छटा, उंच आणि विस्तीर्ण भालप्रदेश, वाटोळा चेहरा, आणि साधारण स्थूल—फार उंच नव्हे, व ठेंगूही नव्हे, अशी शरीरयष्टि, अशी त्यांची बाह्यरूपाकृति होती. प्रिय कन्येचा वियोग झाला त्या दिवसापासून त्यांच्या चर्येवरील स्मिताची छटा मावळली, आणि त्या ठिकाणीं विरक्तीनें पसरलेली गंभीरपणाची छाया दृग्गोचर होऊं लागली. ह्या दारुण कालाघाताचा त्यांच्या देहावरही परिणाम झाला. जरा जोरानें त्यांच्या देहावर आपला पगडा बसवूं लागली, आणि पन्नाशीच्या घरांत पोंचण्यापूर्वींच ते पंचावन्न साठ वर्षांच्या वयाचे असे वृद्ध दिसूं लागले. यानंतर सातच वर्षें त्यांनीं इहलोकांत वास्तव्य केलें. १८६४ सालच्या मार्च महिन्याच्या आठव्या तारखेस त्यांच्या इहलोकवासास प्रारंभ झाला आणि १९१९ सालच्या मार्च महिन्याच्या तिसऱ्या तारखेस त्यांचा इहलोकवास संपला. एकंदर पंचावन्न वर्षांत पांच दिवस कमी इतका काल ते आमच्यामध्यें राहिले, आणि एवढ्या अर्धशतावधीच्या आयुष्यांत महाराष्ट्र शारदेच्या भक्तमंडळींत फार मोठ्या मानाचें, फार मोठ्या कीर्तीचें व चिरस्मरणीय स्थान मिळवून ते निघून गेले.

नारायण चिमणाजी ऊर्फ नानासाहेब आपटे यांचे **हरि नारायण आपटे** हे ज्येष्ठ पुत्र. हरिभाऊंचा जन्म वऱ्हाडांत त्यांच्या आजोळीं झाला. बारशाच्या दिवशीं या मुलाचें नांव ‘ बाळकृष्ण ’ असें ठेवलें होतें, पण कुटुंबांत दुसरा ‘ बाळकृष्ण ’ आहे, असें आढळल्यावर तें नांव बदलून या नव्या बाळकृष्णाचें ‘ हरि ’ हें दुसरें नांव ठेवण्यांत आलें. हरिभाऊंना मातृसुख फारसें लाधलें नाहीं. ते चार वर्षांचे असतांना त्यांची मातुःश्री इहलोक सोडून गेली. या मातृसुखास आंचवलेल्या मुलाचे बापानें विशेष लाड करावयाचे पण बापानें आपल्या मुलाला उचलून घेणें, त्याला खेळवणें, त्याचे लाड करणें ह्या गोष्टी त्या वेळच्या जुन्या वळणाच्या कुटुंबांत अमर्यादपणाच्या म्हणून मानल्या जात. बापानें आपल्या मुलास न घेतां, चुलत्यानें किंवा दुसऱ्या कोणी आप्तानें त्याला घ्याव-

पुरवें, खेळवावयाचें, अशी रीत त्या वेळीं असे. त्यामुळें मातेच्या वियोगानंतर हरिभाऊंचें लालनपालन त्यांच्या चुलताचुलतीकडून— महादेव चिमणाजी आपटे व त्यांच्या पत्नी सौ० पार्वतीबाई यांजकडून— होऊं लागलें व या काकाकाकींचा हरिभाऊंस फार लळा लागला. या वेळीं महादेव चिमणाजी ऊर्फ अण्णासाहेब आपटे हे मुंबईंत फणसवाडींतील एका चाळींत रहात असत. याच ठिकाणीं हरिभाऊंचे लहानपणचे खेळण्याचे दिवस गेले, व त्यांच्या मनावर बालपणांत जे संस्कार झाले असतील तेही याच ठिकाणीं झाले. फक्त मुंजीसाठीं मात्र हरिभाऊ पुण्यास गेले होते. हा आपल्या लाडक्या 'हरि' च्या मुंजीचा समारंभ थाटानें करण्याची त्यांच्या काकीची फार इच्छा होती, पण तत्पूर्वींच सौ० पार्वतीबाई परलोकवासी झाल्या. अशा रीतीनें हरिभाऊ जरा मोठे होतात न होतात तोंच काकींच्या मायेचें छत्रही काळानें हिरावून नेलें. नानासाहेबांनीं प्रथम पत्नी निवर्तल्यावर दुसरा विवाह केला. अण्णासाहेबांनीं पुन्हां विवाह केला नाहीं. कर्त्या बायका घरांतून नाहींशा झाल्यावर संसाराची सगळी व्यवस्था नानासाहेबांच्या मावशी— चिमा मावशी— ह्या पाहूं लागल्या. हरिभाऊंनाह्या काकींच्या मागून त्यानींच वाढविलें. त्यांना स्वतःचें मूलबाळ असें कांहींच नव्हतें. आपल्या बहिणीच्या मुलांचा संसार तोच आपला संसार असें मानून तो त्या मोठ्या दक्षतेनें चालवीत असत. हरिभाऊंवर त्यांचे अतिशय प्रेम होतें, पण आई नसलेलें मूल म्हणून त्याचे फाजील लाड न करतां, हरिभाऊंना चांगलें वळण लावण्याची त्यांनीं फार काळजी घेतली. हरिभाऊंचे वडील नानासाहेब हे सरकारी नोकर असून त्यांचे आचारविचार पक्क्या कर्मठ ब्राह्मणासारखे. चुलते महादेव चिमणाजी— हे पुढें नामांकित वकील झाले.—( पुण्यांतील 'आनंदाश्रम' ही संस्कृत ग्रंथांचें संशोधन व पुनरुज्जीवन करणारी संस्था यांनींच स्थापन केली. ) यांचे आचारविचार पूर्णपणें सुधारक पंथाचे. हरिभाऊंचें बालपण यांच्याच सान्निध्यांत गेलें व या मातृविहीन मुलाचें कोडकौतुक त्यांनींच पुरविलें. आईची माया कशी असते याचा अनुभव हरिभाऊंना मिळाला नाहीं; समजावयास लागण्याच्या वयापूर्वींच ती त्यांना सोडून गेली व तिची जागा प्रथम काकीनें व तिच्या पश्चात् वडिलांच्या मातुःश्रीच्या बहिणीनें भरून काढली. हरिभाऊंचें बालपण अशा कौटुंबिक परिस्थितीत मुंबईंतील एका चाळींत गेलें.

'श्रीगणेशा' शिकण्याचा आरंभ हरिभाऊंनीं मुंबईंत केला व त्यांचें मराठी व तीन इयत्तांपर्यंतचें इंग्रजी शिक्षण मुंबईंस झालें. हा वेळपर्यंत हरिभाऊंचे वडील

व चुलते एकत्र रहात होते, पण महादेव चिमणाजी यांचें स्वैर वर्तन असह्य झाल्यामुळें नानासाहेबांनीं आपलें बिऱ्हाड पुण्यास नेलें, व आपल्याबरोबर आपल्या मुलास—हरिभाऊंसही—ते पुण्यास घेऊन गेले, व तेथील हायस्कुलांत त्यांनीं त्यांना घातलें. या वेळीं हरिभाऊंचें वय चौदा वर्षांचें होतें. पुण्यांत त्यांना घरीं संस्कृत शिकविण्यासाठीं शास्त्री ठेवण्यांत आला होता व त्याच्याजवळ हरिभाऊंनीं काव्यनाटकादिकांचा बराच अभ्यास केला. हरिभाऊ पुण्यास आल्यानंतर दोन वर्षांनीं 'न्यू इंग्लिश स्कूल' ही कांही तडफदार तरुण देश-भक्तांनीं स्थापन केलेली नवीन शाळा निघाली व हरिभाऊ हायस्कूल सोडून या शाळेंत गेले, व याच शाळेंतून ते मॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेंत उत्तीर्ण झाले. यानंतर पुढील शिक्षणासाठीं ते डेक्कन कॉलेजांत गेले, व 'न्यू इंग्लिश स्कूल' च्या मंडळीनें 'फर्ग्यूसन कॉलेज' काढतांच डेक्कनमधून ते फर्ग्युसनमध्यें आले. या कॉलेजांत एक वर्ष घालवून पुन्हां ते डेक्कनमध्ये गेले. या दोन्ही कॉलेजांत मिळून सरासरी पांच वर्षें त्यांनीं काढली; पण कॉलेजाच्या शिक्षणक्रमांतील सगळ्या विषयांमधील 'पास'ची हद्द ओलांडून जाण्याइतकी तयारी त्यांच्या हातून होऊं न शकल्यामुळें कॉलेजांत पांच वर्षें काढलीं; तथापि 'पासा'चा टिळा त्यांना लावून घेतां आला नाही. हरिभाऊंचा ओढा, आसक्ति एका विषयाकडे; त्यांचें मन विशिष्ट विषयांतच रममाण व्हावयाचें; कांहीं विषय त्यांच्या डोक्यांत शिरावयाचेच नाहीत; या विषयांची त्यांना शिसारी यावयाची; पण पासाचा शिक्का पाहिजे तर सगळ्या विषयांत ठराविक मार्कांची मर्यादा ओलांडणें भाग होतें, हरिभाऊंचा आणि गणिताचा तर छत्तिसांचा आंकडा; यामुळें हरिभाऊंची कॉलेजाच्या परीक्षेंत प्रगति होऊं शकली नाहीं आणि अर्थात् युनिव्हर्सिटीला आपली एखादी पदवी त्यांना अर्पण करतां आली नाही. तथापि हरिभाऊ कॉलेजांत 'चमकले' नाहींत असें नाही. ते शाळेंत चमकले, आणि कॉलेजांतही चमकले. त्यांच्या अंगच्या रसज्ञता व मर्मज्ञता या गुणांचें तेज शाळा व कॉलेज या दोन्ही ठिकाणच्या गुणज्ञ गुरुजनांच्या नजरेस आलें व त्यामुळें हरिभाऊ त्यांच्या सकौतुक आदरास व प्रेमास पात्र झाले. कॉलेजांत त्यांनीं पांच वर्षें काढलीं, पण हें परीक्षांचें कुंपण उल्लंघून जाण्याचें आपल्याला कांहीं साधत नाही, असें दिसून येतांच हरिभाऊंनीं कॉलेजच्या अभ्यासक्रमाला रामराम ठोकला, आणि लोकदृष्टीचें त्यांचें शिक्षण येथेंच संपलें.

हरिभाऊ यांच्या विद्यार्थिव्रताची समाप्ति मात्र तेथेंच झाली नाहीं व ती त्यांच्या आयुष्याच्या असेरपर्यंत पुढेंही केव्हां झाली नाहीं. पहिल्यानें ते जेव्हां

मुंबईत मराठी शाळेंत गेले त्यावेळीं विद्यार्थ्याचें जें व्रत त्यांनीं घेतलें तें इहलोकांतून निघून जाण्याच्या अखेरच्या दिवसापर्यंत तें त्यांनीं अखंड चालविलें; पहिला 'श्रीगणेशा' शिकविणाऱ्या शाळेंत जशा तऱ्हेचे ते विद्यार्थी होते, तसेच इंग्रजी शाळेंत होते, तसेच कॉलेजांत होते व तसेच कॉलेजांतून बाहेर पडल्यानंतर अखेरच्या दिवसापर्यंत होते. त्यांचा ज्ञानार्जनाचा हव्यास एकसारखा वाढतच होता. त्यांना लागलेला वाचनाचा छंद म्हणा, व्यसन म्हणा, वेड म्हणा, जबरदस्त होतें, व त्या 'व्यसना' पायी हजारों रुपये त्यांनीं वेंचले. त्यांनीं जेवढें वाचलें तेवढें वाचलेलीं किंवा वाचणारीं माणसें थोडींच सांपडतील. आपली वाचनाची तृष्णा तृप्त करण्यासाठीं ते नव्या नव्या भाषा शिकले. मराठी ही तर त्यांची मायभाषाच; इंग्रजी व संस्कृत या भाषांचें ज्ञान त्यांनी शाळेंत व कॉलेजांत संपादन केलें; पण फ्रेंच व जर्मन भाषांतील सरस वाङ्मयाचा आस्वाद घेण्याकरितां ह्या भाषांचेंही अध्ययन त्यांनी केलें. कैक हजार ग्रंथ त्यांनीं सर्व भाषांतील मिळून वाचले आणि वाङ्मयप्रासादाच्या प्रत्येक दालनांत प्रवेश केला. त्यांची वृत्ति मधुलोलुप भ्रमरासारखी होती. वाङ्मयाच्या उद्यानांत नवें फूल फुललेलें त्यांना दिसल्यावर त्यांनीं तिकडे धांव घेतली नाहीं व त्यांतील रसास्वाद घेण्यांत ते तल्लीन झाले नाहीत असें केव्हांही झालें नाहीं. अखेरच्या दुखण्यांत रुग्णशय्येवर वेदनांनीं विव्हळ होऊन पडले असतांना देखील नव्या नव्या ग्रंथांचा परिवार त्यांच्या सभोंवार पसरलेला होता, आणि कोणतेंना कोणतें नवीन पुस्तक वाचून घेऊन ते तशा असहाय स्थितीतही आपली ज्ञानार्जनपिपासा तृप्त करून घेत.

हें एवढें वाचन त्यांनीं कशासाठीं केलें? स्वतःची वाचनाची तहान भागविण्यासाठीं? नव्हे 'दांडगा वाचक' म्हणून म्हणवून घेण्यासाठीं? नाहीं. विद्वत्परिषदेंत बहुमानाची जागा मिळविण्यासाठीं? तसेंही नव्हे. कीर्ति मिळविण्याची धडपड त्यांनीं केव्हांही केली नाहीं. तिच्या प्राप्तीचा हव्यास त्यांना केव्हांही लागला नव्हता. ती आपण होऊन त्यांच्याकडे धांवत आली, आणि मराठींतील अद्वितीय कादंबरीकाराचा मुकुट तिनें त्यांच्या मस्तकावर ठेवला. हरिभाऊंचें जीवितकार्य त्यांनीं लिहिलेल्या कादंबऱ्या हेंच आहे. ह्या कादंबऱ्या त्यांनीं जनमनोरंजनार्थ लिहिल्या नाहींत. त्या पतितांच्या उद्धारासाठीं, दीनांच्या दुःखविमोचनासाठीं, मार्गभ्रष्टांना सन्मार्गदर्शनासाठीं, हताश झालेल्या हृदयांत नवचैतन्य उत्पन्न करण्यासाठीं, समाजशुद्धीसाठीं, राष्ट्रीय भावना उद्दीपित करण्यासाठीं त्यांनीं लिहिल्या. यासाठीं, त्यांनीं अखंड वाचन चालविलें, वाङ्मयाच्या क्षेत्र-

ग्रंथांतरीं फिरून सुविचारांचीं बीजें गोळा केलीं आणि तीं आपल्या कादंबऱ्यांच्या द्वारा आपल्या देशबांधवांच्या मनांत मोठ्या चातुर्यानें पेरण्याचा महदुद्योग केला.

**"न हि कस्तूरिकामोदः शपथेन प्रकाश्यते"** ह्या कविवचनांची आठवण हरिभाऊंच्या "आजकालच्या गोष्टी– मधली स्थिति" ह्या पहिल्या कादंबरीच्या प्रकाशनाचा इतिहास करून दिल्याशिवाय रहात नाहीं. ही कादंबरी हरिभाऊंनीं कॉलेजांत असतांना लिहिली, व "पुणेंवैभव" ह्या अस्तंगत साप्ताहिक पत्रांत ती १८८५ सालीं प्रसिद्ध झाली. ह्या कादंबरीचीं पहिलीं दोन प्रकरणें प्रसिद्ध होतांच केवळ पुण्यासच नव्हे, तर सगळ्या महाराष्ट्रांतील वाचकवर्गांत मोठी खळबळ उडाली व या कादंबरीचा कर्ता कोण म्हणून प्रत्येक वाचक विचारूं लागला. हरिभाऊंची इच्छा आपलें नांव कोणाला कळूं न देतां आपलें कादंबरीलेखनाचें कार्य चालवावें अशी होती आणि 'केसरी' नें कांहीं कारणावरून त्यांचें नांव मुद्दाम लोकांना सांगितलें नसतें, तर हरिभाऊंची इच्छा सफल होऊन कर्त्याचें नांव अज्ञात राहून, फक्त कृति तेवढी वाचकवर्गापुढें आली असती. "मधली स्थिति" ह्या कादंबरीनंतर हरिभाऊंची "आजकालच्या गोष्टींतली" दुसरी गोष्ट "गणपतराव" ही कानिटकर मंडळीच्या 'मनोरंजन' मासिक पुस्तकांत प्रसिद्ध होऊं लागली, तेव्हां त्या कादंबरीवरही हरिभाऊंनीं लेखकाचें नांव "पुणें वैभवांतील आजकालच्या गोष्टींचा कर्ता" असें दिलें होतें. कांहीं पाश्चात्य कादंबरीकारांप्रमाणें आपलें नांव गुप्त ठेवून कादंबऱ्या लिहाव्या अशी हरिभाऊंची इच्छा असल्यामुळें केसरीनें केलेला गौप्यस्फोट हरिभाऊंना आवडला नाहीं. कांहीं खरीं व कांहीं काल्पनिक पात्रें योजून समाजांतील सुखदुःखाच्या प्रसंगांचीं हृदयस्पर्शी चित्रें रंगवावींत व लोकजागृति करावी हा कादंबरीलेखनांतला हरिभाऊंचा हेतु त्यांच्या ह्या पहिल्या कादंबरीपासून स्पष्ट दिसतो. हरिभाऊंची ही कादंबरी प्रसिद्ध झाली त्या काळांत कादंबरीसारख्या पुस्तकांकडे तत्कालीन शिष्टमंडळी अनादराच्या दृष्टीनें पहात असत; असलीं पुस्तकें वाचल्यापासून "वाचणारांचीं मनें बिघडून ते नीतिभ्रष्ट होतात" असें त्या वेळचे शिष्ट मानीत असत; असें असतांही विशीएकविशींत लिहिलेल्या हरिभाऊंच्या ह्या पहिल्या कादंबरीनें तिच्या वाचनाची शिष्टमंडळाच्या मनांतही उत्कट उत्कंठा उत्पन्न केली; इतकेंच नव्हे तर कित्येकांना तिचें पुढलें प्रकरण केव्हां प्रसिद्ध होईल व केव्हां तें आपण वाचूं इतका चटका लावला; यावरून या उद्योन्मुख कादंबरीकाराच्या लेखणींत वाचकांच्या मनांत खळबळ उडवून देण्याचें कसें सामर्थ्य होतें याची साक्ष पटते.

कानिटकर आणि मंडळींच्या 'मनोरंजन' या मासिक पुस्तकाचा पहिला अंक १८८६ सालच्या जुलई महिन्यांत प्रसिद्ध झाला, व त्यांत हरिभाऊंनीं लिहावयास घेतलेली दुसरी कादंबरी 'गणपतराव' हिचें पहिलें प्रकरण आलें. या पहिल्या अंकांत हरिभाऊंच्या नव्या कादंबरीच्या पहिल्या प्रकरणास पहिलें स्थान देण्यांत आलें व याच अंकांत हरिभाऊंनीं लिहिलेल्या 'श्रुतकीर्तिचरित्र' या नाटकाचा पहिला कांहीं भाग प्रसिद्ध झाला. या दोन्ही विषयांवर लेखकाचें नांव 'आ. का. गो.' च्या कल्याकडून असेंच घालण्यांत आलें होतें. हें मासिक पुस्तक कांहीं काळ नियमितपणें निघालें, परंतु पुढें या मासिकाचे अंक अनियमितपणें प्रसिद्ध होऊं लागले व शेवटीं तें बंद पडलें. या मासिक पुस्तकांत हरिभाऊंनीं 'गणपतराव' व 'चाणाक्षपणाचा कळस' या दोन कादंबऱ्या, 'श्रुतकीर्तिचरित्र' व 'जयध्वज' हीं दोन नाटकें, 'मारून मुटकून वैद्यबोवा' 'पळपुट्या वैद्य' इत्यादि मोलियरच्या आधारें लिहिलेलीं प्रहसनें, कांही लहानसहान गोष्टी, निबंध व कविता लिहिल्या. या मासिक पुस्तकाच्या शिरोभागीं "**आपरितोषाद्विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम्**" ही कविकुलगुरूंची उक्ति 'ध्येयवाक्य' म्हणून घातलेली असे व त्याप्रमाणें हें मासिक पुस्तक अल्पावधींतच विद्वज्जनांच्या प्रशंसेस पात्र होऊन अशा तऱ्हेच्या वाङ्मयाची आवश्यकता त्यानें सिद्ध करून दिली. या मासिकपुस्तकाशीं हरिभाऊंचा संपादकीय संबंध होता, व आपल्या 'मनोरंजना'चा हरिभाऊंना फार अभिमानही होता. तो इतका कीं, कै. काशिनाथ रघुनाथ मित्र यांनीं त्यानंतर आपल्या नवीन काढलेल्या मासिक पुस्तकास 'मनोरंजन' नांव दिलें ही गोष्ट हरिभाऊंस आवडली नाहीं व पुढें कैक वर्षें तरी ती त्यांच्या मनांत वसत होती. कै. मित्रांनीं आपल्या 'मनोरंजना'चा पहिला दिवाळी अंक काढला त्यांत घालण्यासाठीं हरिभाऊंकडे त्यांचें छायाचित्र मागितलें; परंतु तें सुद्धां देण्याचें त्यांनीं नाकारलें होतें. पुढें अनेक वर्षांनंतर कांहीं व्यवसायपरत्वें काशिनाथ रघुनाथ मित्र आणि हरिभाऊ यांचा निकट संबंध आला, तेव्हां हरिभाऊंनीं मित्रांच्या 'मनोरंजनां'त लिहिण्यास पहिल्यानें लेखणी हातीं घेतली. हरिभाऊंनीं आपलें 'मनोरंजन' काढण्यांतला हेतु पहिल्याच अंकाच्या प्रस्तावनेंत व्यक्त केला तो असाः "यांत येणारे विषय, शिक्षणाचा हेतु मुख्य धरून, जितके मनोरंजक व प्रतिष्ठित करतील तितके करण्याचा आमचा विचार आहे" आणि हाच "हेतु मुख्य धरून" हरिभाऊंनीं आपल्या कादंबऱ्या लिहिल्या, गोष्टी लिहिल्या, नाटकें लिहिलीं— आपल्या सर्व ललितवाङ्मयाची रचना हाच हेतु मनांत धरून हरिभाऊंनीं केली.

आपलें लोकशिक्षणाचें, बहुजनसमाजांत विचारजागृति करण्याचें कार्य विस्तृत प्रमाणावर करण्यासाठीं सन १८९० सालच्या आक्टोबरांत हरिभाऊंनीं 'करमणूक' पत्र काढलें. यावेळीं जुन्यानव्याचा झगडा जोरानें चाललेला होता. 'केसरी' आणि 'सुधारक' यांची एकमेकांशीं 'दोन हात' करण्याची खडाजंगी चालू होती. सुधारक व त्यांचीं मतें यांच्याविषयीं बहुजनसमाजांत आदर किंवा प्रेम बिलकुल उत्पन्न झालें नव्हतें; सुधारकांच्या मतांचा उच्चारही बहुजनसमाजास अभद्र वाणीसारखा वाटे, इतकी त्यांविषयीं लोकांच्या मनांत अप्रीति होती. ही अप्रीति नाहींशी करून इष्ट सुधारणांना लोकमत अनुकूल करण्याचें कार्य हरिभाऊंनीं 'करमणुकी'च्या द्वारें आरंभिलें. आपल्या लेखणीच्या सामर्थ्याविषयी हरिभाऊंस आतां आत्मविश्वास उत्पन्न झाला होता; आपल्या मनोरंजनाच्या शर्करावगुंठित गुटिकांचें लोक मोठ्या आनंदानें व उत्कंठेनें सेवन करतात हें हरिभाऊंच्या उत्तम रीतीनें प्रत्ययास आलें होतें; म्हणून रुक्ष, तात्त्विक वादविवादाच्या मार्गांत न शिरतां करमणुकीच्या बहुजनसमाजास आवडणाऱ्या मार्गानें त्यांनीं आपलें लोकशिक्षणाचें कार्य जोरानें करण्यास प्रारंभ केला.

'पण लक्षांत कोण घेतो?' ही 'करमणुकीं'त अगदीं प्रारंभीं प्रसिद्ध झालेली त्यांची सामाजिक कादंबरी होय.

'करमणूक' पत्र त्यांनीं अठ्ठावीस वर्षें चालविलें आणि स्वभाषेची आणि स्वदेशाची सेवा त्यांनीं या पत्राच्या द्वारें प्रामुख्यानें केली. 'पुणें वैभवां'त प्रसिद्ध झालेली 'मधली स्थिति' व त्यानंतर आपल्या 'मनोरंजनां'त लिहिलेल्या 'गणपतराव' (ही अपुरीच राहिली) व 'चाणाक्षपणाचा कळस' ह्या दोन, ह्या कादंबऱ्यांखेरीज बाकी आपल्या सर्व कादंबऱ्या त्यांनीं 'करमणुकीं'तूनच प्रसिद्ध केल्या. ह्या कादंबऱ्यांशिवाय शेंकडों मोठ्या व छोट्या गोष्टी, लहान लहान निबंध, छोटीं चरित्रें, निवडक माहिती, कविता, चुटके वगैरे वगैरे कितीतरी मजकूर त्यांनीं लिहिला. हा त्यांनीं लिहिलेला सर्व मजकूर एकत्र करून छापल्यास हजार हजार पानांचे कितीतरी ग्रंथ भरतील. हा सर्व मजकूर लिहिण्यांत– 'करमणुकीं'त येणाऱ्या कोणत्याही मजकुरांत,– त्यांनीं आपलें धोरण मात्र केव्हांही ढळूं दिलें नाहीं. आपल्या लिहिण्याचा लोकशिक्षण हा जो मुख्य हेतु त्याला विघातक अशी एक ओळही त्यांनीं कधीं आपल्या 'करमणुकीं'त येऊं दिली नाहीं. आणि अश्लीलतेला तर त्यांनीं आंतल्या मजकुरांतच नव्हे तर जाहिरातींतसुद्धां कधीं डोकावूं दिलें नाहीं. आपल्या समाजास आपल्याला

विशिष्ट विचारांचें वळण लावावयाचें आहे, लोकांच्या अंतःकरणांतला अंधार नाहींसा करून कर्तव्याच्या स्फूर्तीची ज्योत तेथें प्रज्वलित करावयाची आहे, हें धोरण डोळ्यांपुढें ठेवून 'करमणुकी'चा अठ्ठावीस वर्षांचा मार्ग त्यांनीं आक्रमण केला. त्यांचा पहिला जोम पुढल्या वयांत टिकला नाहीं. 'करमणुकी'चें काम त्यांनीं पहिल्या पहिल्यानें जितक्या नेटानें केलें तितक्या नेटानें त्यांजकडून तें पुढें होईनासें झालें; तथापि 'करमणुकी' चें त्यांनीं निराळ्या नव्हेच्या स्वरूपांत पुढें केव्हांही स्थित्यंतर होऊं दिलें नाहीं. प्रचलित राजकारण व सामाजिक, धार्मिक इत्यादि प्रश्नांवर वर्तमानपत्रांतून होणारे वादविवाद यांपासून आपल्या 'करमणुकीस' अलिप्त ठेवावयाची असें जें धोरण त्यांनीं प्रारंभींच ठरविलें तेंच अखेरपर्यंत मोठ्या दक्षतेनें कायम राखलें. आपलीं राजकीय, सामाजिक, धार्मिक इत्यादि बाबतींतील मतें त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांतलि पात्रांच्या मुखांतून वद-विलीं, आणि तींही मोठ्या खुबीनें व चटकदार रीतीनें वदविलीं; पण इतर वर्तमानपत्रांसारखी या विषयांची चर्चा त्यांनीं 'करमणुकीं' तून कधींही केली नाहीं. या प्रश्नांची विशेष चर्चा करण्याची विशेषतः सामाजिक प्रश्नांची चर्चा करण्याची, त्यांना आवश्यकता वाटली त्यावेळीं त्यांनीं 'सुधारका'चें पुनरुज्जीवन केलें, व या कार्यासाठीं एक दिवसाआड निघणारें एक वर्तमानपत्र काढण्याची वाटाघाट याच सुमारास ते व माजी बाबाजी सखाराम कंपनीचे मालक गोविंद-राव डुकले यांच्यामध्यें चालली होती. 'करमणुकी'ची व्यवस्था या वेळीं मेसर्स बाबाजी सखाराम कंपनीकडेच होती व तिच्या उत्कर्षासाठीं गोविंदराव डुकले यांनीं पुष्कळ परिश्रम केले व पुष्कळ पैसाही खर्च केला. गोविंदराव वारल्यानंतर बाबाजी सखाराम कंपनी बंद झाली; त्यावेळीं व त्यानंतरही अनेक वेळां 'करमणूक आमच्या स्वाधीन करा आम्ही ती चालवितों' अशी कांहीं जणांनीं हरिभाऊंकडे मागणी केली; तिच्या स्वामित्वासाठीं हरिभाऊंस मोठाल्या रकमाही कित्येकांनीं देऊं केल्या, पण आपली 'करमणूक' आपल्या धोरणानें पुढें कोणी चालवील असा भरंवसा न वाटल्यामुळें हरिभाऊ ती कोणाच्याही स्वाधीन करावयास तयार झाले नाहींत. हरिभाऊंची 'करमणूक' हरिभाऊंबरोबरच विराम पावली!

हरिभाऊंनीं 'करमणुकीं' तून एकंदर १८ मोठ्या कादंबऱ्या लिहिल्या; त्यां-पैकीं ८ सामाजिक असून, १० ऐतिहासिक आहेत. सामाजिक व ऐतिहासिक हे दोन वर्ग खेरीज करून तिसऱ्या वर्गांत घालतां येण्यासारखी एकच कादंबरी त्यांनीं आपल्या लेखनव्यवसायाच्या अगदीं आरंभीं लिहिली व ती अपुरी

'मनोरंजनां'त प्रसिद्ध झालेली 'जाणतेपणाचा कळस' ही होय. अशा तऱ्हेची अगर वरील दोन प्रकारच्या कादंबऱ्यांहून भिन्न केवळ मनोरंजन कादंबरी त्यांनीं पुढे लिहिली नाहीं.

ह्याशिवाय 'गड आला पण सिंह गेला' ही कादंबरीवजा मोठी गोष्ट त्यांनीं लिहिली; पण कादंबऱ्यांपैकीं 'म्हैसूरचा वाघ' 'सूर्यग्रहण' व 'कालकूट' ह्या कादंबऱ्या अपूर्ण आहेत. 'कालकूट' ही कादंबरी त्यांनीं योजिल्याप्रमाणें पुरी असती, तर ती त्यांची एक अत्युत्कृष्ट कादंबरी झाली असती. ती त्यांना अर्धीच सोडून द्यावी लागली, याचें कारण त्यांच्या 'करमणुकी'वर व त्यांच्या कांहीं कादंबऱ्यांवर त्या वेळी येऊं पाहणारें गडांतर होय. तें गंडांतर त्यांच्या एका हितचिंतकाच्या व थोर मित्राच्या खटपटीमुळें टळलें म्हणून बरें, नाहींपेक्षां त्यांच्या कांहीं उत्कृष्ट कादंबऱ्यांस कायमचा– निदान कांहीं काळ तरी– महाराष्ट्र मुकला असता. 'मी' व 'यशवंतराव खरे' या कादंबऱ्या पुस्तकरूपानें प्रसिद्ध करतांना त्यांचीं शेवटचीं प्रकरणें आज त्या पुस्तकांत जीं आहेत त्याहून निराळ्या तऱ्हेनें लिहिण्याचें त्यांच्या मनांत होतें. पण सदर गंडांतराच्या बावटळीमुळें तो विचार त्यांना सोडून देणें भाग पडलें. 'वज्राघात' ही त्यांनीं संपूर्ण लिहिलेली शेवटची कादंबरी होय. त्यांनीं 'वज्राघात' लिहिण्यास आरंभ केला त्या वर्षी त्यांच्या आवडत्या मुलीच्या मृत्यूनें त्यांच्या हृदयावर वज्राघात झाला, 'करमणुकी'चे तेव्हांचे चालक गोविंदराव डुकले त्याच वर्षी दिवंगत होऊन बाबाजी सखाराम कंपनीवर वज्राघात झाला व त्यांच्या कादंबरीलेखनावरही वज्राघातच झाला. यानंतर त्यांनीं 'करमणुकीं'त नवीन कादंबरी लिहिली नाहीं. 'पुर्णवैभव,' कानिटकर मंडळींचें 'मनोरंजन' व स्वतःची करमणूक' यांशिवाय त्यांची कादंबरी अन्यत्र कोठेंही प्रसिद्ध झाली नाहीं. 'काळ तर मोठा कठीण आला' ह्या त्यांनीं दुष्काळावर लिहिलेल्या मोठ्या गोष्टीचें त्यांनींच इंग्रजींत केलेलें भाषांतर मात्र 'रामजी' या नांवानें विलायतेंतील प्रख्यात 'मेसर्स फिशर अनविन कंपनी'नें पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें आहे.

'मनोरंजनां'त प्रसिद्ध केलेल्या नाटकांशिवाय 'संत सखुबाई' व 'सती पिंगला' हीं दोन नवीन नाटकें त्यांनीं लिहिलीं. यांपैकीं 'संत सखुबाई' हें त्यांनीं 'करमणुकीं'त ('वसंत अंकां'त) लिहिलें. 'करमणुकी' शिवाय इतरत्रही त्यांनीं पुष्कळ लिहिलें. निरनिराळ्या विद्वज्जनसभांपुढें वाङ्मयावर सुंदर भाषणें केलीं व निबंध वाचले. विद्यार्थिदशेंतही त्यांनीं कांहीं चांगले निबंध

लिहिले व काव्यरचना केली. साप्ताहिक ॲंग्लो-मराठी ' ज्ञानप्रकाशा ' चीं व पुढें ज्ञानप्रकाश ' दैनिक झाल्यावर त्याचीं संपादकीय सूत्रें कांहीं काल त्यांच्याकडे होतीं व ' सुधारका ' चें पुनरुज्जीवन केल्यावर त्यांत कांहीं सुंदर निबंध त्यांनीं लिहिले. हा त्यांचा सगळा लेखनोद्योग मनांत आणला म्हणजे वाङ्मयक्षेत्रांत त्यांनीं केलेली कामगिरी केवळ संख्येच्या दृष्टीनेंही फारच मोठी आहे अशी खात्री पटल्यावांचून रहात नाहीं. त्यांच्या आयुष्याचा लेखनव्यवसायांत गेलेला काल साधारणतः पसतीस वर्षांचा आहे. पण त्यात जास्त नेटाची व उत्साहपूर्वक कामगिरी करमणुकीच्या सुरवातीपासून पुढील २०-२१ वर्षांतच झाली.

हा सगळा लेखनाचा प्रचंड खटाटोप त्यांनी लोकाशिक्षणासाठी, बहुजनहित साधनासाठीं केला; पैशासाठीं अगर कीर्तीसाठीं केला नाहीं. त्यांच्या गुणांवर लुब्ध होऊन कीर्ति त्यांच्याकडे धांवत आली तशी लक्ष्मी मात्र आली नाहीं. श्री आणि सरस्वती यांच्यांत छत्तिसांचा आंकडा असतो हाच सिद्धांत पुनश्च प्रस्थापित करणारें महाराष्ट्रांतील ह्या कादंबरीकारकुलगुरूचें चरित्र आहे. आयुष्याच्या शेवटीं शेवटीं तर सांपत्तिक अडचणीनीं त्यांचें चित्त अत्यंत अस्वस्थ झालें होतें. जे हरिभाऊ कर्तृत्वाच्या आयुष्याच्या सुरवातीस महादेव चिमणाजी यांनीं पुनः पुनः प्रयत्न केले असतांही सरस्वतीची सेवा सोडून धनार्जनाचा कोणताही उद्योग करण्यास तयार झाले नाहींत, व हा त्याचा हेका पाहून महादेव चिमणाजींनीं तूं माझें न ऐकल्यास "मी तुला माझ्या इस्टेटींतली एक कपर्दिकही देणार नाहीं " असें निक्षून लिहिल्यावर " मीं मुळीं तुमच्या संपत्तीचा अभिलाष केव्हांच केला नाहीं " असा खणखणीत जबाब दिला, त्याच हरिभाऊंना पैशाच्या फिकिरीमुळें बंगाल्यांत एक नवा रेल्वेचा फांटा बांधण्यास निघालेल्या कंपनीचा व्याप मागें लावून घेऊन आयुष्याच्या अंतिम प्रहरांत 'शेअर घ्या हो' म्हणून कैकांच्या दारीं हिंडावं लागलें ! हा दैवदुर्विलास नव्हे तर काय ? हरिभाऊंना ' करमणुकी' पासून कांहीं प्राप्ति झाली नाही, अगर त्यांच्या कादंबऱ्यांनींहीं त्यांना लक्ष्मीची जोड जोडून दिली नाही. उलट ह्या सर्व व्यवसायांत कर्जाचा बोजा त्यांच्या शिरावर झाला. बाबाजी सखाराम कंपनी बुडण्यास जीं अनेक कारणें झालीं त्यांपैकीं गोविंदराव डुकले यांनीं हरिभाऊंना प्रोत्साहन देण्यासाठीं, त्यांच्या 'करमणुकीसाठीं ' व त्यांच्या ग्रंथप्रकाशनासाठीं वेंचलेला पैसा हें एक होतें. आणि 'आर्यभूषण छापखान्या ' नें आणि महाराष्ट्रांतील या नामांकित मुद्रणालयाचे निःसीम सेवक रा. रा. केशवराव बाळ यांनीं वेळोवेळीं त्यांना जें साह्य केलें तें केलें नसतें व अखेर त्यांचे परममित्र गोपाळराव गोखले यांच्या 'सर्व्हंटस ऑफ इंडिया सोसायटी 'नें त्यांच्या ऋणविमोचनाची व त्यांच्या कुटुंबाच्या आजन्म निर्वाहाची व्यवस्था केली नसती तर त्यांच्या मनाला होणाऱ्या सांपत्तिक दुःस्थितीच्या वेदना अखेरच्या क्षणापर्यंत वाढत गेल्या असत्या.

धुलते अण्णासाहेब यांनी आपल्या संपत्तींतली एक कपर्दिकही जरी हरिभाऊंना दिली नाहीं तथापि त्यांनीं आयुष्याच्या अखेरीस 'आनंदाश्रम' ही संस्था स्थापन करून शिल्लक संपत्तीचा सद्व्यय केला, व त्या आश्रमाची व्यवस्था ठेवण्याचें काम हरिभाऊंच्या हातीं सोपवून त्या 'आश्रमाच्या' सर्वांतून हरिभाऊंच्या संसारयात्रेची थोडीशी सोयही करून ठेविली. हरिभाऊंनीं या 'आश्रमांत' पंचवीस वर्षें वास्तव्य केलें. त्यांचा लेखनाचा बहुतेक उद्योग याच आश्रमांत झाला. 'आश्रमाच्या' वरच्या मजल्यावर त्यांची लिहावयास बसण्याची लहानशी खोली होती. या खोलींत आपलें लिहिण्याचें काम ते बहुधा रात्रीं व पहांटेस करीत; केव्हां केव्हां दिवसाही ते लिहावयास बसत, पण दिवसाचा बहुतेक वेळ भेटावयास आलेल्या मंडळीशीं काव्यशास्त्रविनोदांत जाई. त्यांचें लिहिणें नियमित नव्हतें. ज्या वेळीं त्यांची प्रतिभा जागृत होई, तंद्री लागे त्याच वेळीं त्यांच्या हातून तावाचे ताव लिहून तयार होत. अशा वेळीं तासांचे तास ते एकसारखे लिहीत बसत आणि त्यांच्या लेखणींतून कागदावर अक्षरपंक्ति झरझर उमटत जात. 'वाचमर्थोनुधावति' हें त्यांच्या बाबतींत अगदीं खरें होतें. त्यांची भाषा अलंकारादि आभरणांनीं, संस्कृत शब्दांच्या चातुर्यानें अथवा पदलालित्यानें नटलेली नाहीं. तथापि वाचकांचें अंतःकरण ती मोहून टाकते. ती अत्यंत गोड वाटते याचें कारण वरीलच होय. अशा वृत्तींत ते जेव्हां लिहीत असत तेव्हां वर काय लिहिलें हें ते कधींही पहात नसत. ज्यावेळीं त्यांची तंद्री लागत नसे-आणि शेवटच्या दहा बारा वर्षांत असें वारंवार होऊं लागलें-तेव्हां लिहिण्यासाठीं कागद पुढ्यांत घेऊन बसले तरी त्यावर त्यांची लेखणी चालेनाशी होई. एरवीं ते एका शब्दाची खोडाखोड न करतां झपाझप लिहीत जात. 'वज्राघाताचें' पहिलें प्रकरण त्यांनीं अत्यंत सुंदर लिहिलें आहे. तें लिहिण्याची तयारी करून ते चार पांचदां बसले! पण तितक्याही वेळां पांच दहा ओळी लिहून त्यांनीं कागद फाडून टाकले. शेवटीं एका पहांटेस त्यांनीं तें सुंदर प्रकरण लिहिलें आणि त्या पुढचीही दोन प्रकरणें त्याच बेठकींत लिहिलीं. 'करमणुकी' च्या सबंध अंकाचा मजकूर-कादंबरीचें प्रकरण, गोष्ट, माहिती, चरित्र, चुटके वगैरे-त्यांनीं असाच पुष्कळदां एका अगर दोन बैठकींत लिहिला आहे. त्यांनीं इतक्या कादंबऱ्या लिहिल्या; पण कोणतीही कादंबरी आधीं संपूर्ण तर राहोच, पण तिचीं बरीचशीं प्रकरणें लिहून मग ती प्रसिद्ध करण्यास आरंभ केला असें कधींच झालें नाहीं. 'करमणुकी 'चा अंक निघण्याचा दिवस आजउद्यांवर आला म्हणजे त्यांनीं त्या अंकाचें प्रकरण लिहावयाचें; पण तें इतकें सरस उतरावयाचें कीं, तें वाचल्यावर वाचकांच्या मनाला त्याचा चटका लागून 'करमणुकी' च्या पुढील अंकाच्या आगमनाकडे तो डोळे लावून बसावयाचा. हा क्रम सतत पावशतकाहून अधिक काल चालला आणि तेवढा दीर्घकाल या श्रेष्ठ कादंबरीकारानें मराठी वाचकवर्गास गुंगत ठेविलें.

कौटुंबिक सुखाचा वांटा या कादंबरीकाराच्या भागधेयांत विधीनें लिहिला नव्हता असें म्हटलें पाहिजे. अगदीं शैशवांत मातृसुख संपलें, जुन्या चळणामुळें व जुन्या विचारांमुळें पित्याचा लळा लागला नाहीं, तारुण्यांत प्रथम पत्नी व तिला झालेलीं तिन्ही मुलें गेलीं; द्वितीय विवाह केल्यावर नव्या विचारांमुळें वडिलांच्या घरीं मानासिक त्रासांत दिवस काढावे लागले, द्वितीय कुटुंबाच्या पोटीं फार वर्षांनीं त्यांना एक मुलगी झाली, पण जन्मापासूनच तिला रोगानें ग्रासली; 'ताई' त्यांच्या डोळ्यांतील बाहुली, त्यांचा जीव की प्राण होती. आयुष्याच्या उतरणीजवळ ते येत आहेत तोंच काळानें तिला उचलून नेली आणि यानंतर बरोबर एक वर्षानें त्यांचे परम स्नेही गोपाळराव गोखले गेले. अशीं त्यांच्या कौटुंबिक दशेंत आभाळावर आभाळें येत गेलीं. पण त्यांच्या प्रेमळ स्वभावांत, सौजन्यांत, आदरातिथ्यवृत्तींत अगर स्नेहशीलपणांत कधींही बदल झाला नाहीं. गर्वानें त्यांना स्पर्श केला नाहीं. विनयाची वृत्ति त्यांना सोडून गेली नाहीं, अहंभाव त्यांच्या अंतःकरणांत प्रवेश करूं शकला नाहीं; पितृभक्तीची भावना त्यांच्या हृदयांत अखंड वागत होती.

त्यांनीं वाङ्मयाव्यतिरिक्त अन्य क्षेत्रांतही पुष्कळ कार्य केलें, व त्या क्षेत्रांत बहुमान मिळविला. पुण्यांतील प्रमुख पुढाऱ्यांत त्यांची गणना होती. पुणें म्युनिसिपालिटीचे ते एक वेळ प्रेसिडेंट होते. ज्या युनिव्हर्सिटीची परीक्षा ते पास होऊं शकले नाहींत त्याच युनिव्हर्सिटीनें त्यांना आपल्या अत्युच्च परीक्षेत पुढें मराठीचे परीक्षक नेमलें. मुंबई युनिव्हर्सिटीमध्यें वुईलसन फायलालॉजिकल लेक्चरर म्हणून त्यांची नेमणूक होऊन त्यांनीं सन १९१५ सालीं Marathi, its Sources and Development या विषयावर सहा व्याख्यानें दिलीं आहेत. १९१५ सालीं पुण्यास भरलेल्या पंधराव्या प्रांतिक परिषदेच्या स्वागत मंडळाचे ते अध्यक्ष होते. त्यांनीं मित्रपरिवार फार मोठा गोळा केला, व त्यांत अनेक थोर थोर विद्वान् होते.

अखेर दीपनिर्वाणाचा दिवस आला. १९१८ च्या आक्टोबरांत त्यांच्या एका डोळ्यास पक्षघाताचा विकार झाला. त्यांतून बरे झाल्यावर बंगाल्यांतील रेल्वेचे शेअर खपविण्यास ते कलकत्त्यास गेले. तेथून परत येतांना वाटेंत त्यांना जलोदराचा विकार झाल्याचें डॉक्टरांनीं सांगितलें. औषधोपचारासाठीं ते मुंबईस आले, पण दुखणें वाढत गेलें. यावेळीं १९१९ सालच्या मार्च महिन्याची सुरुवात होती. त्या महिन्याच्या तिसऱ्या तारखेस ते मुंबईहून पुण्यास गेले. दुपारीं १ वाजतां ते आनंदाश्रमांत जाऊन पोहोंचले आणि त्याच दिवशीं सायंकाळीं त्यांच्या जीर्ण शरीराचा त्याग करून त्यांतील चैतन्य शाश्वतांत विलीन झालें.

# अनुक्रमणिका.



---

# कालकूट ह्या कादंबरीचें संक्षिप्त संविधानक.

## १ बीजारोपण.

आमच्या कथानकाला आज सात शतकांवर कांहीं काळ लोटला आहे. त्या वेळीं हस्तिनापुरास— दिल्लीस— अनंगपाळ नांवाचा क्षत्रियकुलोत्पन्न राजा राज्य करीत होता. हा राजा बराच वृद्ध झाला तरी त्याला मुळींच अपत्य झालें नाहीं. तेव्हां त्या काळच्या रीतीप्रमाणें त्यानें आणखी दोघी बायका केल्या. त्यांपैकीं एक केकय देशाच्या राजाची मुलगी व दुसरी कोसल देशच्या राजाची. त्या दोघी बायकांना दोन मुली झाल्या. केकय देशच्या राजाच्या मुलीच्या पोटीं विमला झाली, व कोसल कन्येच्या पोटीं कमला झाली. विमला ही कनोजचा राजा विजयपाळ यास दिली; तिच्या पोटीं जयचंद त्याला झाला. कमला ही अजमेर ऊर्फ द्रोणगिरीचा राजा सोमेश्वर यास दिली. तिचे पोटीं पृथ्वीराज झाला.

अनंगपाळास वर सांगितलेल्या दोनच मुली झाल्या असें नाहीं. कमलेच्या पाठीवर राजास एक पुत्र झाला त्याचें नांव धनंजय ठेविलें; पण तो मुलगा सुमारें चार वर्षांचा होऊन एकाएकीं कोठें उंचावर चढत असतां पडून धनुर्वात होऊन वारला. त्याचा राजाला अत्यंत शोक झाला. तो अत्यंत विरक्त झाला. त्याला जीवित जड वाटूं लागलें. आपल्या वृद्ध पित्याचें समाधान करण्यासाठीं त्याच्या मुलीहि आल्या होत्या. त्यामुळें आणि आप्तमंडळीच्या बोधानें राजाला दुःखाचा विसर पडूं लागला. राजाचे दोघे नातू आपल्या आयांबरोबर आले होते. त्यांच्या लीला पाहूनहि त्याला विरंगुळा झाला. थोडे दिवस हें ठीक चाललें, पण पुढें ही स्थिति टिकली नाहीं.

राजाची थोरली मुलगी विमला ही फार लोभी आणि खुनशी होती. तिची इच्छा, आपल्या वृद्ध पित्याला आतां दुसरा मुलगा होणें शक्य

नाहीं, त्यानें आपल्या—जयचंद्राला—राज्याचा स्वामी करावें म्हणजे ता सार्वभौम होईल. पण आपल्या बापाचें मन आपल्या मुलापेक्षां कम लेच्या मुलावर—पृथ्वीराजावर—अधिक आहे असें दिसून येतांच तिच्या मत्सरानें पेट घेतला. तिनें कांहीं तरी निमित्त काढून कमलेशीं तंटे करून तिला तिच्या पोरासह आपल्या बापाच्या दृष्टीपासून दूर करण्याचा निश्चय केला, आणि एके दिवशीं तिच्याशीं मोठ्या कडाक्याचें मांडणही केलें. पण विमलेकरितां कमलेला हांकून देण्यास अनंगपाळ तयार नव्हता. विमलेचा दुष्टपणा पाहून त्यानें तिलाच आपल्या वाड्यांतून जाण्यास सांगितलें, आणि विमलाही त्याच क्षणीं तणतणत चालती झाली.

आपल्याकरितां आपली बहीण गेली याचें कमलेला फार वाईट वाटलें, पण राजानें तिची पुष्कळ समजूत करून तिला पुत्रासह राहवून घेतलें. राजाचा पुरोहित रामगुरु हा मोठा विद्वान्, पवित्राचरणी ब्राह्मण असून तो धनुर्विद्येंत निष्णात होता पृथ्वीराजाला हेच गुरु योग्य आहेत असें जाणून राजानें त्यांच्या स्वाधीन आपल्या नातवाला केलें. पृथ्वीराज गुरुगृहीं गेल्यावर तेथें त्याला भाट जातीचा चंद्र नांवाचा एक मुलगा भेटला. हा पृथ्वीराजापेक्षां थोडा मोठा असून रामगुरूंजवळ क्षात्रविद्याच शिकत होता. पृथ्वीराजाचा आणि चंद्राचा फारच स्नेह जमला—इतका कीं पदार्थ आणि छायेप्रमाणें त्यांचें वास्तव्य सर्वदा एकत्र असावयाचें. राजाच्या मुलाची आपल्यावर असलेली प्रीति पाहून चंद्राचीहि त्याच्यावर विलक्षण निष्ठा बसली. पृथ्वीराजाच्या सुखाकरितां तो सर्वदा तत्पर असे.

इकडे विमला जी संतापून सासरीं चालती झाली, तिचें दोन वर्षे झालीं तरी बापानें बिलकूल नांवसुद्धां काढलें नाहीं. याचें कमलेला फार वाईट वाटून ती त्या दोघांचा समेट करण्याचा उपाय शोधूं लागली. तिच्या नवऱ्याचें—सोमेश्वराचेंहि तिला पाठबळ होतें. याच हेतूनें त्यानें आपल्या सासऱ्याला अजमीरास कांहीं दिवस राहण्यास बोलाविलें होतें. हेतु हा कीं, तेथें तरी विमलेला बोलावून आणून या पितापुत्रींचा समेट करून घ्यावा. त्याप्रमाणें जुळेल असें वाटलेंहि. आपण आतां तपोवनांत जाणार, तर शेवटीं तरी जांवयाच्या आग्रहाला मान देऊन त्याच्या घरीं चार दिवस जावें असा अनंगपाळानें बेत केला.

त्याबरोबर सोमेश्वरानें विजयपाळास—विमलेच्या पतीस अत्यंत आग्रहानें सर्व मंडळींसह येण्यास लिहिलें. विजयपाळास हा आग्रह मोडवेना, आणि त्यानेंहि अजमीरास जाण्याचा बेत केला.

पण या बेताला विमला अत्यंत प्रतिकूल होती. तिनें आपण साफ येणार नाहीं असें नवऱ्याला स्पष्ट कळविलें आणि आपल्या पोराला नेला तर आपण प्राण देऊं अशीहि त्याला दहशत घातली. परंतु बायकोच्या या त्रागयाला भीक न घालतां आपल्या साडूच्या घरीं निदान आपण मुलाला घेऊन तरी जाणार असा विजयपाळानें निश्चय केला, आणि त्याप्रमाणें त्यानें जय्यत तयारीहि चालविली. दुसरे दिवशीं सकाळीं मंडळी निघणार, पण त्या रात्रीं विमलेनें विलक्षण साहस करून गुप्तपणें जयचंद्राच्या खोलींत प्रवेश केला, आणि त्याला घेऊन ती हिमालयावर आपल्या गुरूकडे—अघोरघंट कापालिकाकडे—एकदम चालती झाली.

मुलगा आणि बायको नाहींशीं झाल्यामुळें विजयपाळास अत्यंत खेद झाला व संतापहि आला. तीं कोठें गेलीं असावीं याचा त्याला प्रारंभीं मुळींच शोध लागला नाहीं. शेवटीं तो तसाच अजमीरास आपल्या साडूकडे गेला. विमलेची हकीकत ऐकून सर्वांना सखेदाश्चर्य वाटलें. कमलेला तर जीवही नकोसा झाला. एके दिवशीं अनंगपाळानें, पृथ्वीराजाला आपल्या राज्याचा अभिषेक करून अरण्यांत तपश्चर्येस जाण्याचा आपला हेतु सर्वांपुढें प्रगट केला. त्याला विजयपाळाची पूर्ण अनुमति मिळून कार्यसिद्धीसाठीं लागेल ती मदत करण्याचें त्यानें आश्वासन दिलें. त्यामुळें सर्वांनाच समाधान वाटलें.

हिमालयांत वैतरणी नदीच्या तीरीं धौम्य नांवाचे एक मोठे तपस्वी होते. ते अनंगपाळाचे गुरु. त्यांच्याजवळ जाऊन रहाण्याचा अनंगपाळाचा विचार होता. नातवाला राज्याभिषेक करण्यापूर्वी एकवार आपल्या तपस्येचें स्थान पाहून यावें म्हणून अनंगपाळ धौम्य मुनीकडे गेला. तेथें त्याला अघोरघंट कापालिकांचीं अनन्वित कृत्यें कळून आल्यामुळें प्रथम त्याचा उच्छेद करण्याचा त्यानें निश्चय केला, आणि तो धौम्याच्या आश्रमांत राहिला.

बायकोचा आणि मुलाचा पत्ता न लागल्यामुळें निराश झालेला विजयपाळ अत्यंत दुःखित झाला. शेवटीं बायको परत येईल अशी त्यानें

एक युक्ति काढिली. आपला धाकटा मुलगा चामुंडराय याला गादीवर बसवून आपण तपश्चर्येला अरण्यांत जाणार अशी कंडी त्यानें उठविली. हेतु हा कीं, ही वार्ता ऐकून तरी जयचंद्राला घेऊन आपल्या बायकोनें ताबडतोब यावें, पण या वार्तेनें तिसराच प्रकार झाला. जयचंद्राला विमलेनें नेलें तेव्हां तेथें चामुंडराय होता, त्यानें ती कोठें जाणार आहे हें ऐकिलें होतें. पण आईच्या भीतीनें त्याला ही गोष्ट बापाला सांगणें झालें नाहीं. आतां आपला वडील बंधु जिवंत असतां आपला बाप आपल्यास राज्यावर बसवितो हें त्या बंधुनिष्ठ मुलाला न आवडून त्यानें आपल्या बापाला आईचा पत्ता सांगितला. त्याबरोबर विजयपाळानें एकदम हिमालयाचा रस्ता धरला. तो प्रथम धौम मुनीच्या आश्रमांत आपल्या सासऱ्याला जाऊन भेटला आणि त्यानें ही हकीगत त्याला कळविली. त्याबरोबर अनंगपाळासही फार खेद झाला, व त्या दोघांनीं अघोरघंटाचा नाश करावयाचा निश्चय केला.

हिमालयाच्या अत्यंत बिकट भागीं चंडीकूट म्हणून एक शिखर होतें. या चंडीकूटावर अघोरघंटाचें वास्तव्य होतें. हा अघोरपंथी शाक्त असून याची शिष्यशाखा फार मोठी होती. अनेक राजघराण्यांतीलहि लोक त्याच्या शिष्यवर्गांत मोडत. तो स्वतः फार क्रूर होता. अनेक मंत्रसिद्धीसाठीं त्यानें तपस्वी लोकांचीं मुलें पकडून बळी दिलीं होतीं. त्यामुळें सारे ऋषि अत्यंत भयभीत होऊन गेले होते. अघोरघंटाच्या आश्रमांत विमला आपल्या मुलास घेऊन आली खरी, पण बरेच दिवस झाले तरी तिला मंत्रसिद्धि मिळेना अथवा तिला घरीं जाण्यास परवानगीहि मिळेना. त्यामुळें ती कंटाळून अघोरघंटाचा पट्टशिष्य कपालेश्वर म्हणून होता त्याच्याचवळ कुरकुरूं लागली. पण तिला आतां अथवा केव्हांहि सोडण्याचा कपालेश्वराचा विचार नव्हता. विजयपाळाला चंडीस बळी देऊन विमलेला चंडीची पट्टशिष्या करून आश्रमांत कायमच्याच ठेवण्याचा त्याचा निश्चय होता. तो त्यानें हळूहळू पण स्पष्टपणें तिला जाणवून सोडला. त्यामुळें विमलेला अत्यंत पश्चाताप झाला, पण आतां पश्चाताप होऊन कांहींच उपयोग नव्हता. तेव्हां या संकटांतून सुटण्यास काय उपाय योजावा याचा ती विचार करूं लागली. आश्रमांतील कोणीतरी माणूस फोडून त्याला आपल्या पक्षाला घ्यावा असा विचार करून अष्टांगवक्र नांवाच्या शाक्ताला ती कपाले-

श्वराविरुद्ध चिथवूं लागली. पण हें तिचें चिथावणें खुद्द कपालेश्वरानें चोरून ऐकून त्यानें तिला एका गुहेंत कोंडून ठेवण्याचा निश्चय केला आणि आपले अत्यंत विश्वासू भिल्ल सेवक रौद्रमुख व वैकंकठ यांना त्यानें तसा हुकूम केला.

कपालेश्वराचा आणि यवनांचा कांहीं गुप्त करार झाला होता. कांहीं एका कामगिरीप्रीत्यर्थ त्याला अजमीरचें राज्य देण्याचें यवन बादशहानें कबूल केलें होतें. त्या बाबतींत कांहीं विशेष योजना करण्यासाठीं रोषनवली नांवाचा एक यवन मंत्रविद्यासाधनाचें निमित्त करून अघोरघंटाकडे आला होता. तो मुंडकोटि नांवांच्या शाक्ताशीं कांहीं बोलत बसला असतां, भिल्लांनीं गुहेकडे चालविलेली विमला त्याच्या दृष्टीस पडली. आणि शाक्तांच्या परस्पर संभाषणावरून त्याला ती कोण, कोणाची वगैरे सर्व माहिती मिळाली. त्यामुळें कपालेश्वर भेटतांच रोषनवलीनें त्याला विमलेविषयीं प्रश्न केला. कपालेश्वर उडवाउडव करूं लागला, पण शेवटीं त्याला खरें तें सांगावें लागलें. विमला कोण हें कळतांच आपल्या बादशहासाठीं म्हणून वलीनें तिची मागणी केली. पण कपालेश्वरानें प्रथम तरी ती अगदीं धुडकावून दिली.

आपली बायको आणि पोरगा अघोरघंटाच्या आश्रमांत आहेत हें कळल्यावर स्वस्थ बसणारा विजयपाळ नव्हता. आपल्या सासऱ्याच्या साहाय्यानें त्यानें कसून शोध चालविला. ही बातमी शाक्तांना कळतांच त्यांची बरीच धांदल उडाली, आणि विमलेला तिच्या मुलासह विजयपाळाकडे पाठविण्याचा अघोरघंटानें निश्चय केला. आणि त्याप्रमाणें त्यानें कपालेश्वराला स्पष्टपणें कळविलें सुद्धां. कपालेश्वरानें पुष्कळ सबबी पुढें आणल्या, विमलेला बळी देऊन चंडीला संतुष्ट करा म्हणून विनविलें, पण नेहमीं त्याच्या ओंजळीनें पाणी पिणाऱ्या अघोरघंटानें आज त्याचें म्हणणें मनावर घेतलें नाहीं, इतकेंच नव्हे तर त्याचा थोडा अपमानही केला.

आधींच विमलेच्या उद्धटपणानें कपालेश्वर चिडला होता, त्यांत हा गुरूकडून अपमान झाल्यामुळें तो अत्यंत पिसाळून गेला. विमलेला तिच्या नवऱ्याकडे परत जाऊं द्यावयाचें नाहीं, आपल्या गुरूचा बेत हाणून पाडावयाचा असा त्यानें दृढ संकल्प केला, आणि असें होण्याला

विमलेला रोषनवलीच्या ताब्यांत देण्यावांचून दुसरा उपाय नाहीं हें स्पष्ट होतें. पण त्याची त्याला परवा नव्हती. विमलेचें कांहीं झालें तरी पुरवलें, पण तिला आणि आपल्या गुरूला आपली कर्तबगारी समजली पाहिजे, असा विचार करून तिला बादशहाकडे घेऊन जाण्याविषयीं त्यानें रोषनवलीस कळविलें.

इकडे विमलेच्या शोधावर पाठविलेलीं विजयपाळाचीं माणसें कांहीं स्वस्थ बसलीं नव्हतीं. त्यांच्यापैकीं एकजण हुषार आणि धीट माणूस मोठ्या युक्तीनें अघोरघंटाच्या आश्रमांत शिरला. कपालेश्वर रोषनवलीच्या ताब्यांत विमला आणि तिचा पुत्र देण्यास तयार झाला आणि ही व्यवस्था कशी करावयाची हेंहि त्यानें रोषनवलीस सांगितलें. त्यावेळीं त्यांच्या जवळच्या एका झाडावर तो माणूस लपून बसला होता. त्यानें कपालेश्वराचें सर्व भाषण ऐकलें आणि तो तेथून एकदम चालता झाला. त्यानें दिलेल्या बातमीवरून विजयपाळ आणि अनंगपाळ सावध होऊन विमलेला सोडविण्याच्या मार्गाला लागले.

कपालेश्वर पक्का बिलंदर. आपला गुरु आपल्यावर फिरला आहे हें पाहून विमला बिनबोभाट एकदां रोषनवलीच्या ताब्यांत जाते कशी याची त्याला विवंचना लागली. मग त्यानें विमलेची गांठ घेऊन तिचें अघोरघंटाविरुद्ध मन वळविण्याचा प्रयत्न केला. आपला गुरु मोठा दुष्ट तो तुला रोषनवलीच्या स्वाधीन करणार आहे, तर तूं आपण देतों या भिल्लांबरोबर गुपचूप आश्रमाच्या बाहेर पड. अगदीं गडबड करूं नको. नाहींतर गुरूला शंका येऊन तो तुला पकडील अशी तिला भीति घातली. हेतु हा कीं, ती भिल्लांबरोबर एकदां मुकाट्यानें बाहेर पडली म्हणजे तिला रोषनवलीच्या ताब्यांत सहजपणें देतां यावें.

रोषनवलीही काबुलच्या बादशहाचा बातमीदार होता. कांहीं विशेष कामगिरीकरितां त्यानें त्याला हिंदुस्थानांत पाठविलें होतें आणि त्याची परत यावयाची मुदत होतांच तो काय बातमी आणतो हें पहाण्याच्या उत्कंठेनें तो आपल्या दोनच नोकरांसह पुढें आला होता. वकीलसाहेबांबरोबर असलेल्या अबदल्ला नांवाच्या शहाण्या नोकरानें पुढें येऊन मंडळी येत असल्याचें कळविलें आणि थोड्याच वेळांत रोषनवली विमलेसह तेथें आला. विमला आणि जयचंद यांना कांहीं कैफ दिला असून त्यांचें गाठोडें एका

भिल्लाच्या खांद्यावर होतें. तें गांठोडें पुढें आल्यावर तें सोडण्याचा शहानें हुकूम केला. पण हा हुकूम अमलांत येत असतां एक फार चमत्कारिक गोष्ट घडली. अत्यंत विश्वासू म्हणून जो भिल्ल विमलेला घेऊन आला होता तो आतां एकदम फिरून तिच्या अंगाला कोणास हात लावूं देईना ! त्यामुळें चिडून अबदुल्ला त्याच्या अंगावर धांवला दोघांची खूपच झोंबाझोंबी झाली. पण वैकंकठ भिल्ल फारच बळकट होता. अबदुल्लाचें त्याच्यापुढें कांहींच चालेना इतकेंच नव्हे; तर शेवटीं भिल्लाच्या हातून जिवंतपणीं सुटत नाहीं असें दिसलें. तेव्हां वलीसाहेबांनीं विमलेला स्पर्श करण्याचा आव घातला. त्याबरोबर अबदुल्लाला सोडून भिल्ल तिकडे वळला. आतां अधिक दिरंगाई करणें बरें नव्हे असें जाणून शहानें आपली फरशी भिल्लावर उगारली. पण ती मागच्या मागें एका भिल्लानें काढून घेतली. तो मागें पाहतो तों कांहीं रजपूत लोक येतांना दिसले. क्षणार्धांत विजयपाळ आणि अनंगपाळ यांच्या लोकांनीं या मंडळींना वेढा दिला !

आपलें आतां कांहीं चालावयाचें नाहीं, मुकाट्यानें काढता पाय घ्यावा असा विचार करून यवनांचा मुख्य म्हणाला आपण शिकारीकरितां सहज आलों होतों, तुमची खोडी करण्याचा आपला मानस नव्हता, तरी आपल्याला मुकाट्यानें जाऊं द्यावें. तेव्हां अनंगपाळानें क्षत्रियाच्या शीलाप्रमाणें त्याला निघून जाण्यास सांगितलें. त्याला पकडावें म्हणून विजयपाळानेंही सांगितलें. पण त्यानें कोणाचें ऐकलें नाहीं. आणि याप्रमाणें विमलेची सुटका झाली व यवन लोक तेथून निघून गेले.

## २. अंकुरोद्भव.

अशा विलक्षण प्रसंगांतून मोठ्या कष्टानें विमलेची सुटका झाल्यामुळें विमला भारीच खिन्न झाली आणि ती सारा वेळ आपल्याशींच विचार करीत एकांतांत बसून असे. ती कोणासहि—म्हणजे तिचें जयचंद्रावर इतकें प्रेम पण त्यासहि—भेटत नसे. अशा प्रकारें चार एक महिने गेल्यावर अनंगपाळाकडून विजयपाळास पत्र आलें कीं, पृथ्वीराजाला सिंहासनावर बसवून तपोवनांत रहाण्यास जाण्याचा आपला निश्चय झाला असून मुहूर्तहि ठरविला आहे. तरी या समारंभास तुम्हीं

सर्वांनीं अवश्य यावें. त्याप्रमाणें जाण्याचा विजयपाळाचा निश्चय झाला. आपली बायको कांहीं यावयाची नाहीं, तेव्हां तिला मुळीं कांहींच न कळवितां आपल्या दोनही मुलांना घेऊन दिल्लीस जाण्याचा त्यानें बेत केला आणि त्याप्रमाणें तयारी चालविली. विमलेला ही बातमी मुळींच कळूं नये अशी विजयपाळाची इच्छा, पण तीं शेवटास नेणें त्याच्या हातचें नव्हतें. असली बातमी गुप्त कशी राहणार ? शेवटीं ती विमलेच्या कानावर गेलीच. अर्थात् तिला विलक्षण राग आला. आपण ज्याचें तोंडही पाहूं इच्छित नाहीं त्यांच्या घरीं आपला पति आपल्या पोरांना घेऊन जाणार–आणि तेंहि आपणाला त्याची वास्तपुस्तहि लागूं न देतां–याचा तिला भारी संताप आला. एकदां तिला वाटलें आपणहि समारंभास जावें. आपण अशा अज्ञातवासांत बसलों म्हणूनच आपलें असें नुकसान झालें. मुख्य गादी बाहीं तर नाहीं, पण निदान कांहीं मुलूख तरी आपल्या पोराला मिळाला तर पहावा असें तिला वाटलें. पण मधल्या प्रकारानें तिला लोकांत पुढें येण्याची लाज वाटूं लागली. शेवटीं आपल्या पोरालाच फितवावें आणि त्यानें आपण हस्तिनापुरास येत नाहीं असें सांगावें, असा विचार करून त्याला तिनें ताबडतोब पत्र पाठविलें पण कांहीं तरी सबब सांगून पोरगा कांहीं तिच्याकडे आला नाहीं. त्यामुळें ती पुनः चिडून गेली. ज्याच्याकरितां आपण इतकी धडपड करतों, इतक्या संकटांत पडलों तो पोरटाच आपल्यास विचारीत नाहीं तर मग या घरांत रहायचें तरी कशाला ? आपण आपलें अघोरघंटाजवळ त्या पुण्यस्थानीं आपलें आयुष्य घालवावें हेंच बरें असें तिला वाटलें. कपालेश्वराच्या म्हणण्याप्रमाणें आपण चंडीजवळ कायमच्या रहातों तर बरें झालें असतें असें तिला वाटूं लागलें आणि पुनः तिकडे जाण्याची तिच्या मनानें उचल खाल्ली. अशा अत्यंत विपन्न मनःस्थितींत ती होती.

---

# काळकूट.

## ( पुस्तक पहिलें. )

## बीजारोपण.

## प्रकरण १ लें.

[ दिल्लीश्वर राजा अनंगपाळाचा एकुलता एक पुत्र वारल्यामुळें त्याच्या दोघी मुली त्याला भेटायला आल्या. वडील बहीण विमला हिच्या मनांतून बापानें आपला मुलगा जयचंद याला राज्य द्यावें असें होतें. पण म्हाताऱ्याचा ओढा धाकट्या मुलीचा—कमलेचा मुलगा पृथ्वीराज याच्याकडे अधिक होता. याचा विमलेला फार द्वेष वाटून ती आपल्या बहिणीचा वारंवार पाणउतारा करूं लागली अशाच एके प्रसंगीं अगदीं क्षुद्र कारणावरून बिमलेनें त्रागा केला आणि ती आपल्या घरीं जावयाला निघाली. तिचा मत्सर, खुनशीपणा पाहून अनंगपाळही संतापला आणि त्यानें तिचें तोंडही न पहाण्याचा निश्चय केला. अशा रीतीनें कडाक्याचें भांडण होऊन विमला आपल्या मुलासह निघून गेली. ]

### दोघी बहिणी.

राजा अनंगपाळ मोठ्या कौतुकानें आपल्या दोघां नातवांकडे पहात होता. सूक्ष्मपणें पहाणारास त्या कौतुक दृष्टींत किंचित् खेदही दिसला असता. आणि तसा वृद्ध रामगुरु पुरोहितास दिसलाही. राजानें आपल्या दोनही मांड्यांवर दोघां नातवांस बसवून त्यांच्या बालकलहाचा इन्साफ करण्यासाठीं चौकशी चालविली होती. बालकलहाचें मूळ कोणी कोणत्या मांडीवर बसावें यांत होतें. पृथ्वीराज म्हणे, " मला डाव्या मांडीवर बसूं द्या

आणि जयचंद्राला उजवीवर बसवा. " जयचंद्र म्हणे, " नाहीं. मला डाव्या मांडीवर बसवा आणि पृथ्वीराजाला उजवीवर बसवा. " तो आजोबाच्या कोणत्या मांडीवर कोणीं बसावें याबद्दलचा वाद व त्याकरितां एकमेकांची चाललेली ओढाताण पाहून अनंगपाळास, रामगुरु पुरोहितास, आणि कमला देवी आणि विमला देवी या दोघींस फार हंसूं येत होतें. बाललीलाच ती, ती पहातांना कोणास आनंद होऊन हंसूं येणार नाहीं ? पलीकडे दासदासी उभ्या होत्या त्यांना सुद्धां किती तरी हंसूं कोसळत होतें, परंतु राजाच्या देखत हंसावें कसें म्हणून तोंडें वळवून तीं आपलें हंसूं न दिसण्याचा प्रयत्न करीत होतीं.

तंटा बराच वाढून एकमेकांच्या वस्त्रांची ओढाताण फारच होऊं लागली असें पहातांच रामगुरु पुरोहित सहजगत्या म्हणाला:– " वत्सांनो, कसलारे वाद करतां ? कुमार धनंजयराज आज असता तर तुम्हां दोघांनाही दूर सारून म्हणता:– 'तुम्ही दोघेही खालीं बसा. तिथें बसण्याचा हक्क माझा आहे ! "

तें वृद्ध गुरूचें भाषण ऐकतांच अनंगपाळानें त्याच्याकडे एकदम पाहिलें व दीर्घ उसासा टाकून तो म्हणतो:– " गुरुवर्य, कशाला त्याचं नांव काढतां!" राजानें नुसता उसासा टाकूनच संपलें नाहीं. त्याचे डोळे पाण्यानें भरूनही आले. कमलेची चर्या एकदम फार खिन्न झाली आणि तिच्या डोळ्यांतून अश्रुधाराच वाहूं लागल्या. ती सद्गदित वाणीनें पुरोहितास म्हणाली, " गुरुजी, कशाला त्याचं नांव काढतां ? तो आज असता तर... " परंतु तिच्यानें पुढें बोलवेचना.

विमलेची मात्र फार निराळी स्थिति झाली. तिच्या कपाळास आंठ्या पडल्या, तिच्या चर्येवर किंचित् क्रोध, व किंचित् मत्सर या दोहोंच्या छटा दिसल्या आणि ती गुरुजींस म्हणते:– " हें हो काय तुमचं असलं गुरुजी ? जेव्हां तेव्हां धनंजय असता तर तुम्हांला दूर सारलं असतं. धनंजय असता तर बाबांनीं असं केलं असतं. हें जें तुम्ही म्हणतां याचा अर्थ तरी काय ? आम्हीं कांहीं अनुष्ठानं का बातलीं होतीं धनंजय मरावा म्हणून. तो असता, जगता तर आम्हांलाही हवाच होता. पुरोहितांना लघळपणाच फार... "

परंतु कमलेनें मध्येंच तिला म्हटलें " ताई, ताई, तूं हें काय–आणखी कोणाला म्हणतेस ? ज्यांचा आज वसिष्ठासारखा अधिकार, त्या वृद्ध पुरोहितांना–रामगुरूंना!–तूं हें बोलते आहेस याचं भान तरी आहे का तुला ? उगीच एवढ्यावरून तेवढ्यावरून रागवावं ? पुरोहितांनीं बोलून दाखविलं, पण हे दोघे आपसांत ओढाताण करूं लागले तेव्हांच माझ्या ओंठावर शब्द

आले कीं, " लबाडांनो, त्या मांडीचा खरा मालक गेला, म्हणून तुमच्या या गमजा ! ताई, कुमार धनंजय किती चांगला होता ! ... "

" बरं. बरं. तूंही गुरुजींसारखीच चोंबडी आहेस हें काय मला माहीत नाहीं ? तीन तीनदां तुम्ही तो असा होतान् तो तसा होता म्हणून म्हणतां, तें मी त्याला वाईट का म्हणते आहें ? होता. फार चांगला होता. पण त्याचा उच्चार करून माझ्या जयचंदाला हिणवण्यांत कोणचा शहाणपणा ? तुला जयचंद डोळ्यांसमोर नको हें मला कांहीं समजत का नाही ? पण मी कांही वाई तुझ्या अशा करण्याला न् बोलण्याला भ्यायची नाहीं ! "

" शिव ! शिव ! शिव ! ताई, हें काय हें ? आपण इथें आलों त्या कोणत्या प्रसंगानं, आणखी तूं बोलतेस काय रोंखानं ? मला ! आणखी तुझा जयचंद डोळ्यांसमोर नको ? कांग बाई नको ? मला तर तो माझ्या पृथ्वीराजाप्रमाणें आवडतो. एक वेळ मी त्याला जवळ करीन आणखी पृथ्वीराजाला दूर करीन ! "

" तर ! तर ! तर ! तर ! केवढी साळसूद तूं ! अग मला तुझ्या युक्त्या समजत का नाहींत. सगळ्या समजतात !......... "

राजा अनंगपाळ इतका वेळ स्तब्धपणें त्या दोघीकडे पहात होता. त्याचा चेहरा अतोनात खिन्न झाला होता. आतां त्याच्यावर त्रासाचीही लकेर दिसत होती. बाललीला तर थांबल्याच. ते दोघे लहान मुलगेही आपली ओढाताण थांबवून चकित होऊन क्षणभर आपापल्या आयांकडे पाहूं लागले.

विमलेची बडबड चालूच होती. ती दाबण्यासाठीं शेवटीं अनंगपाळ तिला म्हणतो: " विमले, तूं अशी एकदम भांडणावर काय म्हणून येतेस ? मला तर हे दोघे सारखेच आहेतना ? आणखी माझा स्वत:चा असता, म्हणून मीं यांना दूर केलं असतं ! असं थोडंच आहे, तो असता म्हणून काय अधिक झालं असतं ? दोन दिवस इथें आलां आहां, त्या भांडणतंटे आणखी रुसवारुसव्या होऊन जाऊं नका. "

परंतु विमलेला त्या बोलण्याचें कांहीं वाटलें नाहीं. ती उलट आपल्या बापास म्हणते:—" बाबा तुम्ही भोळे आहां, तुम्हांला हिचं कपट कांहीं समजून येत नाहीं. अहो, हिच्या मनांत काय आहे हें आपल्या लक्ष्यांत येत नाहीं, पण मी जिवंत आहें तोंपर्यंत हिची ही खटपट कधीं चालूं देणार नाहीं. हिचा मुलगा तेवढा मोठा चांगला, ही तेवढी चांगली, आणखी आम्ही दोघं वाईट असं तुम्हांला भासवायचा जेव्हां तेव्हां तिचा यत्न

चाललेला असतो, हें धडधडीत मला दिसत नाहीं का ? आणखी हे रामगुरु पुरोहित तिला सामील ! ”

तें ऐकून अनंगपाळ फारच खिन्न झाला. तरी तिला म्हणतो: “ विमले, कां उगीच आपल्याच संशयानं आपल्या मनाला त्रास करून घेतेस ? तिनं बिचारीनें काय केलं ? एक शब्द तरी ती तुझ्याबद्दल कांहीं बोलली ? या दोघांना पाहून तिला त्याची आठवण झाली आणखी त्याबरोबर तिनें उद्गार काढला यांत तुझा संबंध काय ? आणखी उगीच......”

“ हेंच. हेंच तें. ” विमला कर्कश वाणीनें म्हणाली, “ माझं बोलणं उगीच, आणखी तिचं मात्र मोठं चांगलं. बाबा, तुमच्या मनांत हें जें वाटायला लागलं याला कारण कोण ?– हें का मला समजत नाहीं ? मला सगळं समजतं. आणखी तुम्ही असा तिचाच सदोदित कैवार घेऊं लागलां तर मी इथें पाऊलसुद्धां घालायची नाहीं. हा माझ्या येण्यानं आपल्याला जर त्रास होतो, तर मग मी येऊं तरी कशाला ? ”

रामगुरु पुरोहित इतका वेळ अगदीं स्तब्ध बसला होता, तो आतां मध्येंच म्हणाला, “ पोरी, तूं जर इथें न आलीस तरच महाराजांस चार दिवस समाधानाचे जातील यांत बिलकूल शंका नाहीं. महाराजांचा अंत–रात्मा दुःखांत तळमळतो आहे, आणखी समाधान करायला म्हणून येऊन त्यांना......

परंतु अनंगपाळानें त्याला पुढें बोलूं दिलें नाहीं, तो त्या आपल्या नातवां-कडे वळून मोठ्यानें म्हणाला, “ वत्सांनो, तुम्ही रामलक्ष्मणांप्रमाणें एक-मेकांशीं वर्तन करा बरं का ? अगदीं एकमेकांशीं भांडूं नका. आमच्या कुळाचे गुरु हे रामगुरु पुरोहित तुम्हांला धनुर्वेद शिकवितील. पाहूं बरं तुमच्यापैकीं कोण त्यांच्यापासून विद्याग्रहण चांगल्या प्रकारें करतो तें. एक मासानें मी तुमची परीक्षा घेईन आणखी जो त्या परीक्षेंत आपली कुशलता उत्तम दाखवील त्याला मी मांडीवर बसूं देईन. म्हणजे तुमचा तंटाच मिटला. मग तर झालंना ? तुम्ही उगीच आतां एकमेकांशीं ओढाताण करूं नका. गुरुजी, दोघांनाहि उत्तम धनुर्ष्ये द्या बरं का. यांना शब्दवेध पहिल्या-पासून शिकवा म्हणजे तो साधेल. मोठेपणीं मुळींच साधायचा नाहीं. ”

“ नको. नको. नको. माझ्या मुलाला हे रामगुरु शिकवायला नकोत. परीक्षाच घ्यायची असेल तर जयचंद्राला मी आपली दुसऱ्या कोणाकडून शिकवीन आणखी मग परीक्षा घ्या. बाबा, यांचा सगळा ओढा कमलेकडे

आणखी तिच्या पोराकडे आहे. हे का माझ्या जयाला कांहीं शिकविणार आहेत ! एखादे दिवशीं त्याच्या जिवावर न आणोत संकट म्हणजे झालं!"

" शिव शिव ! शिव शिव ! चांडाळणी, " रामगुरु संतप्त होऊन एकदम म्हणाला " चांडाळणी, हें काय बोलतेस हें ? तुझ्या जिभेला कांहीं हाड आहे ? तुझं मन बनलं आहे तरी कसं ? राजा ! हिचं अंतःकरण हें अंतःकरण नाहीं. कालकूटाचा कुंभ आहे. हा कुंभ काय काय घात करील याचा नेम नाहीं. तेव्हां आतां माझा निश्चय हाच कीं......"

" छे. छे. गुरुजी, आपण या पोरीच्या मूर्खपणाच्या बडबडीकडे काय लक्ष देतां ! विश्वामित्राजवळ जशी रामलक्ष्मणाची जोडी शस्त्रास्त्र विद्येंत तयार झाली, तशीच ही जोडी तयार करा. आपण या वेडगळ पोरीचं काय ऐकतां ? "

' राजा अनंगपाळा, नाहीरे नाहीं. तूं असा प्रेमानें अंध होऊं नकोस. हा पृथ्वीराज रामासारखा निपजेल खरा, परंतु हा जयचंद हिच्या शिक्षेखालीं लक्ष्मणासारखा न होतां रावणासारखा मात्र निपजेल. माझी ब्राह्मणाची वाणी कधीं सुद्धां अन्यथा होणार नाहीं, हें तूं पक्कें समज. हे कैकेय देशाचें बीज सगळा सत्यानाश केल्याखेरीज......"

परंतु रामगुरूनें तें वाक्य अर्धवट सोडलें. सोडलें म्हणण्यापेक्षां पुढें कांहीं बोलूं न बोलूं असा विचार करीत असतांच विमला त्याजवर एकदम कडाडली.

" भट्टुरड्या, माझा मुलगा रावण झालेला पतकरला, परंतु लक्ष्मण होऊन या कैदासणीच्या कारट्याचं आजन्म दास्य कधींही करणार नाहीं. समजलास. "

विमलेला पुढें बोलवेना. तिच्या अंगाला संतापानें कांपरें भरलें, ओंठ थरथरूं लागले. संताप इतका झाला कीं अंगांतून त्याच्या वाफा निघतात कीं काय असें दिसूं लागलें. तिनें खस्‌कन् आपल्या मुलाचा दंड धरून त्याला आपल्याजवळ ओढला. आणि त्याला म्हणतेः—" कारट्या, तुला तरी हें भांडण सांगितलं कोणी ? नाहीं त्या मांडीवर बसलास तर काय तुझा प्राण जाईल, तुला तुझ्या—ची मांडी नाहीं. तुला देवानं मुळींसुद्धां गरज ठेवली नाहीं. ज्यांना गरज असेल त्या भिकारड्यांनीं लोकांचीं मनं बिघडवावीं, लोभानं दुसऱ्याचा सत्यानाश करावा, काय वाटेल तें करावं. आपल्याला तसं कांहींसुद्धां करायची जरूर नाहीं. असलं तुझ्या अंगांत पाणी, तर

जिंकून नाहीं का घेतां येणार ? बाबा, मी कांही आता इथें राहात नाहीं, आपल्यासाठीं म्हणून मी आलें पण आपलंच जर मन माझ्याबद्दल चांगलं नाहीं, तर रहाण्यांत तात्पर्य तरी काय? मी जातें. तुम्ही खुशाल या कमलेची भर करा. ती तुमच्या आवडत्या बायकोची आहे. मी कैकेयीची आहें. या लांब दाढीच्या भटुरग्याला बोलायला तरी वाटलं का कांहीं ? "

इतकें बोलून तिनें पुनः खसकन् आपल्या पोरास ओढलें व तेथून ती मंथरासंचार झालेल्या कैकेयीप्रमाणें दाणदाण पावलें टाकीत चालती झाली.

राजा अनंगपाळ, रामगुरु पुरोहित, कमला व दासदासी मंडळी आश्चर्य-स्तब्ध होऊन नुसतीं खालीं जमिनीकडे पहात राहिलीं होतीं. कमला अत्यंत कष्टी होऊन रडूं लागली होती. तिचे हुंदके तिला आवरेनात तें पाहून अनंग-पाळासही गहिंवर आला आणि त्यानें उठून कमलेस पोटाशीं धरून म्हटलें, "वत्से, अशी रडतेस कां ? तुला तिचा स्वभाव ठाऊक नाही का ? उगी." परंतु कमलेला आपलें रडूं आवरेना. ती अधिकच ओक्साबोक्शीं रडूं लागली. अनंगपाळानें तिचें नानाप्रकारांनीं शांतवन केलें. तेव्हां ती थोडी शांत झाली आणि म्हणाली, "बाबा , माझ्या पृथ्वीराजाला तुम्ही राज्य द्यावं, त्याला दत्तक घ्यावं या हेतूनं का हो मी तुमच्यावर प्रेम करतें ? विमलाताईनं असं मला बोलावं का ? मीं असं काय केलं आहे ? ती कां माझा असा तिटकारा करते ? "

परंतु तिच्या प्रश्नांना अनंगपाळानें एकच उत्तर दिलें, तें तिला पोटाशीं धरून "जाऊं दे, तूं काय तिच्या नादीं लागतेस. ती अशीच कुरठी आहे" असें म्हटलें, हें होय.

वरील हकीकत हस्तिनापुरास—दिल्लीस—अनंगपाळमहाराजांच्या राजवाड्यांत घडली. अनंगपाळ हा दिल्लीचा राजा, हा वयानें अतिशय वृद्ध झाला होता. याला कित्येक वर्षेपर्यंत मुळींच अपत्य झालें नाहीं. अर्थातच प्राचीनकाळच्या रीतीप्रमाणें त्यानें आणखी दोघी बायका केल्या. त्यांपैकीं एक कैकेयदेशच्या राजाची मुलगी व दुसरी कोसलदेशच्या राजाची. त्या दोघी बायकांना दोन मुली झाल्या. कैकेय देशच्या राजाच्या मुलीच्या पोटीं विमला झाली व कोसल कन्येच्या पोटीं कमला झाली. विमला ही कनोजचा राजा विजयपाळ यास दिली; तिच्या पोटीं जयचंद झाला. कमला ही अजमेर ऊर्फ द्रोणगिरीचा राजा सोमेश्वर यास दिली; तिचे पोटीं पथ्वीराज झाला.

अनंगपाळास वर सांगितलेल्या दोनच मुली झाल्या असें नाहीं. कमलेच्या पाठीवर राजास एक पुत्र झाला त्याचें नांव धनंजय असें ठेविलें. हा पुत्र झाला तेव्हां हस्तिनापुरांत फार प्रचंड उत्सव झाला. राजानें आपलें द्रव्य खर्चून उत्सव केला, तो असो. पण राजधानींतल्या प्रत्येक व्यक्तीनें आपआपल्या परीनें त्या उत्सवांत भर घातली. तो मुलगा सुमारें चार वर्षांचा होऊन एकाएकीं कोठें उंचावर चढत असतां पडून धनुर्वात होऊन वारला. जिकडे तिकडे हाहाःकार उडाला ! राजाला व राण्यांना जो शोक झाला तो तर कांहीं विचारूंच नये. साठी जवळ आली असतां झालेला पुत्र—जो केवळ आपल्या सर्व आशांचा आधारस्तंभ, जो केवळ दुसरा जीव तोच जर एकाएकीं यमानें हिरावून नेला, तर आतां राहिलें काय ? राजाला तर स्पष्ट असें वाटलें कीं आपण आतां जगण्यांत काय अर्थ आहे ! आपण अग्निकाष्ठें भक्षण करून आपल्या पूर्वजांपैकीं कित्येकांप्रमाणें इहलोक सोडणार असें ज्याला त्याला त्यानें सांगितलें. तें ऐकल्या दिवसापासून सगळ्या राज्यभर कोणास चैन पडेनासें झालें. आणि राजानें असें करूं नये म्हणून पुष्कळांनीं त्यास शांतवनाच्या गोष्टी सांगितल्या. राजाच्या मुलीही आल्या होत्याच. तेव्हां हलके हलके राजाच्या दुःखाला विसर पडत चालला आणि थोडे दिवसांत बराच विसर पडला. राजाचे दोघे नातू आयांबरोबर आलें होते, त्यांच्या लीला त्याच्यापुढें चालत यामुळेंहि त्याला विरंगुळा झाला. थोडे दिवस हें सर्व ठीक झालें. परंतु पुढें राजाच्या दुःखास एक निराळेंच कारण उद्भवतेंसें वाटण्यास कारण झालें.

राजाची थोरली मुलगी विमला ही स्वभावानें मोठी खुनशी, कुरठी, संशयी व लोभी अशी होती. तिची उत्कट इच्छा कीं आपला भाऊ आतां वारला, दुसरा भाऊ होणें कांहीं शक्य नाहीं. तेव्हां आपल्या मुलावर आपल्या बापाची प्रीति जडून त्यानें त्यास आपल्या राज्याचा स्वामी करावें. म्हणजे तो सार्वभौम राजा होईल. आणि त्या हेतूनें ती आपल्या मुलाला राजाच्या पुढें पुढें करी, परंतु कांहीं कांहीं कारणांनीं तिला असें वाटूं लागलें, कीं, आपल्या बापाचें चित्त आपल्या मुलापेक्षां कमलेच्या मुलाकडे फार ओढतें. त्याप्रमाणें तिला असेंही दिसून आलें, कीं दरबारांतल्या मंडळीचें चित्तही आपल्या मुलापेक्षां कमलेच्या मुलावरच फार आहे. हा संशय आल्यापासून तिचें मन फार बावरलें आणि दिवसानुदिवस तिच्या मनाची स्थिति फार चमत्कारिक होऊन तिची वागणूकही लोकांचे मनांत तिरस्कार उत्पन्न करूं लागली. जों जों लोक आपला तिरस्कार दाखवूं लागले तों तों अर्थातच हिच्या मंनार्पिपणालाही

भरतें येऊं लागलें आणि त्यांत लोक कमलेला वाखाणून तिच्या मुलावर प्रेम करूं लागलेसें तिला दिसतांच तिचा मत्सराग्नि फार जोरानें भडकूं लागला.

कमला बिचारी अगदीं गरीब. तिच्या ध्यानींमनींही या गोष्टी नव्हत्या. ती अगदीं सरळ, तिला जयचंद्राविषयीं आपल्या मनापासून प्रेम वाटे. आणि विमला आपली सावत्र परंतु वडील बहीण म्हणून ती तिचा फार आदर ठेवी. कोठेंही जावयाचें झालें तरी तिच्याखेरीज जावयाचें नाहीं. कांहींही करावयाचें झालें तरी तिला विचारल्याखेरीज करावयाचें नाहीं. परंतु विमलेची दृष्टि अगदीं कलुषित झालेली. तिला कमलेचें सगळें वर्तन ढोंगीपणाचें व लबाडीचें वाटे. ती फार लबाड असून आपला व आपल्या पोराचा घात करावयास पहाते आहे. आपल्याविषयीं बापाच्या मनांत वाईट भरवून टाकून आपलें काम साधते आहे. अशा भयंकर संशयानें तिच्या मनाला पक्कें पछाडलें. कोणी सहजगत्या कां कांहीं बोलेना, वांकड्या आरशापुढें ठेवलेल्या वस्तूच्या प्रतिबिंबाप्रमाणें तिच्या मनांत वेडावांकडा अर्थच यावयाचा. कोणी सहज एखादेवेळीं तिला "कसं काय" म्हणून जरी प्रश्न विचारला, तरी त्या विचारण्यांत कांहीं तरी दुर्हेतु आहे असें वाटावयाचें, अशा स्थितींतच या प्रकरणाच्या पूर्व भागांत सांगितलेला भयंकर वाद-प्रवाद झाला.

विमला फार संतापली. आतां या वाड्यांत पाण्याचा एक थेंब कीं अन्नाचा एक कण घ्यावयाचा नाहीं अशी तिनें शपथ वाहिली आणि एक-दम आपल्याबरोबर आलेल्या लव्याजम्याला तिनें हुकूम दिला कीं "आतांच्या आतां आपणांस येथून निघून घरीं परत जावयाचें आहे. कोणी एका क्षणा-चाही विलंब करतां कामा नये. येथें मला यापुढें पाण्याचा घोटही घ्यावयाचा नाहीं." झालें. तिच्या लोकांनीं अर्थातच तयारी केली. हें राजा अनंगपाळाला कळलें. आपली मुलगी आपल्या दुःखस्थितींत अशा प्रकारें आपल्यापासून जावी हें अर्थातच त्यास फार फार वाईट वाटलें. तिच्या अलीकडच्या वर्तनामुळें, ती गेली तर बरी असें त्याच्यासुद्धां मनांत येई नाहीं असें नाहीं. परंतु असें भयंकर भांडण करून विलक्षण शपथा घेऊन तिनें जावें हें त्याला बरें वाटलें नाहीं. म्हणून राजा तिच्या खोलींत गेला व तिला त्यानें विनवून म्हटलें "विमले, तूं किती संतापलीस आणि कांहीं जरी म्हटलंस तरी तूं माझी मुलगी आहेस. प्रेम हें पुढें ओढवतं त्याप्रमाणें माझं तुझ्या ठिकाणीं आहे. तें तूं किती जरी मागं लोटलंस तरी मागं जाणार नाहीं.

तेव्हां तूं असं कांहीं करूं नको. तुला जायचं तर तूं जा. तूं आपल्या घरीं गेल्याचं दुःख नाही. परंतु अशा संतापानें शिव्याशाप देत जाऊं नको. शांत हो. तुझं मन स्वस्थ होऊं दे. मनांतील किल्बिश काढून टाक. आणखी मग मी तुझी चांगली पाठवणी करीन. ”

तो अत्यंत वृद्ध राजा आपल्याच पोरीजवळ इतक्या दीनवाणीनें बोलतो आहे हें पाहण्याबरोबर कोणासही भडभडून आलें असतें. परंतु त्या त्याच्या मत्सरी मुलीस त्याचें कांहींसुद्धां वाटलें नाहीं. उलट ती त्यास म्हणतेः— “ बाबा, आतां कां उगीच असं बोलतां ? तुमचं सगळं मन त्या कमलेवर आणखी तिच्या कारट्यावर. पायाखालीं तुडविली जाणाऱ्या मातीइतकीसुद्धां कोणी मला किंमत देत नाहीं. मग मी इथें कशी राहूं ? नाहीं. आतां मीं पक्का निश्चय केला आहे, की इथें याउपर पाणी प्यायचं नाहीं. त्यांतून तुम्हांला मीं इथें रहावं असं वाटत असलें तर कमलेला व तिच्या कारट्याला इथून घालवून द्या. ती आणखी मी याउपर एका छपराखालीं रहाणं शक्यच नाहीं; एक मला तरी पतकरा किंवा तिला पतकरा. मी हवी का इथें ? तिला घालवा. ती हवी ? मी आपली जातें आहें, मला जाऊं द्या. आणखी काय सांगूं ? ”

राजाला तिचें बोलणें फार वाईट लागलें. असें वाटलें कीं खुशाल तिला जाऊं द्यावें, परंतु प्रेम मोठें वेडें असतें. क्षणार्धांत त्याला पुनः वाटलें कीं हिनें असें जाऊं नये. म्हणून तो पुनः तिला म्हणतोः “ काय म्हणतेस ? तिला मी घालवून देऊं ? तूं जाते आहेस तर मी तुला जाऊं नको म्हणतों आहें आणखी ती माझ्याकरितां इथें रहाते आहे तर तिला चालती हो म्हणून सांगूं काय ? ”

“ काय ती तुमच्याकरितां रहाते आहे ? ” विमला दांतओठ खाऊन राजास म्हणतेः— “ बाबा, बाबा, ती तुमच्याकरितां नाहीं, तुमच्या मृत्यूकरितां रहाते आहे समजलांत ? तुम्हांला लवकर मृत्यु आला नाहीं तर ती तो आणील. तो आणण्याकरितां ती रहाते आहे. तिला तुम्ही नको. तुमचं राज्य तिला आपल्या कारट्याकरितां पाहिजे आहे ! ”

तें ऐकतांच राजासही अतिशय संताप आला; त्याचे हातपाय त्या संतापाच्या भरांत कांपूं लागले. तोंडांतून शब्द निघेनात. तथापि तो त्वेषानें म्हणालाः— “ दुष्टे, नीच. नीच. माझ्या डोळ्यांसमोरून चालती हो. कां उगीच त्या प्रेमळ पोरीची निंदा करतेस ? तुझ्यासारखं तिचं मन नाहीं.

याउपर तुझें तोंड माझ्या दृष्टीस पडलं तर मी सचैल स्नान करीन; काळें कर. ''

विमला चपापली, दबली. पुढें कांहीं बोलली नाहीं, पण कमलेसंबंधाचा तिचा खुनस शतपट वाढून ती तेथून चालती झाली.

---

# प्रकरण २ रें.

[ अनंगपाळानें आपल्या नातवाला-पृथ्वीराजाला आपल्याजवळच ठेवून घेण्याचा निश्चय केला. आपली बहीण अशा प्रकारें गेली असतां आपण एथें रहाणें बरें नव्हे असें कमलेला वाटलें, पण बापापुढें तिचें कांहीं चाललें नाहीं. अनंगपाळानें पृथ्वीराजाला रामगुरु पुरोहिताच्या स्वाधीन शिक्षणासाठीं केलें. रामगुरु शस्त्रविद्येंत फार प्रवीण होता. त्याच्या घरीं चंद्र नांवाचा भाटाचा एक मुलगा आधींच अध्ययनासाठीं आला होता. तो फार हुषार आणि सद्गुणी होता. त्याची आणि पृथ्वीराजाची फारच गट्टी जमली. दोघेहि परस्परांना पळभरहि विसंबत नसत. सुखप्रसंगाप्रमाणें संकटप्रसंगींहि ते एकमेकांला पाठीराखे होत. एका प्रसंगीं तर त्याच्यासाठीं पृथ्वीराजानें आपलें जीवितही धोक्यांत घातलें होतें. इकडे विमला मत्सरानें आंधळी होऊन गेली होती. ती आपल्या मुलास नाना तऱ्हांनीं चिथावून त्याच्या कोंवळ्या मनांत विषाचें बीजारोपण करीत होती. तिच्या बोलण्याचा जयचंदाच्या बालमनावरही परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं.]

## बाळपणचे स्नेही.

ज्यांगला सुदिन असतां एकाएकीं मेघ गर्जना होऊं लागाव्या, विजांचा कडकडाट व्हावा, अगदीं कृष्णवर्ण अशा अभ्रपटलानें आकाश झांकून अंधार पडावा—आणि त्यामुळें त्या सुदिनाचा दुर्दिन व्हावा तशी त्या दिवशीं अनंगपाळाच्या वाड्यांतली स्थिति झाली. विमला आल्या-नंतर काय चार दिवस स्वस्थ असेल तेवढीच. आपला भाऊ वारला म्हणून बापाच्या समाधानाला आलेली मुलगी त्याच्या असमाधानाला कारण झाली. धनंजय वारला, आतां बापाच्या गादीवर मुलाला बापानें बसवावें अशी तिच्या पोटांत इच्छा उत्पन्न झाली. आपण वडील, तेव्हां आपल्यावरच

राजाची मर्जी असावी आणि आपल्या मुलाला दिल्लीचें सिंहासन मिळावें ही तिची महत्त्वाकांक्षा. परंतु तिच्या मत्सरव्याप्त दृष्टीला भलतेंच दिसूं लागलें. आपल्या बापाचें चित्त पोरावर नाहीं; त्याचा ओढा कमलेकडे व तिच्या पोराकडे आहे असें तिच्या मनानें घेतलें. कदाचित् तसें तिला दिसण्याला कारणही झालें. पण तें कारण असण्याला कारण ती स्वतःच.

विमला स्वभावतः अत्यंत लोभी व कुरठी. कमला अत्यंत निर्लोभ व मोकळ्या मनाची. अर्धस्फुटित अशा रक्तकमलाप्रमाणें तिचें स्मितशोभित मुख नेहमीं कोणाच्याहि मनांत आनंदच उत्पन्न करावयाचें आणि कांटयांनीं भरलेल्या निवडुंगाच्या बोंडाप्रमाणें आंठयांनीं भरलेलें आणि संतापानें लाल झालेलें विमलेचें मुख कोणाच्याहि मनांत तिरस्कारच उपजवावयाचें.

जी स्थिति आयांची तीच स्थिति मुलांची, जयचंद नेहमीं कुठरलेला व अबोल. त्याला घ्यावें असें कोणासच वाटेना. पृथ्वीराज नेहमीं हंसतमुख व बडबडया. आपल्या बोलण्यानें कोणालाहि याला उचलून घ्यावें अशीच इच्छा उत्पन्न करावयाचा. अर्थात् जो तो पृथ्वीराजाला जवळ करी, त्याचें कौतुक करी. हाच पुढला दिल्लीश्वर असें ह्मणत. हें लोकांचें बोलणें केव्हां केव्हां इतक्या उघडपणानें होई कीं तें विमलेच्याही कानावर गेलें. त्यामुळें तिच्या अंगाचा संताप किती होत चालला याचें वर्णन करून सांगतांच येत नाहीं. पृथ्वीराजाला व कमलेला बरें ह्मटलेलें हिला खपत नाहीं असें लोकांच्या नजरेस येतांक्षणी तिला चिडविण्यासाठीं लोक मुद्दामच पृथ्वीराजाचें अधिकाधिक कौतुक करीत व कमलेची स्तुति करीत. अशा प्रकारें खाजवून चिडविलेल्या खरजेप्रमाणें विमलेचा मत्सर वाढत चालला. त्याचा परिणाम काय झाला तो मागील प्रकरणांत वाचकांस दिसलाच आहे.

विमला त्याप्रकारें निघून गेली याबद्दल राजा अनंगपाळास पितृप्रेमामुळें फार फार वाईट वाटलें. परंतु तो फार करारी. कमला अत्यंत सुशील, प्रेमळ, सन्निष्ठ. अशा मुलीचा विमलेनें द्वेष करावा आणि तिच्याबद्दल आपल्या मनांत वाईट भरवून देण्याचा प्रयत्न करावा याबद्दल त्याला तिटकारा आला. त्यानें खरोखरीच असा निश्चय केला कीं पुनः त्या दुष्ट पोरीचें मुख अवलोकन करावयाचें नाहीं. ती संतापानें निघून गेली हें एकपरीनें बरें झालें असेंही त्याच्या मनास वाटलें.

कमला मात्र विमलेच्या अशा जाण्यानें फारच दुःखित झाली. तिला असें वाटलें कीं, आपण ज्या कारणासाठीं पित्याचे घरीं आलों, तें कारण

एके बाजूसच राहून हा अगदीं भलताच असा काय प्रकार झाला ! या सगळ्याला आपण व आपला मुलगा दोघें कारण झालों, हें तिच्या मनास फार खाऊं लागलें, आपल्या पित्याला आधींच फार दुःख झालेलें आणि त्यांत हा प्रकार तेव्हां आपणही आतां येथें राहूं नये. हा विचार येण्याबरोबर तिनें वडिलांकडे धांव घेतली. परंतु अनंगपाळास पाहिल्याबरोबर तिची वाचा बंद झाल्याप्रमाणें झालें आणि ती एकदम ओक्साबोक्सीं रडूं लागली. आपल्या या वयांत आणि अशा दुःखप्रसंगीं आपल्याला माझ्यामुळें दुःख होतें हें पाहून माझ्या मनाला फार खेद वाटतो. बाबा, मी गेल्यानें विमला ताईला संतोष होत असला, आणखी ती जर परत येत असली, तर मला जाऊं द्या. मी मोठ्या आनंदानें जाईन. पण वृद्धापकाळीं आपल्याला खेद होऊं नये. आणखी आतां काय सांगूं ?

कमलेचें तें भाषण ऐकून अनंगपाळ फार मोठ्या उद्वेगानें म्हणालाः— "कमले, तूंही आतां अशा वेळीं माझ्यापासून निघून जाण्याची गोष्ट काढतेस? काय म्हणावें तुला ? आतां विमलेचें मी तोंडसुद्धां पहाणार नाहीं. तुझ्या-सारख्या सुशील मुलीबद्दल तिनें अद्वातद्वा भाषणें केलीं, यामुळें माझें मन तिच्याबद्दल अगदीं पुरं विटलं. त्यांत आतां तूंही मला सोडून जाऊं लाग-लीस तर काय ह्मणावें ? तुझ्याकडे व तुझ्या पृथ्वीरायाकडे पाहून तर मी आपलें उरलेलें आयुष्य कंठणार आणखी तीं तुम्ही दोघें गेलां तर कसें होणार ? तुझा नवरा कांहीं रागावणार नाहीं याच्याबद्दल अगदीं माझी खात्री आहे. समजलीस. आतां कांहीं दिवस तूं रहा. मग जा. पृथ्वीराजाला पुढें माझ्याचजवळ राहूं दे, त्याला मी क्षत्रियांच्या सर्व विद्यांत चांगला निष्णात करीन. प्रतिधनंजय ( हें नांव तोंडांतून निघतांच त्याचा कंठ सद्गदित झाला. ) प्रतिअर्जुन बनवीन. पेरी आपले उपाध्याय धनुर्वेदांत द्रोणाचार्यांच्या तोडीचे आहेत. त्यांचा कोणी सुद्धां हात धरूं शकत नाहीं. तेव्हां तूं जरी यदाकदाचित् गेलीस—राहिली नाहींस, तरी पण पृथ्वीरायाला नेऊं नको. समजलीस, मी आतां त्याच्यावर सारी भिस्त टाकून आहें."

कमला कांहीं वेळ कांहीं बोलली नाहीं. नंतर म्हणाली, "बाबा, तुम्ही ह्मणतां ती गोष्ट खरी; पण आपण त्याला आपल्याजवळ ठेविलें कीं आय-ताच विमला म्हणाली त्याला पुरावा झाला. बाबा, मला या तिच्या आरो-पाचं भय वाटतं. तिच्या मनानें असें घेतलें, कीं मी जर इथें नसतें, तर तिला बरं वाटलं असतं. तिच्या हिताच्या सगळ्या गोष्टी झाल्या असत्या."

"जाऊं दे. जाऊं दे. तिचं आतां नांव सुद्धां काढूं नकोस, ती मला..."

" बाबा; बाबा, असं म्हणूं नका. कांहीं झालं तरी ती आपली मुलगी. माझी बहीण आहे. तेव्हां तिला... "

" बरं नको तर नको. पण तूंही तिचं नांव मजपुढें काढूं नको. मी आज सोमेश्वर महाराजांकडे जासूद पाठवून अशी विनंति करणार आहें कीं, तुला त्यांनीं आणखी कांहीं दिवस इथें राहूं द्यावी. पृथ्वीरायाला धनुर्वेद शिकविण्याची आमचेकडे उत्तम सोय आहे. तेव्हां त्यालाही येथें राहूं द्या. ते कांहीं नाही म्हणायचे नाहींत. जा आतां तूं अगदीं कांहीं सुद्धां खेद करून घेऊं नकोस. पृथ्वरीयाला मी विद्या शिकवीन आणखी तो चांगला वीर बनला कीं त्याच्या गळ्यांत हा राज्यकारभार घालून मी रानावनांत तपश्चर्येकरितां जाणार, मात्र माझ्या मनाप्रमाणें तो तयार झाला पाहिजे. तो होईल अशी माझी पक्की खात्री आहे. जा. आतां जा. अगदीं खेद करूं नकोस. परमेश्वरकृपेनें कदाचित् झालें हें चांगलेंच झालें म्हणायची पाळी येईल. नाहीं कशावरून ! जा. "

याप्रमाणें अनंगपाळानें कमलेचें समाधान करून तिला स्वस्थ बसविलें. तिचें खरें समाधान मात्र झालें नाहीं. पित्याच्यापुढें तिला बोलवेना एवढेंच. झाली ही गोष्ट बरी झाली असें तर तिच्या स्वप्नांतसुद्धां कधीं आलें नाहीं. झाला प्रकार फार अनिष्ट असेंच तिच्या मनास पक्कें वाटलें. झाल्या प्रकारामुळें कदाचित् कनोज व अजमीर या दोन राज्यांत फार मोठें वैमनस्य उत्पन्न होऊन परस्परांचा नाश करून टाकण्यांस दोघेही उद्युक्त होतील. काय प्रसंग येईल आणि काय नाहीं याचा नेम काय ? असा विचार येऊन ती आपल्या मनाशींच फार खेद करीत राहिली.

राजा अनंगपाळानें पृथ्वीरायाच्या शिक्षणाचा सर्व भार खरोखरीच आपल्या उपाध्यायावर टाकला आणि मोठ्या आदरानें परंतु आग्रहानें सांगितलें, कीं या मुलाला आपल्या स्वतःप्रमाणें धनुर्वेदांतच नव्हेतर क्षत्रियकुमाराला अवश्य व योग्य अशा सर्व विद्यांत प्रवीण केलें पाहिजे. उपाध्याय रामगुरु यांचें चित्त त्या मुलाच्या ठिकाणीं होतेंच. त्यांना तो आपल्या सन्निध राजानें ठेवण्याचा विचार ठरवितांच फार आनंद झाला आणि त्यांनीं राजा अनंगपाळाला म्हटलें:—" राजा, मला ही कामगिरी सांगतोस तर मी मोठ्या आनंदानें करीन. या पोराच्या हातांवर चक्रवर्तित्वाचीं लक्षणें आहेत तीं मीं पाहिलीं आहेत; तेव्हां असा पुरुष क्षत्रियांना

योग्य अशा सर्व विद्यांत पारंगत असा झालाच पाहिजे. माझ्या घरीं मी याला घेऊन जाईन नि माझ्याजवळ आणखीही चार मुलें—निरनिराळ्या स्थितींतल्या लोकांचीं—शिक्षणासाठीं राहिलेलीं आहेत. त्यांतलाच हा पांचवा अशी मात्र याची बुद्धि झाली पाहिजे. मी म्हणजे कोणी निराळा आहें आणखी आपली पदवी फार श्रेष्ठ आहे अशी बुद्धि त्याच्या मनांत शिरतां कामा नये. गुरुगृहीं सारे सारखेच. यांत उच्चनीचपणा अगदीं मानतां कामा नये. मी त्याच्या मनावर या गोष्टी ठसवीनच, परंतु आपल्यालाही सांगून ठेवतों. उद्ईक उत्तम मुहूर्त आहे. त्याला मजकडे पाठवून द्या. उद्यां मंगलवेळेवर त्याला मी विद्याग्रहण करण्याचा सुमुहूर्त करतों. तो प्रतिअर्जुन बनणार याबद्दल मला संशय नाहीं. राजा, स्वतःबद्दल फार प्रौढी मारल्यासारखें कदाचित् दिसेल परंतु मी जें खरें आहें तेवढेंच सांगतों आहें."

उपाध्याय रामगुरूनें हें सांगितलें, त्याप्रमाणें सर्व व्यवस्था ठेवली जाईल असें अनंगपाळानें त्याला आश्वासन दिलें. तें ऐकतांच उपाध्यायास फार आनंद झाला. इकडे सोमेश्वरमहाराजांसही त्याबद्दल फार आनंद झाला. क्षात्रविद्येंत नैपुण्य प्राप्त करून देण्यास जर कोणी गुरु योग्य असेल, तर तो अनंगपाळ महाराजांचा उपाध्याय रामगुरु होय, असें त्यांस व इतर सर्व क्षत्रिय राजांस माहीत होतें; या काळचे ते विश्वामित्रच अशी त्यांची ख्याति होती; आणि त्यामुळें पुष्कळ राजकुमार व क्षत्रियकुमार त्यांचेजवळ विद्याभ्यासासाठीं रहात.

पृथ्वीराज वयानें इतका लहान होता तरी गुरुगृहीं मोठ्या उत्सुकतेनें व आनंदानें गेला. तेथें भाट म्हणजे स्तुतिपाठक जातीपैकीं एका गृहस्थाचा हुशार मुलगा रामगुरूजवळ अध्ययन करण्यास व क्षात्रविद्या शिकण्यास राहिला होता. हा मुलगा फार चतुर, हुशार, बोलका, सद्गुणी व गुणग्राहक होता. त्याचें वय पृथ्वीराजापेक्षां तीन वर्षांनीं अधिक होतें, तरी पण पृथ्वीराज गुरुगृहीं आल्यापासून या मुलाचें त्याच्या ठिकाणीं फार प्रेम जडलें आणि पृथ्वीराजही त्याच्याच अनुसंधानानें वागे. त्या भाटकुमाराचें नांव चंद्र होतें. चंद्रावर गुरूची फार भक्ति, कां कीं, तो मोठा हजरजबाबी असे. गुरूंनीं एखादा श्लोक पढविला असतां तो विसरून गेला तरी विसरून गेलेल्या ओळी चंद्रानें पदरच्या रचून श्लोकास श्लोक ठेवून द्यावा. एकदोन वेळां तर असें झालें, कीं गुरुजींस आपण चुकतों कीं हा पोरगा चुकतो याची भ्रांति पडली ! त्यांनीं वारंवार त्याला विचारलें कीं, मी तुला पढवि-

तांना अमुक पाठ शिकविला असतां हा दुसरा पाठ तूं कोठून आणलास ? त्याचें उत्तर चंद्रानें इतकेंच दिलें, कीं मला जसा आठवला तसा श्लोक मीं म्हटला. पुढें एक दोनदां चंद्रानें आपल्या पदरचेच चार अनुष्टुप् श्लोक रचून म्हटले. हे कोणत्या काव्यांतले आणि तुला कोणीं पढविले असें विचारलें, तर त्यानें उत्तर दिलें कीं तें एक नवें काव्य आहे. असे एक दोन प्रसंग झाले तेव्हां गुरुजींना असें वाटलें, कीं आपल्याजवळ असलेला हा विद्यार्थी फार अलौकिक बुद्धीचा आहे. आणि तेव्हांपासून त्यांची चंद्रावर फार भक्ति बसली. चंद्राची बुद्धि दुसऱ्या तिसऱ्या विषयाकडे जातच नसे. त्याला नेहमीं कविता करण्याचा किंवा धनुर्विद्येचे पाठ कृतीनें वटविण्याचा नाद. आणि त्याच्या तंत्रानें पृथ्वीराज वागूं लागल्यामुळें त्यालाही याच दोन विषयांची गोडी लागली. मात्र पृथ्वीराज स्वत: कविता करीत नसे. चंद्राचें कवित्व पाठ करून वेळ पडेल तसें म्हणून दाखवीत असे. अशा तऱ्हेनें एक सात आठ वर्षांचा बालकवि आणि दुसरा चार पांच वर्षांचा बालवीर यांचें मैत्रक जमलें. पदार्थ आणि छाया यांचा जसा अभेद संबंध असतो तसा चंद्रकवि व पृथ्वीराज यांचा अगदीं अभेद्य संबंध जडला. कोठेंही जावोत, कांहीं करोत, दोघेजण एकत्र असावयाचे. जें काय चांगलें शाबासकी मिळण्याजोगें किंवा नामुष्की मिळण्याजोगें काम असेल, तें दोघांनीं मिळून करावयाचें. मग त्याबद्दल बक्षीस मिळो, कीं शिक्षा होवो.

याप्रमाणें त्या दोघांचा अकृत्रिम स्नेह जडला. केव्हां राजा अनंगपाळानं पृथ्वीराजाला वाड्यांत बोलाविलें, तर पृथ्वीराज एकटा कधींच जात नसे. माझ्याबरोबर चंद्राला पाठवा असें म्हणे. चंद्रही त्याचप्रमाणें पृथ्वीराजाशीं फार फार एकनिष्ठपणें व प्रेमळपणें वागे.

एके दिवशीं एक फारच विलक्षण प्रकार झाला. गुरुजींच्या घरीं कांहीं हव्यकव्य होतें व त्यांना कसलीं पानें पाहिजे होतीं. तीं लवकर कोण जाऊन आणील म्हणून गुरुजींनीं विचारलें. चंद्र चट्कन् उठला व मी घेऊन येतों असें म्हणाला, त्याबरोबर पृथ्वीराजही त्याच्याबरोबर निघाला. या लहान मुलाला आपण पाठवूं नये असें गुरुजींस वाटलें; परंतु पृथ्वीराज ऐकेना. तेव्हां गुरुजींनीं "जा, पण संभाळ वाटेंत" असें म्हणून त्यासही जाऊं दिलें.

दोन्हीं मुलें मोठ्या उत्सुकतेनें बाहेर पडून पलीकडल्या कुंजांत गेलीं. त्यांपैकीं ज्या झाडाचीं पानें त्यांना काढावयाचीं होतीं, त्या झाडाजवळ

ते गेले. चंद्रानें लागलींच पृथ्वीराजास म्हटलें:— “कुमारा, तूं या झाडाखालीच उभा राहून पानें गोळा कर. मी तीं झाडावरून तोडून खालीं पाडतों म्हणजे भराभर काम होईल. परंतु पृथ्वीराज ऐकेना. तो म्हणूं लागला, कीं मला आपल्या बरोबर झाडावर ने. आपण दोघेही पानें टाकूं. आणि दोघेही खालीं उतरल्यावर भराभर पानें गोळा करूं. थोडा वेळ याप्रमाणें वाद झाल्यानंतर चंद्रानें त्याला वर चढविण्याचें कबूल केलें आणि त्यास हातांत धरून तो त्या मोठ्या थोरल्या आम्रवृक्षावर चढूं लागला. प्रथमतः त्यानें पृथ्वीराजास वर चढवून घट्ट धरून बस म्हणून सांगावें नंतर आपण थोडें चढावें. पुनः त्याला आधार देऊन चढवावें. आणि त्यास घट्ट धरून बसण्याबद्दल बजावून आपण वर सरकावें; परंतु दोघेही लहान. असा क्रम किती वेळ टिकणार? जमिनीपासून सुमारें सहा हातांवर पृथ्वीराज गेला आणि एक आडवी शाखा लागली तीवर त्यानें आपले हात टाकले आणि ती घट्ट धरली. नंतर हलकेच आपले पाय त्या खांदीवर देऊन तो तिजवर बसला; परंतु तितक्या धांदलींत काय अपघात झाला, कीं चंद्राचा पाय निसटला आणि तो खालीं पडला. तो अगदीं बेशुद्ध झाला. त्याला मुळींच शुद्ध राहिली नाहीं, इतका त्याच्या मस्तकाला आघात बसला.

इकडे तें पाहून पृथ्वीराज अगदीं गांगरून गेला. प्रथम त्याला वाटलें, कीं आपण उडी टाकावी; परंतु सहा हात उंचीवरील आडव्या फांदीवर गेलेला तो पोर तो उडी कसची टाकतो. त्याला उडी टाकण्याची छाती होईना.

इकडे मुलें पलीकडच्या कुंजांत जाऊन आंब्याचीं चार पानें आणण्यासाठीं गेलीं तीं अजून कां येईनात असें वाटून गुरुजी स्वतःच त्या कुंजाकडे आले. तों दुरून त्यांना तो प्रकार दिसला. आतां ते धांवणार इतक्यांत काय चमत्कार झाला, कीं चंद्राच्या डोक्यास जखम झाली असून तींतून रक्त वाहूं लागलें होतें, त्याच्या वासानें म्हणा किंवा त्याची नजर तिकडे गेली म्हणून म्हणा एक कोल्हा हुंगीत हुंगीत चंद्राजवळ आला. आतां हा कोल्हा आपल्या मित्राचें रक्त चाटून कदाचित् त्याला फाडण्यास सुरुवात करील असें पृथ्वीराजाच्या मनांत आलें आणि मग त्यास आपलें काय होईल याचा विचार न राहून त्या कोल्ह्यास हांकून देण्यासाठीं म्हणून त्यानें एकदम उडी टाकली.

गुरुजी तो सर्व प्रकार पहात होते. याच्या उडी मारण्याचें कारण त्यांनीं ताडलें आणि ते पुढें धांवले. कर्मधर्मसंयोग असा आला, कीं पृथ्वीराज

पृथ्वीवर पडणार तोंच गुरुजींनीं, अगदीं पालथें पडून त्याला हातावर झेलला. जमिनीवर आघात होऊं दिला नाहीं. नाहीं तर चंद्राप्रमाणेंच आघात होऊन तोही बेशुद्ध पडला असता व त्याला दुखापतही झाली असती; परंतु तो वांचला.

गुरुजींनीं लागलींच त्याला उभा करून आधीं कांहीं वनस्पतीचा पाला तोडून आणून त्याचा रस चंद्राच्या नाकांत पिळला. त्यायोगानें चंद्र एकदम खडबडून जागा झाला आणि इकडे तिकडे पाहूं लागला. गुरुजींनीं दुसऱ्या एका वनस्पतीचा पाला घेऊन तो त्याच्या जखमेवर बसविला तेव्हां तत्काळ रक्त वाहणें बंद झालें. गुरुजी दोघांसही घेऊन आपल्या आश्रमांत गेले. तेथें चंद्रानें सर्व हकीकत त्यांस सांगितली आणि आपण इतक्या उंचावरून एकदम उडी कां घेत होतों, हेंही पृथ्वीराजानें त्यांस सांगितलें. तो त्याच्या उडी मारण्याचा प्रकार गुरुजींनीं स्वतःच पाहिला होता. आपल्याकरितां यानें झाडावरून उडी टाकली हें ऐकून चंद्रास त्याच्याबद्दल फारच प्रेम उत्पन्न झालें. आणि त्या दिवसापासून त्या दोघांचीं प्रेमबंधनें अधिकाधिक दृढ होत चाललीं.

वर सांगितल्याप्रकारें या सर्व मुलांचें शिक्षण उत्तमपणें चाललें होतें.

इकडे विमला संतापानें आपले पितृगृह सोडून आपल्या घरीं गेली. आपल्या बापानें आपणास आग्रह करून ठेवून घेतलें नाहीं, उलट आपल्याला चांडाळणी वगैरे शब्द लावून पुनः तुझें तोंडसुद्धां मला पहायाला नको असें सांगितलें याबद्दल तिला अतोनात त्वेष आला. याचें सर्व मूळ आपली बहीण कमला. तिनें आपल्या कौटिल्यानें आपल्या बापाचें प्रेम आपल्या स्वतःकडे ओढून घेऊन आपल्याविषयी त्याचा वाईट ग्रह करून टाकला, हें तिच्या मनांत पूर्णपणें बिंबलें. आतां आपण तिच्यावर सूड उगविला पाहिजे, त्याखेरीज दुसरा मार्ग नाहीं असा तिच्या मनाचा निश्चय वाटेंतच झाला. हा सूड उगविण्यास काय काय करावें याबद्दल तिच्या मनांत नानाप्रकारचे विचार चालले. प्रवासांत असतांनाच ती असले विचार करतां करतां एकदम आपल्या पोरावर उसळून खेंकसली. "कारट्या, तूं मोठा असतास तर तुला माझ्या गळ्याची शपथ घालून सोमेश्वरावर स्वारी करून त्याला व आपल्या मावशीला बंदीवान् करून आणून आपलें दास्य करायला लाव, नाहीं तर युद्धांत मर असें सांगितलें असतें, पण तूं पडलास एवढासा मिऱ्याएवढा. त्या तुला काय शपथ घालूं ? आणि काय सांगूं ?"

बिचारा जयचंद मातुःश्रींचें तें खेंकसणें ऐकून घाबरला व तिच्याकडे नुसता पाहूं लागला, तों तिनें त्याला उगाच रट्टा हेऊन म्हटलें, "नुसता बावळ्यासारखा पहातोस काय ? समजलें आहे का तरी, मी काय म्हणतें आहें तें ? तुझ्या मावशीला माझी बटीक आणखी तिच्या नवऱ्याला तिकडचा हुजऱ्या करून आणायला पाहिजे. म्हणजे तो कारटा पृथ्वीराज आयताच तुझा हुजऱ्या होईल नाहींतर द्वारपाल होईल. बरा दारावर बसवलास तर. होईल का मेल्या असं तुझ्या हातून ? होईल का हा पराक्रम ? " हे प्रश्न विचारीत असतां तिचें तिलाच हंसूं येऊन एखाद्या वेड्याप्रमाणें ती खद्खदां हंसूं लागली. तिला जणूं काय असें चित्र दिसूं लागलें, कीं आपली बहीण बटीक झाली आहे, सोमेश्वर आपल्या नवऱ्याचा हुजऱ्या झाला आहे आणि पृथ्वीराज आपल्या पोराचा द्वारपाल झाला आहे.

परंतु तें हंसूं फार वेळ टिकलें नाहीं. अशा गोष्टी कुठल्या घडून यायला असें तिच्या मनांत येऊन ती निराश झाली. परंतु तिला जितका तिचा मुलगा बावळा दिसत होता तसा तो नसावा. त्याच्या मनावर तिच्या त्या बोलण्याचा परिणाम झाला आणि तो परिणाम पुढच्या सर्व कथानकास कारण झाला.

# प्रकरण ३ रें.

[ पृथ्वीराज रामगुरूजवळ शिकावयाला राहिल्याबरोबर आणखी कांहीं क्षत्रियांनीं आपलीं मुलें तेथें अध्ययनास ठेविलीं. त्या सर्वांचें शिक्षण मोठ्या शिस्तीनें चाललें होतें. एकदां जें शब्दांनीं ऐकूं येत नाहीं व दृष्टीनें दिसत नाहीं अशा लक्ष्याचा वेध कसा करायचा, म्हणून चंद्रानें गुरूंना विचारिलें म्हणून तो प्रयोग प्रत्यक्षच करून दाखविण्यासाठीं रामगुरूनें एके जागीं बाण मारला. अदृश्य आणि अशब्द असा जलप्रवाह वर येईल अशी त्याची अपेक्षा होती, पण तसें न होतां तो बाण एका पत्र्यावर आदळल्याचा आवाज आला. म्हणून रामगुरूनें तेथें खणून पाहिलें तों तांब्याच्या पत्र्याखालीं एक भुयार लागलें. भुयारांत गेल्यावर त्या सर्वांना आंत एक मोठी संदुक दिसली. तिच्या दोन्ही बाजूंस दोन सिंह आणि मध्यभागीं एक तरुणीची मूर्ति होती. संदुकीच्या खालीं " शिरहट्टे धनसंग्रहे शिरसज्जे धन जाय " असा कविताचरण होता. ]

## एक निधि.

**शिरहट्टे धनसंग्रहे । शिरसज्जे धन जाय ॥**

चंद्र व पृथ्वीराज या दोघांचा स्नेह अत्यंत होऊन दोघांचा रामगुरूजवळ विद्याभ्यास चालला होता. रामगुरूजवळ विद्याभ्यासासाठीं सोमेश्वराचा पुत्र व अनंगपाळाचा पौत्र पृथ्वीराज राहिला आहे असें सर्वत्र प्रसिद्ध होतांच आणखीही कित्येक राजपुरुषांनीं आपल्या पुत्रांस त्याचेजवळ विद्याभ्यासासाठीं ठेवण्याचा निश्चय करून त्यास विनंति केली. सुमारें पंधरासोळा क्षात्रवीरांनीं आपले पुत्र त्याच्याजवळ आणून ठेविले. पुढें मात्र त्यानें आपल्या आश्रमांत आतां जागा नाहीं म्हणून जास्त विद्यार्थी घ्यावयाचे नाहींत असा निश्चय केला. या पंधरा सोळा विद्यार्थ्यांस रामगुरु अगदीं सारख्या दर्जानें वागवीत असत. राजपुत्र म्हणून एकाची काळजी जास्त, प्रधान पुत्र म्हणून दुसऱ्याची त्याहून कमी आणि भाटाचा मुलगा म्हणून तिसऱ्याची अगदींच कमी असा प्रकार मुळींच नव्हता. त्याला सर्व सारखे. सर्वांना सर्व करावयास तो

लावी. त्यामुळें मुलांत एकमेकांविषयीं अत्यंत प्रेम वाढत चाललें. पृथ्वीराजही आपल्या दर्ज्याचें मुळींच कांहीं मनांत न आणतां इतरांप्रमाणें जितकी म्हणून गुरुसेवा करावयाची तितकी करी. इतरांतच निजे. इतरांतच बसे. मात्र मागल्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें त्याचें प्रेम चंद्रावर अधिक असे. त्या प्रेमास अधिकपणा होण्यास कांहीं विशेष गोष्ट कारण झाली तीही मागील प्रकरणीं वाचकांस कथन केली आहे.

आतां या प्रकरणांत त्यांचा विद्याभ्यासाचा उत्कर्ष होत असतां ज्या कांहीं विशेष गोष्टी झाल्या त्यांपैकीं एक दोन मजेच्या होत्या, त्या देण्याचा विचार आहे.

रामगुरु एके दिवशीं बाण मारण्यासाठीं नेम कसा धरावा, चित्ताची व नेत्रांची एकाग्रता लक्ष्यावर कशी करावी, लक्ष्य चल असलें तरी त्याच्या चलतेबरोबर दृष्टीचें चलनही कसें सारखें ठेवावें याबद्दल शिक्षण देत असतां चंद्रानें सहज विचारलें:— " गुरुजी, चल किंवा अचल असें लक्ष्य आपल्या समोर असलें तर दृष्टीची एकाग्रता करण्याचें आपण सांगतां, पण जें लक्ष्य आपल्या समोर नाहीं, आपल्याला दिसत नाहीं किंवा त्याच्यापासून शब्द-सुद्धां होत नाहीं अशा लक्ष्याचा वेध हा कसा करावयाचा ? "

तो फार कल्पक. त्याचे प्रश्न कांहीं तरी विचित्र असावयाचे हें ठरलेलेंच. परंतु त्याच्या प्रश्नांचा नुसता विचित्रपणा एवढाच कांहीं गुण नसे. त्यांत आणखी गुण होते, त्यामुळें त्याचे गुरुजी त्याची अवहेलना करीत नसत. त्यांत कांहीं तरी मनांत घेण्याजोगा अंश आहे हें जाणून असत; यामुळें त्यांनीं लागलीच त्याला कमी आधिक प्रश्न विचारून व उत्तरें देऊन त्याचें समाधान करावें, असें चाले.

आजचा हा प्रश्न ऐकून मात्र गुरुजी जरा त्रासले. मी सांगतों आहें तिकडे लक्ष्य न देतां हा उगीच मधेंच कांहीं तरी विचारतो म्हणून त्यांस थोडा राग आला. परंतु उगीच रागावणें हें गुरुत्वाला उपयोगी नव्हे म्हणून त्यांनीं चंद्रास म्हटलें: " चंद्रा, तुझ्या प्रश्नाचा विचार मग करूं; प्रथम तूं मी सांगतों आहें त्याबद्दल कांहीं विचारावयाचें असलें, तर विचार, आणि त्याबद्दल काय मला सांगायचें तें ऐकून समाधान होऊन आजचा धडा मीं पुरा केला म्हणजे मग तुला काय विचारावयाचें असेल तें विचार. "

गुरुजींनीं याप्रमाणें सांगितल्यावर चंद्र उगीच बसला. गुरुजींचा जो धडा चालला होता तो संपला, त्याचे प्रयोग करून पाहण्याची पाळी आली.

सर्वांच्या पाळ्या झाल्या. नंतर गुरु चंद्रास म्हणतातः– " चंद्राजी आतां तुझा प्रश्न काय तो सांग पाहूं. " चंद्रानें पुनः आपला प्रश्न सांगितला. तेव्हां गुरु त्यास म्हणालेः– " अरे जें शब्दानें ऐकूं येत नाहीं आणि दृष्टीनें दिसत नाहीं असें लक्ष्य असणार कसें ? तुझ्या प्रश्नाचा अर्थ माझ्या लक्ष्यांतच येत नाही. नीट सांग पाहूं काय तें. "

चंद्र त्यावर लागलीच म्हणतोः– " गुरुजी, भीष्माचार्यांची कथा आपण आम्हांला सांगितली तेव्हां म्हणालांत कीं, भीष्माचार्यांनीं कौरव-पांडवांस सांगितलें कीं मला थोडी गंगा पाजा. कौरवांपैकीं सगळयांनीं धांवा ठोकून कोणी गंगाजळ्या आणल्या, कोणी झाऱ्या आणल्या, कोणीं दुसरीं भांडीं आणिलीं. त्यांत गंगाजल होतें. परंतु भीष्माचार्यांना तें नको होतें. त्यांना जिवंत असा गंगाप्रवाह तेथल्या तेथें उत्पन्न करून मुखांत येऊन पडेल अशी तजवीज करावयास पाहिजे होती. ती त्यांची इच्छा एकट्या अर्जुनानें मात्र जाणली आणि आपल्या हातीं धनुष्यबाण घेऊन पृथ्वीवर बाण मारून गंगा काढून भीष्माचार्यांच्या मुखांत सोडली. ही गंगा दिसत नव्हती, किंवा तिच्या वाहण्याचा शब्दही ऐकूं येत नव्हता. मग अर्जुनानें नेमका बाण मारून तो गंगेचा प्रवाह कसा काढला ? "

चंद्राचें तें भाषण ऐकतांच गुरुजी चकित झाले. हा असा कांही प्रश्न विचारील हें त्यांच्या स्वप्नींही नव्हतें. परंतु तो ऐकतांच त्यांस कौतुक वाटलें. ते हंसले आणि त्यास म्हणतात, " चंद्रा, तुझें पोरा कांहीं डोकेंच विलक्षण आहे. तूं आतां जो प्रश्न विचारलास त्याचें उत्तर शब्दांनीं सांगण्यापेक्षां तुला आणखी यांना ती मौज करूनच दाखविली पाहिजे असें दिसतें. बरें आहे, चला आज तुम्हांला मजा दाखवितों. "

असें म्हणून त्यांनीं आपलें धनुष्यबाण घेतलें. मुलांनाही आपापलीं धनुष्यें व बाणाचे भाते सज्ज करून येण्यास सांगितलें. नंतर ती सर्व मंडळी मोठ्या मौजेंत रानांत शिरली. तेथें बराच वेळ इकडे तिकडे पाहून रामगुरु आपल्या शिष्यांस म्हणतातः—

" आतां नीट लक्ष्य द्या अं. मी काय काय करतों तें पहा. " असें म्हणून त्यांनीं एक तीर पृथ्वीवर मारला. तो पृथ्वी भेदून आंत शिरला आणि क्षणार्धांत जसा एखाद्या तांब्यासारख्या धातूच्या पत्र्यावर आघात करावा तसा एकदम आवाज झाला. हा आवाज ऐकतांच रामगुरु व त्यांचे शिष्यही फार चकित झाले. जलप्रवाहाचा फवारा वर निघेल अशी त्यांची

अपेक्षा होती ती अर्थातच आतां व्यर्थ झाली. कारण तो आवाज झाल्या-बरोबर त्याच्या मागोमाग पाण्याचा फवारा आला नाहीं; त्यांनीं सर्वांनीं बराच वेळ वाट पाहिली; परंतु कांहीं नाहीं. रामगुरूची चर्या थोडी निराशयुक्त दिसली. नंतर त्यानें आपल्या शिष्यांस कांहीं एक न बोलतां भात्यांतून दुसरा बाण काढला. तो बाण काढून कमान चढवून भुंवयांचें आकुंचन करून पृथ्वीकडे एक दृष्टि देऊन पुनः कमान खेंचली. आणि एकाग्रचित्तानें पूर्वींच्या ठिकाणा-पासून सुमारें हातभर जागा सोडून बाण मारला. तो पृथ्वीत अत्यंत वेगानें शिरला. परंतु क्षणार्धांत पुनः पूर्वींसारखाच आवाज झाला. आपला बाण पृथ्वीच्या अंतर्भागीं असलेल्या एखाद्या धातूच्या भांड्यावर किंवा पत्र्यावर आदळून हा ध्वनि निघाला असला पाहिजे असें रामगुरूनें ताडलें आणि हा प्रकार काय आहे हें पहाण्याचा त्यानें निश्चय केला. लागलीच पृथ्वी खण-ण्यासाठी हत्यारें त्यांनीं मुलांस पाठवून आणविलीं. आणि आपल्या सर्व शिष्यांस म्हटलें:—

"मुलांनो, कांहीं तरी विलक्षण प्रकार येथें असला पाहिजे. माझी समजूत अशी आहे, कीं या जागेखालीं एक निधि पुरला गेला आहे आणि त्या निधीच्या भांड्यावर माझे तीर जाऊन आदळले असून त्यांत रुतून बसले आहेत. काय आहे तें आपण आतां पाहूं या. निधि असेल तर आपल्या राजाचें आणि आपलें हितच आहे. चला."

गुरूची आज्ञा झाल्यानंतर काय विचारतां ? ती रामसेना भराभर पृथ्वी खणूं लागली. हांहां म्हणतां कमरेइतका खड्डा झाला. त्यांनीं खणलें तें त्या तीराच्या सभोंवतालूनच खणलें. कमरेइतका खोल खड्डा होतांच खालीं त्यांस एक चांगला जाड असा तांब्याचा पत्रा लागला. सभोंवतालीं बरेंच खणीत जातां जातां तो पत्रा बराच मोठा लांबरुंद आहे असेंही दिसलें. तेव्हां याच्या खालीं कांहीं तरी निधि पुरून ठेवला आहे अशाबद्दल राम-गुरूची खात्री झाली. तशी खात्री होतांच त्यांनीं देवतांच्या समाधानार्थ जे काय शास्त्रोक्त विधी करावयाचे ते केल्याखेरीज पुढें कांहीं करावयाचें नाहीं असें ठरविलें आणि त्या स्थानावर नुसता पहारा ठेवून मंडळी तेथून निघून आली. सर्वांना आतां कौतुक उत्पन्न झालें, कीं याच्याखालीं काय आहे तें आपणांस कळावें आणि त्या मुलांस आपली जिज्ञासा तृप्त कर-ण्याला जर मुभा दिली असती तर त्यांनीं केव्हांच वाटेल ती उकराउकरी करून काय निधि आहे, आणखी काय नाहीं याचा पक्का निकाल

लावला असता; परंतु गुरुजींनीं नको म्हणून सांगितल्यानंतर मग काय करणार ?

इकडे गुरुजींनीं दुसरे दिवशीं ब्राम्हण मंडळी बोलावून निधिदेवतेची व स्थानदेवतेची पूजा वगैरे करविली. ती सर्व यथासांग झाल्यानंतर पुढें उकरण्यास प्रारंभ केला. उकरतां उकरतां तो तांब्याचा पत्रा कोठून प्रारंभ होत होता त्या दोन्ही बाजू सांपडल्या. नंतर तो कशावर बसविला होता तेंही दिसून आलें. तेव्हां तो तेथून उखळण्यास त्यांनीं आरंभ केला. लवकरच तो पत्राही उखळला; परंतु पत्रा इतका जड कीं तो गुरुजी व त्यांचे शिष्य यांच्या सामर्थ्यानें उलथून टाकणें शक्य नव्हतें. थोडी इतर कांहीं लोकांची मदत घेतल्याखेरीज चालावयाचें नाहीं असें गुरुजींसही वाटलें. परंतु शिष्यमंडळी फार उत्साही. त्यांना यांत आपला अपमान होणार असें दिसलें. आणि त्या पंधरासोळा जणांनीं त्यांस एकदम सांगितलें, कीं आम्ही सर्वजण मिळून नेट लावून हा पत्रा उलथून टाकूं. आपण आमच्या सामर्थ्याविषयीं बिलकूल शंका घेऊं नका. आपल्यास गुरुजी परत काय म्हणताहेत काय नाहीं याची वाटसुद्धां त्या मुलांनीं पाहिली नाहीं. ते कामाला लागले. हा प्रचंड जाडीचा व लांबीरुंदीचा तांब्याचा पत्रा उलथून टाकतांना या मुलांच्या हाताला लागेल, किंवा हीं पडतील किंवा एखादा त्या पत्र्याच्या खालीं खंदक असला तर त्यांत पडेल अशा नाना प्रकारच्या कुकल्पना गुरुजीच्या मनांत वावरूं लागल्या; परंतु मुलांना कांहीं नाहीं. त्यांनीं रेटून आपली सर्वांची अंगशक्ति एकवटून जोर केला आणि तो पत्रा खरोखरच उलथून टाकला. तो उलथून पलीकडे पडण्याबरोबर एवढ्या मोठ्यानें आवाज झाला आणि पृथ्वी इतकी हादरली, कीं साऱ्या रानांतील पशुपक्षी व कीटक घाबरून गेले असें दिसलें. मुलांना आपल्या श्रमाचें खूप चीज झालें असें वाटून हर्ष झाला आणि ते आनंदानें ओरडूं लागले.

थोड्या वेळांत हर्ष ओसरल्यानंतर मंडळी पाहूं लागली तों त्या पत्र्याखालीं मोठा थोरला खंदक असून त्यांत खालीं जाण्यास सुंदर जिना केलेला आहे तेव्हां आतां पुढलें काम अर्थातच खालीं उतरून जाणणें. मुलें भराभर जाऊं लागलीं; परंतु पुढें अंधार दिसला. तेव्हां अंधारांत जाऊन कांहीं अपाय करून घेऊं नये म्हणून गुरुजींनीं त्यांना बजाविलें. तेव्हां तितकेच ते थबकले. नंतर चुडी पेटवून पुढें जावयाचें असें ठरवून त्याप्रमाणें तयारी झाली. मंडळीं खालीं उतरली. पायऱ्या लवकरच संपून दालन लागलें, त्या [illegible]

नांत कोणीकडून तरी वारा चांगला गार व ताजा असा लागे. त्यांत कोंजट-पणा किंवा दमटपणा बिलकूल नव्हता; परंतु वारा कोठून येत होता हें कांहीं कोणास कळेना. रामगुरूंना हें ठाऊक होतेंच, कीं अशा भयंकर भुयारांतून कोठून तरी ताजी हवा येण्याची योजना केली असलीच पाहिजे; परंतु हवेबरोबर उजेड कां दिसूं नये ? म्हणून ते नीट न्याहाळून पाहूं लागले. परंतु उजेडाचा थांग कांहीं लागेना. दालनांतून पुढें जातां जातां त्यांस समोरच लांबचलांब अशी एक तांब्याची संदूक दिसली. ही संदूक प्रचंड होती. लांब चांगली दहापंधरा हात, उंच सुमारें चार हात आणि रुंद सहा सात हात.त्या संदु-कीच्या वरच्या झांकणावर दोन्ही बाजूंस दोन सिंह व मध्यभागीं एक सुंदर पुतळी चांगली पंधरा सतरा वर्षांची मुलगी असते तेवढी उभी केली होती. ती इतकी रूपवती व सुंदर होती आणि कारागिराची तिला घडविण्यांत अगदीं कौशल्याची परमावधि झाली असली पाहिजे कीं मुलांनीं व रामगुरूंनीं तिला प्रथम पाहतांक्षणीं त्यांस असेंच वाटलें, कीं ही त्या निधिरक्षणासाठीं कोणीं स्वर्गलोकची देवता मुद्दाम येऊन त्यावर उभी राहिली आहे. ती आपणांस प्रतिरोध करील आणि या निधीला हात लावूं नका असें सांगेल असें त्यांस वाटल. निषेधार्थ तिचा हात पुढें केलेलाच होता.

मंडळी तो देखावा पाहून दचकून उभी राहिली. नंतर बराच वेळ वाट पाहिल्यावरही जेव्हां ती देवता कांहीं हालचाल करीत नाहीं असें दिसलें, तेव्हां त्यांस असें वाटलें कीं, ही पुतळी केवळ तांब्याच्या धातूची असावी. त्या पुतळीच्या संदुकीच्या खालीं या प्रकरणाच्या मथळ्यावर दिलेले कवि-तेचे चरण होते.

# प्रकरण ४ थें.

[ रामगुरूंच्या शिष्यांत विरूपाक्ष नांवाचा एक वेडगळ मुलगा होता. हा मूर्ख होता पण मोठा गुरुनिष्ठ असे. याची आणि खरा गुरुभक्त कोण याची कसोटी पहाण्यासाठीं रामगुरूनें एक युक्ति केली. त्या संदुकीजवळील सिंह व पुतळी यांचीं मस्तकें दूर केलीं म्हणजे संदुक उघडणार होती. पण रामगुरु मुद्दाम म्हणाला कीं, या देवतेला कोणाचें तरी मस्तक वाहिल्याशिवाय कांहीं आंतलें द्रव्य मिळत नाहीं. मला तरी द्रव्य जरूर आहे. तर कोणता शिष्य माझ्यासाठीं आपलें मस्तक या देवतेला वहातो तें पाहूं. तेव्हां सर्व शिष्य मागें सरून एकटा विरूपाक्ष मात्र पुढें आला. नंतर पृथ्वीराजही आला. असो. शेवटीं त्या वाक्याचा खरा अर्थ सांगून रामगुरूनें तें बाहेर काढलें. ]

## विरूपाक्ष पंडित.

तो सर्व देखावा पाहून मुलांना व त्यांच्या गुरूंना कितीतरी आश्च वाटलें. या पुतळीनें संरक्षिलेला असा खरोखरीच मोठा निधि विलक्षण प्रचंड संदुकेंत आहे हें तर सर्वांस एकदम वाटलें; परंतु या निधीव आपले हात कसे लागावे हें कोणासच सुचेना. त्या निधीची संरक्षयित्री पुतव अशा प्रकारें उभी केलेली होती, व त्या पुतळीच्या दोहीं बाजूंस असण सिंह अशा आविर्भावाचे दाखविले होते, कीं जो कोणी त्या संदुकीला हा लावायला जाईल त्याच्या अंगावर दोघे दोहींकडून झांप टाकून त्याचे अंगा वाभाडेच काढतील, या विचारानें माणूस एक पाऊलही पुढें सरकण्यास दचवे सर्व मंडळी तो एकंदर देखावा पहात उभी राहिली. कित्येक तर या पुतळ प्रमाणें तिच्या दोनही बाजूंस असणाऱ्या दोन सिंहांप्रमाणें अगदीं स्तब्ध व तटस्थ उभे राहिले.

कित्येक मुलें त्या स्तब्धपणें उभें राहण्यांतही त्या पुतळीच्या किंवा त्य सिंहाच्या आविर्भावाप्रमाणें आविर्भाव करून उभीं राहिलीं. अजाणपणें अ करण केव्हां केव्हां होतें त्यापैकींच हा प्रकार होय. गुरुमहाराज मात्र अगद एकचित्तानें त्या संदुकीवरील लेखाचें मनन करीत होते. त्यांच्या मनाचं

एवढी खात्री होती कीं या लेखांत हा निधि प्राप्त करून घेण्याचा उपाय सांगितलेला असावा; परंतु तो उपाय बरोबर काय असावा !

गुरुमहाराजांस कांहीं तो उलगडा होईना म्हणून त्यांनीं तो लेख मोठ्यानें वाचून आपल्या शिष्यांस व इतर मंडळींस ऐकविला आणि म्हटलें, " बोलारे बोला. तुम्हांला जर कांहीं यांतला अर्थ कळत असेल तर ! " तेव्हां त्यांच्या त्या शिष्यांपकीं विरूपाक्ष नांवाच्या एका शिष्यानें चटकन् उत्तर दिलें "गुरुमहाराज, ह्याचा अर्थ अगदींच सोपा आहे. दुसऱ्या कोणास येत नाहीं असें ठरलें, कीं मीं सांगतों." विरूपाक्ष हा एका चारण जातीच्या गृहस्थाचा मुलगा होता. नांवाप्रमाणेंच तो स्वरूपानें होता आणि कोणत्याही कामांत सरळ मार्ग असेल तो त्यास दिसावयाचा नाहीं अशी त्याची मनस्थिति होती. यामुळें गुरुजी त्यास नेहमीं विरूपाक्षपंडित म्हणत आणि मुलेंही अर्थातच विनोदानें त्याच नांवानें हांका मारीत. होतां होतां त्या विरूपाक्षाच्या मनाची स्थिति अशी झाली, कीं आपण खरोखरीच फार मोठे बुद्धिवान्, फार स्वरूपवान् व फार चाणाक्ष अशी त्याची पक्की भावना झाली. आणि त्यामुळें केव्हांही कोणत्या गोष्टींत कांहीं विचारण्याला जा. त्याचें उत्तर ठेवलेलें असावयाचें, तें कधीं बरोबर नसावयाचें. कांहींतरी आचरट असावयाचें हें पक्कें ठरलेलें पण हें जसें ठरलेलें, तसें तेंही ठरलेंच, कीं तो ज्यांत त्यांत बोलल्याखेरीज रहावयाचाच नाहीं.

प्रस्तुत प्रसंगीं तर काय सर्व शिष्यांस गुरुमहाराजांनीं पृच्छाच केली कीं, त्या लेखांतील अर्थ कोणास काय लागतो तें पाहूं.

विरूपाक्ष पुढें सरसावला, आपल्या सततच्या तिर्यग्दृष्टीनें व स्मित करून एकवार सर्वांकडे पाहून म्हटलें: " गुरुमहाराज, बाकीच्यांचा अर्थ ऐकण्यापूर्वीं मला विचारलें तर मी सांगतों. पण मीं एकदां काय तो सांगून दिला, कीं मग सारे म्हणूं लागतील, कीं यांत काय आहे. हा अर्थ आम्हींच लावला आहे. त्यांत विरूपाक्षाची काय एवढी चातुरी ! म्हणून म्हणतों, कीं कृपा करून गुरुमहाराजांनीं आधीं या बाकीच्या मंडळींना अगदीं एकेकाला निरनिराळें विचारावें. त्यांनीं आपल्याला कांहीं याचा अर्थ समजत नाहीं असें सांगितलें म्हणजे मी सांगतों, आणखी तो आपल्याला पटला तर पहा, पण मी खरा अर्थ सांगून सवरून 'अं त्यांत काय आहे ?' असं ज्यानं त्यानं म्हणत सटावं [illegible] तात्पर्य नाहीं. "

विरूपाक्ष पंडिताचें तें भाषण ऐकून गुरुमहाराजांस समजेना कीं आपण हंसावें कीं रडावें. कारण हे पंडित आपण स्वतःस सर्वांस श्रेष्ठ समजून अर्थ करणार आणि तो खरोखर कळला नसून इतर लोक "आमचा तोच अर्थ" असें धरून आपलें यश घेणार ही यांस भीति.

परंतु ते त्यास हंसत हंसत म्हणाले:— " विरूपाक्ष पंडित आपल्याला कोणचीही भीति वाटून आपण उगीच अर्थ सांगून टाकूं नका तेच चांगलें. इतरांचे काय अर्थ ते बाहेर पडूं द्या, आणखी त्यांची सगळ्यांची फजिती झाली, कीं मग पाहूं काय प्रकार होतो तो ? तोंपर्यंत आपला अर्थ चांगला दाबून झांकून ठेवा बरंका. नाहीं तर त्याच्यावर कोणी झडप घालून या निधीसारखाच तोही कोणी तरी उठवून नेईल. आपल्या हातानें आपलें डोकें झांकून दाबून ठेवा, नाहींपेक्षां केव्हां आपल्या डोक्याला भेदून तो अर्थ बाहेर पडेल. किंवा कोणी तरी डोक्यावर चपाटा हाणून तें फोडून त्यांतून अर्थ काढून घेईल. संभाळा, विनाकारण डोकें फुटावयाचें ! "

गुरुजींच्या तोंडून हे शब्द बाहेर निघतांक्षणीं सर्व मंडळी गदगदां हंसली आणि विरूपाक्षास उद्देशू म्हणतात:— " खरें रे खरें गड्या. तुझें डोकें न संभाळावयालाच पाहिजे. त्यांतला तो अर्थ काढायला आम्ही जरी तें फोडलें नाही तरी अति पक्क झालेल्या डाळिंबाप्रमाणें तें आपोआपच फुटायचें ! संभाळा संभाळा. आम्ही येऊं काय तुमचं डोकें फुटूं नये म्हणून दाबून ठेवायला ? "

इतकें बोलून मुलें त्याच्या अंगावर गेली व ज्यांनीं त्यांनीं त्याच्या डोक्याला हात घालून सडकून दाबण्याचा सपाटा चालविला ! कोणी त्यास गणेशटोपी घावी असा विचार करून त्याच्या डोक्यावर फडकें टाकलें आणि बोटांच्या पेरांनीं त्याच्या त्या डोक्यावर चट्चट् मारण्यास सुरुवात केली. परंतु ह्या बालचेष्टा गुरुमहाराजांनीं फार वेळ चालूं दिल्या नाहींत. त्यांनीं त्याला तेव्हांच सोडविलें आणि म्हटलें " पोरांनो, काय हें करतां ? विनोद करायचा तो तोंडानें करावा हातानें करूं नये. तुम्ही सान्यांनीं असे हात टाकलेत, तर तो बिचारा एक क्षणभरसुद्धां जगावयाचा नाहीं ! त्याची अक्कल तरी चालणार नाहीं म्हणून कशावरून ? विरूपाक्ष पंडित, तुम्ही म्हणतां तर आपण तसेंच करूं. तुम्ही आधीं आपला अर्थ सांगूं नका. मी एकेकाला विचारतों. आणखी त्यांचें सगळ्यांचें झालें म्हणजे मग पाहूं तुमचा अर्थ काय आहे तो. "

असें म्हणून त्यांनीं एकेका मुलाला त्या संदुकीवरील लेख वाचून अर्थ करण्यास सांगितलें. त्या ओळी दिसण्यांत अगदींच सोप्या होत्या. यामुळें प्रत्येकानें त्यांस म्हटलें " शिर कापलें तर धन मिळेल. नाहीं कापलें तर लाभ होईल. " गुरुजींनीं सर्व मुलांना एकामागून एक ओळी वाचण्यास सांगून अर्थ विचारला. त्यांनींही जो पहिल्या मुलानें केला तोच दुसऱ्यानें केला दुसऱ्यानें केला तो तिसऱ्यानें असा क्रम चालविला. पांच सात जणांना याप्रमाणें विचारल्यानंतर तोच अर्थ सगळे सांगणार हें जाणून त्यांनीं शेवटीं म्हणून विरूपाक्ष पंडितास विचारला. विरूपाक्ष पंडितानें अगदींच हिरमुसलें तोंड करून म्हटलें, " गुरुमहाराज, मलाही हाच अर्थ सुचला होता. दुसऱ्या कोणाला हा सुचायचा नाहीं असें खचित मला वाटत होतें, परंतु पहातों तों जो तो माझ्यासारखाच अर्थ सांगतो ! पण गुरुमहाराज, मला अर्थ आधीं समजला आणखी तो मीं प्रत्यक्ष जरी तोंडानें सांगितला नाहीं, तरी पण माझ्या चेहेऱ्यावरून यांनीं ओळखूनच सांगितला असला पाहिजे. आपण कांहीं म्हणा, माझ्या चेहेऱ्यावरूनच त्यांनीं ओळखून सांगितला असें मला वाटतें. "

रामगुरु ते ऐकून हंसले. मोठ्यानें हंसले आणि त्यास म्हणाले " मूर्खा, तुझा चेहरा तर असा आहे, कीं त्याच्यावरून तुझ्या मनांतला कोणताही विकार किंवा विचार मुळींच कोणाच्या ध्यानांत येणार नाहीं. बरें कांहीं हरकत नाहीं; पण तुझ्या अंगीं एक गुण जबरदस्त आहे; तो या सर्वांच्यापैकीं कोणाच्याही अंगीं नाहीं. तो कोणता हें या साऱ्यांच्या प्रत्ययास लवकरच आणून देईन. "

तें ऐकण्याबरोबर विरूपाक्ष एकदम खुलला व गुरुजींनीं आपल्या अंगीं असणाऱ्या ज्या गुणाचें एवढें कौतुक चालविलें आहे, तो गुण तरी कोणता? हें समजण्याची इच्छा होऊन तो एकदम गुरुजींस म्हणतो, " कोणता गुण ? कोणता गुण ? तो मला या सर्वांचे देखत सांगून ठेवा म्हणजे हे माझी चेष्टा करूं लागले, कीं त्यांना त्या गुणाची आठवण करून देईन. "

तें ऐकतांच गुरुजी मोठ्यानें हंसले आणि मुलेंही पोट धरधरून हंसूं लागलीं. कित्येक तर त्याच्याजवळ जाऊन त्याला म्हणतात, "विरूपाक्षपंडित, आम्ही सांगूं आपला गुण कोणता तो? आमच्या सगळ्यांच्या प्रत्ययाला तो गुण केव्हांच आला आहे. नव्यानें यायचा नाहीं. पंडितजी, तो आपला गुण खरोखरीच आमच्यांत नाहीं. सांगूं का तो गुण ? "

विरूपाक्ष मोठ्या रागाच्या आविर्भावानें हातवारे करीत त्या सर्वांच्या पुढें जाऊन म्हणतो,, " सांगा सांगा पाहूं "

त्याबरोबर चंद्रभाट त्याला म्हणतो ' अरे मूर्खपणा. '

बिचारा विरूपाक्ष अगदीं खजील झाला. त्याला वाटलें कीं आपल्या अंगीं कांहीं खरा गुण आहे व तो दुसऱ्याच्या अंगीं नसणारा असा आहे, परंतु चंद्रानें " अरे मूर्खपणा " असे शब्द उच्चारण्याबरोबर त्याला अगदीं विरघळल्याप्रमाणें झालें आणि अति वाईट वाटलें. गुरुमहाराज त्याच्याकडे पहात होते. त्यांस त्याची अतिशय खजील झालेली चर्या पाहून फार वाईट वाटलें, म्हणून त्यांनीं त्या पोराला आपल्या जवळ ओढून घेऊन त्यास म्हटलें: " पोरा, तुझी आतां चेष्टा करताहेत, परंतु थोड्या वेळानेंच असा प्रसंग येईल, कीं हे तुझी चेष्टा न करता त्यांचीच कायमची परीक्षा होऊन तूं त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ ठरशील. तूं असा खंती होऊं नकोस, समजलास ? हीं दुसरीं मुलें विनाकारण चढून गेलीं आहेत. परंतु त्यांचा नक्षा खालीं उतरेल अशी माझी पक्की समजूत आहे. पाहूं आतां. "

इतकें बोलून ते कांही वेळ थांबले. त्यांनीं कांहीं विचार केला. नंतर सर्व मुलांना ओळीनें आपल्यापुढें उभें केलें आणि त्यांस गंभीरपणानें म्हणतात: " मुलांनों, तुम्ही सगळे क्षत्रिय. कोणी सोमवंशी, कोणी सूर्यवंशी. तुम्हांला आजपर्यंत मी इतिहास, पुराणांतल्या गोष्टी सांगून पुष्कळ शहाणें केलें. धनुर्विद्येंत तर आतां तुमचा हात धरणारा कोणीच उरला नाहीं असें म्हटलें तरी चालेल. तेव्हां आतां तुमच्याजवळ एक गोष्ट काढतों. तुम्हांला ठाऊकच आहे, कीं प्राचीनकाळीं शिष्यांनीं विद्याग्रहण केलें म्हणजे गुरु-दक्षिणा द्यावी लागते. ती गुरुदक्षिणा गुरु ज्या प्रकारानें सांगेल तशी संपादन करूनही आणून द्यावी लागे. आपल्या वडिलांपासून घेऊन किंवा दुसऱ्याच्या कष्टानें संपादन करून दिलेली चालत नसे हें तुम्हांला माहिती आहेना ? गुरुदक्षिणा कोणीं आपल्या शिष्याजवळ कशी मागितली, आणि कोणा शिष्यानें ती त्यांस कशी अर्पण केली, याबद्दलच्या कथा मीं तुम्हांला सांगितल्या आहेत त्या आठवतात काय ? आठवत असल्या तर आतां त्याप्रमाणें करण्याची पाळी आली आहे. असें समजा हा निधि येथें आहे. हा निधि तुम्ही कोणीही संपादन करा आणि मला अर्पण करा. तीच तुम्ही मला गुरुदक्षिणा दिली असें होईल. बोला, कोण हा निधि माझ्या स्वाधीन करायला तयार आहे ? "

तें गुरुमहाराजांचें बोलणें ऐकतांच सर्व विद्यार्थी एकमेकांकडे पाहूं लागले. गुरुजींच्या बोलण्याचा अर्थच कोणास कळेना असें दिसलें. तीं वेड्याप्रमाणें इकडे तिकडे पाहूं लागली. गुरुजींनीं त्यांचें लक्षण पाहिलें आणि ते त्यांस म्हणाले: " अरे, असें वेड्यासारखें काय पाहतां ? मी बोलतों याचा अर्थ तुम्हांला समजला नाहीं काय ? समजला नसला तर मला विचारा. मी तुम्हाला समजावून सांगतों. तें ऐकून चंद्रभाट धिटाईनें पुढें झाला आणि ह्मणतो: " निधि तर आपल्यापुढें आहे. आतां तो संपादन तो काय करावयाचा ? हें समजत नाहीं, तेव्हां मी बुचकळ्यांत पडलों. निधि संदुकींत आहे. ती संदूक फोडून आंतला निधि काढून घ्यावयाचा आणखी काय करावयाचें ? "

सर्व विद्यार्थी त्याचें तें भाषण ऐकून त्याचा प्रश्न समर्पक आहे असें वाटून तसें दिसणाऱ्या दृष्टीनें गुरुजींकडे पाहू लागले. गुरुजी मात्र मोठ्यानें हंसले व ह्मणाले:— " वत्सांनो, तुम्ही समजतां तितकी ती गोष्ट सोपी नाहीं. या कवितांचा अर्थ तुम्ही केला, किंवा समजतां तसा आहे खरा; पण तो चांगल्या प्रकारें तुमच्या मनांत उतरला नाहीं; तो आतां तुम्हांला मी समजावून सांगतों. बघा, हा निधि संपादन करणें तुम्हीं म्हणतां तितकें सोपें नाहीं. यांत असें म्हटलें आहे कीं शिर कापलें तर हा निधि तुम्हांला मिळेल. याचा अर्थ काय तो पहा. ही या निधीचें संरक्षण करणारी देवता आहे. या देवतेला संतुष्ट केलें तरच ही तुम्हांला हा निधि घेऊं देईल. तिला संतुष्ट करण्याला उपाय काय सांगितला आहे पहा. " जो कोणी आपलें शिरकमल कापून हिला वाहील, तो हा निधि संपादन करील. बोला आपलें शिरकमल वाहण्याला कोण तयार आहे ! "

तो अर्थ ऐकतांच सर्वजण दचकल्याप्रमाणें झाले. गुरुदक्षिणा देण्याला इतका थोरला भयंकर प्रसंग करून घ्यावा लागेल हें कोणासही संभवनीय वाटलें नाहीं. कोणाच्याही मनांत तसें आलें नाहीं आणि गुरुजींनीं एकदम असा अर्थ केल्यावर त्यांच्या मनांत काय आलें असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. प्रत्येकजण दुसऱ्याच्या मुखाकडे पाहूं लागला. आतां काय उत्तर द्यावें हें कोणासच समजेना. गुरुजींनीं त्यांची ती स्थिति बराच वेळ पाहिली. ते बराच वेळ कांहीं बोलले नाहींत. तटस्थपणें व गंभीर पणें त्यांच्याकडे पाहूं लागले. कोणीच विद्यार्थी कांहीं बोलत नाहीं. असें पहातांच ते त्यांस म्हणतात:— " बाबांनों तुम्ही असे अगदीं तटस्थ का

बसलां ? बोला. तुमच्यापैकीं कोणी हा निधि अशा प्रकारें संपादन करायला तयार नाहीं का ? अशा प्रकारें प्राणदान केल्याखेरीज हा निधि मिळावयाचा नाहीं हें अगदीं निश्चितपणें समजा. तेव्हां गुरुदक्षिणा देण्याकरितां आपल्या प्राणावर उदार होऊन पुढें होणारा कोणी आहे का एवढें मला सांगा, दुसरें कांहीं नाहीं. जो कोणी तयार असेल, त्यानें पुढें यावें. हें खड्ग. या खड्गानें आपलें शिर त्यानें कापून येथें या देवतेच्या चरणावर पाडावें, कीं हा निधि ती देवता आपण होऊन आपल्या स्वाधीन करणार. त्याबद्दल शंका नाहीं. आतां काय तें बोला. तुम्ही इतके आहां, कोणी एकजण जरी तयार झाला आणि आपलें शिरकमल येथें वाहिलें तरी हा निधि ही देवता मोठ्या संतोषानें आपल्या स्वाधीन करील. परंतु कोणी तरी आपल्या जिवावर उदार झाल्याखेरीज कांहीं हा निधि मिळत नाहीं. आपल्याला गुरुदक्षिणा द्यावयाची आणखी गुरूचा अंतरात्मा संतुष्ट करावयाचा असा ज्याचा निर्धार असेल त्याच्याच हातून हा आत्मयज्ञ होणार; दुसऱ्या कोणाच्या हातून होणार नाहीं हें अगदीं उघड आहे. तेव्हां आतां त्वरित काय कोणाचा विचार असेल, तो करा आणखी मला सांगा. हा खड्ग तुमच्याकारितां अगदीं सज्ज करून ठेविला आहे. तो उचला, जो कोणी " गुरुदक्षिणा आपण द्यावयाची. प्राण जावो कीं कांहीं होवो." अशा निर्धारानें तयार असेल त्यानेंच पुढें यावें. इतरांनीं कोणी येऊं नये. तुम्हीं नाहीं तयार झालां, तर त्याबद्दल मी कांहीं तुम्हांला दोष देत नाहीं. कधीं देणार नाहीं. कोणी तरी जिवावर उदार झालाच पाहिजे असें नाहीं नाहीं झालें, तर मला निधि मिळणार नाहीं इतकेंच काय तें. बाकी गोष्टी चालल्या आहेत त्या चालू राहतील. तुमची विद्या चालेल, माझा कांहीं तुमच्यावर राग होणार नाहीं. पण आपली माझी इच्छा तुम्हांला सांगितली. "

इतकें बोलून ते स्वस्थ बसले, आतां कोण काय म्हणतो हें पाहण्यासाठींच त्यांची दृष्टि त्या मुलांकडे वळली होती.

इतक्यांत एकदम विरूपाक्ष पुढें गेला. त्यानें गुरुजींपुढला खड्ग—कोशांतून बाहेर काढून पुढें ठेवलेला खड्ग— त्यानें उचलून घेतला आणि तो म्हणालाः—" गुरुमहाराज, मी सिद्ध आहें आपलें शिरकमल वहाण्याला; मी सिद्ध आहें. तसें करण्यापूर्वीं कांहीं मंत्र तंत्र करावयाचे असले तर ते करा. कांहीं नसलें करावयाचें, तर तसें सांगा. मी डाव्या हातानें आपली चूडा धरून उजव्या हातानें खांद्यापासून शिर वेगळें करतों आणि या देवतेच्या चरणकमलावर फेंकून देतों. "

तें त्याचें करणें व बोलणें पहातांच व ऐकतांच सर्व जणांच्या डोळ्यांपुढें एकदम लख्ख झालें आणि ते चकित होऊन त्याच्याकडे पाहूं लागले. कोणाच्या तोंडून एक शब्द निघेना. चर्येवर आश्चर्य व भय या दोन विकारांच्या मिश्र छटा मात्र दिसूं लागल्या.

गुरुजी अगदीं शांत होते. त्यांनीं त्यास थांबण्याविषयीं खूण करून म्हटलें: " वत्सा, ठीक. ठीक. परंतु तुझी विद्या अजून किती तरी व्हावयाची राहिली आहे. ज्यांची विद्या बहुतेक पूर्ण झाली आहे, त्यांच्यापैकीं कोणी पुढें येतो का पाहूं दे. तसा आला तर तुझी विद्या पूर्ण करण्यास तुला अवसर तरी सांपडेल, नाहींपेक्षां तूं म्हणतो आहेस त्याप्रमाणें करण्याला तुला मी अनुमति देईनच. कां, कीं माझा हेतु या निधीवर फार गेला आहे आणि या कवितांत तर स्पष्ट असें म्हटलें आहे कीं शिरकमल कापून वाहिल्याखेरीज हा निधि कोणाच्याही हातीं लागणार नाहीं. तेव्हां आतां कोण दुसरा सिद्ध होतो पाहूं. "

गुरुजींचें बोलणें ऐकतांच सर्व मंडळी पुन: एकमेकांकडे पाहूं लागली. कित्येकांच्या मनांत असा विचार आला, कीं गुरुजी फारच लोभी दिसतात. या निधीवर यांचें मन गेलें म्हणून शिष्यांपैकीं एकाचा घात करण्याला प्रवृत्त करणारा हा गुरु कसला ? गुरूंनीं विद्या शिकविली म्हणून त्यांना ते मागतील ती गुरुदक्षिणा द्यावयाची हें ठीक आहे. परंतु ही दक्षिणा शिष्यानें आपला प्राण देऊन देण्यांत अर्थ काय ? त्यानें जी विद्या संपादन केली, तिचा त्याला उपयोग काय ? आपलें शिर कापून प्राण दिल्यानंतर त्या विद्येचा त्याला उपयोग काय ? असे नानाप्रकारचे तर्कवितर्क त्या तरुण विद्यार्थ्यांच्या मनांत यावयास लागले. हें सर्व गुरुजींनीं त्यांच्या चर्येवरून ओळखलें. नंतर बराच वेळ थांबून ते त्या विरूपाक्षास म्हणतातः ' विरूपाक्षा, एकूण तूंच तेवढा सिद्ध झालेला दिसतो आहेस. माझें तर मन या निधीवर पुरें गेलें आहे. तुझें किंवा कोणाचें तरी शिरकमल या देवतेच्या चरणावर पडल्याखेरीज माझ्या मनाची इच्छा तृप्त होत नाहीं मग आतां काय करावयाचें. ये पुढें आणि कर काय मघाशीं म्हणालास तें. "

असें म्हणून त्यांनीं त्याला पुढें घेतलें. नंतर पुनः त्याला आपला खड्ग दिला. एका मुलास आपल्या आश्रमांत जाऊन गंध, अक्षता, पुष्पें व पाणी असें पूजासाहित्य आणण्यास सांगितलें. एकाच्या ऐवजीं पांच सात मंडळी धांवलीं. कोणीकडून गुरुजींच्या समोरून आपण निघून जावं ही काय ती

त्या वेळची बऱ्याच जणांची इच्छा. न जाणों आपल्यालाच स्पष्टपणें गुरुजींनीं तूं असें कर, आपलें शिरकमल वहा असें म्हटलें तर? अशा शंकेनें बरींच मुलें तेथून निसटलीं. गुरुजी शांतपणें त्यांच्या एकंदर कृतीकडे पहात व अर्धस्मित अशा चर्येनें उरलेल्या मुलांकडेही पहात. इतक्यांत पृथ्वीराज सर्वांत मागें होता तो धीरगंभीर पावलें टाकीत पुढें झाला आणि म्हणाला: " गुरुमहाराज, मी आपली इच्छा तृप्त करतों. हा विरूपाक्ष उगीच आपली अर्धी विद्या झाली नाहीं तों कशाला आपले प्राण गमावतो? माझी विद्या आपल्या कृपेनें बहुतेक पूर्ण झाली आहे. आणखी जो शेष राहिला आहे तो शिकून तरी काय उपयोग? आज देवतेला प्राण अर्पण केल्यानंतर विद्येचें महत्त्व काय? आपली मनस्तृप्ति हेंच आम्हांला साधावयाचें. ते जर अशा आत्मत्यागानें होतें आहे तर आणखी जीवाचें साफल्य तें काय व्हावयाचें? मी इतका वेळ पुढें आलों नाहीं याबद्दल क्षमा करा. माझ्या मनांत कांहीं दुसराच विचार आला आणखी थांबलों. पण खरोखर विरूपाक्षापेक्षां आम्हीच कोणी तरी या कृत्यास सिद्ध व्हायला पाहिजे. मी सिद्ध आहें." असें म्हणून तो हात जोडून पुढें उभा राहिला. गुरुजींनीं किंचित् तिरस्कारयुक्त दृष्टीनें इतर सर्वांकडे पाहून म्हटलें "ठीक. ठीक. तुझ्यासारख्या क्षत्रिय पुत्रासच हें कर्म योग्य, तर तूं हें एवढें करून माझी इच्छा तृप्त कर. ये पुढें."

तें पाहतांच विरूपाक्षाला फार वाईट वाटलें आणि तो गुरुजींच्या पुढें येऊन म्हणतो:–" गुरुमहाराज, मी पहिल्यानें सिद्ध होऊन आपल्या खड्गास हात घातला. आतां कां बरें मला मागें लोटतां? माझ्या हातून एवढी तरी आपली सेवा होऊं द्या. माझें दुसरें कांहीं मागणें नाहीं. शिवाय गुरुमहाराज, हा पृथ्वीराज फार लहान आहे. हा सार्वभौम होण्याचीं चिन्हें याच्या हातावर आहेत असें आपणच म्हणत असतां, तेव्हां याला जगूं द्या. आणखी मला गुरुकार्य करूं द्या. हा जर नाहींसा झाला, तर जगाची हानि होईल. मी असलों काय आणखी नाहीं काय सारखेंच. कारण त्यासाठींही नाहीं मी म्हणत. माझं म्हणणें एवढेंच, कीं माझा देह आपल्या कारणीं लागूं द्या. हा पृथ्वीराज आपल्या आईबापांचा एकुलता एक, आपल्या आजाचा अगदीं जीव कीं प्राण. तेव्हां त्याला प्राणत्याग करावयाला लावून आपण हा निधि मिळविला असें त्यांना आणखी जगाला कळलें तर जग तरी काय म्हणेल?"

गुरुमहाराज कांहीं वेळ स्तब्ध बसले. इतक्यांत जीं मुलें अर्घ्य व पूजासा-

हित्य आणण्यास गेलीं होतीं तीं कांहीं परत आलीं. त्यांनीं आणलेली सामुग्री गुरूंच्या जवळ ठेवली. त्या मुलांपैकीं कांहीं परत आलीं नाहींत. तीं कोण कोण याबद्दल तपासणी घेण्याकरितांच जणूं काय गुरुजींनीं एकवार सर्वांकडे नजर फेंकली; नंतर आपल्याशींच ते हंसले आणि म्हणतात:—"बाळांनो, तुह्मी कोणीच आपलें शिरकमल वाहूं नका. मला पैशाचा लोभ सुटून मी तुह्मांला असलें कृत्य करण्याला उद्युक्त करूं लागलों, याबद्दल माझा मलाच पश्चात्ताप होतो आहे. तर आतां तुह्मी सर्व स्वस्थ बसा. मी ज्या लोभीपणानें या अशा कृत्यास तुम्हांला उद्युक्त करूं लागलों त्या लोभाचें प्रायश्चित्त माझें मीच घेतों. मात्र माझें शिर या देवतेच्या चरणावर पडलें कीं, हा निधि तुह्मी कोणी घेऊं नका एकट्या विरूपाक्षाला द्या."

"विरूपाक्षाला द्या" हे शब्द गुरुजींच्या तोंडून बाहेर पडले मात्र. विरूपाक्ष एकदम दोनही हात वर करून म्हणतो "छे छे. गुरुहत्येनें प्राप्त होणारा निधि मी कालत्रयीं घेणार नाहीं. गुरुमहाराज आतां आपण उगीच कांहीं विलंब लावूं नका. मला माझ्या पहिल्या संकेताप्रमाणें करूं द्या. या निधिदेवतेला संतुष्ट करणारा हा बळी तयार आहे. याची आतां आपण पूजासुद्धां करूं नका. मीं आपली मानसपूजा केली आहे. आपण जर आज्ञा दिली नाही तर आपली अवज्ञा करून मी आपला प्राण या निधिदेवतेला अर्पण करणार. आपण तो निधि स्वीकारण्याला मात्र अनमान करूं नका."

गुरुमहाराजांनीं कष्टी झाल्यासारखें दाखविलें, नंतर ते खिन्नपणें म्हणाले: "बरें तर तुझ्या इच्छेप्रमाणें कां होईना माझ्या या लोभीपणाचा परिणाम इतकाच होणार कीं मला तुझें हें भयंकर ऋण फेडण्यासाठीं पुनः जन्म घ्यावा लागेल. कांहीं हरकत नाहीं. या जन्माचे काय थोडे दिवस उरले आहेत, तेवढ्यांत मला या निधीचा उपभोग तरी घेऊं दे. तुझी मर्जी आहे तर ये पुढें आतां. मी तुझी पूजा करून तुला सिद्ध करतों" असें म्हणून त्यांनीं त्यास पुढें घेतलें आणि त्याच्या पूजेस सुरवात केली. त्याला तांबड्या फुलांच्या माळा घातल्या, त्याच्या अंगावर पुष्कळसें कुंकूं टाकलें आणि त्यास आपल्या मानेवर खड्गप्रहार करण्यास आज्ञा केली. तें पाहून इतर सर्व विद्यार्थी भयचकित झाले. त्यांच्या चर्येवर गुरूविषयीं तिरस्कार दिसूं लागला. गुरूंनीं त्यांच्याकडे पाहिलेंही नाहीं. त्यांची दृष्टि त्या विरूपाक्षाकडे होती. तो अगदीं शांत होता. त्यानें शांतपणें तो खड्ग उचलला व आपल्या मानेचा छेद करण्याकरितां मानेजवळ नेला. दुसऱ्या हातानें आपलीच चुडा

धरली व जयगुरुमहाराज की जय ! असा जयजयकार केला आणि आतां घाव घालणार तोंच गुरुमहाराजांनीं त्याचा हात वरच्यावर धरून इतर सर्वांकडे पहात त्यास म्हटलें, " शाबास विरूपाक्षा ! तुझी नेहमीं चेष्टा करणाऱ्यांच्या सगळ्यांच्या प्रत्ययाला तुझी खरी योग्यता काय आहे हें आणून देण्यासाठींच मीं इतका सगळा प्रकार केला. जा. मला अशाप्रकारानें निधि प्राप्त करून घेण्याची इच्छा नाहीं आणि हा निधि प्राप्त करून घेण्याचा मार्ग इतका अवघडही नाहीं.

शिरहट्टे धनसंग्रहे । शिरसज्जे धनजाय ॥

याचा अर्थ इतकाच कीं या संदुकीवर असणाऱ्या दोन सिंहांचीं व अधिदेवतेचीं शिरें जोंपर्यंत कायम आहेत तोंपर्यंत हा धनसंग्रह कोणास मिळणार नाहीं. पण तीं शिरें पाडलीं कीं संदूक उघडून धनलाभ होईल, त्याला दुसऱ्या कोणाच्या शिराचा बळी नको कीं कांहीं नको.

दुसरीं सर्व मुलें अगदीं खजील झालीं आणि तितक्यांत इतका वेळ ज्या प्रकाशावर हा सर्व प्रकार चालला होता तो प्रकाशही संपुष्टांत येण्याचा रंग दिसूं लागला. अर्थात् मंडळी तेथून निघून गेली.

दुसरे दिवशीं पुनः मंडळी तेथें जमून त्या पुतळीचें व त्या दोन सिंहांचीं शिरें गुरुजींनीं सुचविलेल्या अर्थाप्रमाणें त्यांच्या धडापासून वेगळीं केल्याबरोबर ती संदुक एकदम उघडली. आणि आंत नेत्रांना अगदीं दिपवून टाकणारी अशी संपत्ति त्यांच्या नजरेस पडली.

---

# प्रकरण ५ वें.



[ अनंगपाळ आणि विमला यांचा समेट व्हावा म्हणून कमला फारच खटपट करीत होती, पण तिला यश आलें नाहीं. मग तिच्या नवऱ्यानें–सोमेश्वरानें एक युक्ति योजिली. त्यानें कांहीं निमित्तानें अनंगपाळ आणि विजयपाळ ( विमलेचा नवरा ) यांना आपल्याकडे बोलावून त्यांच्यांतील तेढ नाहींशी करण्याचा विचार केला. त्याप्रमाणें अनंगपाळ त्या गांवीं येणार होता. त्याचवेळीं विजयपाळानें विमलेसह आपल्याकडे यावें अशी सोमेश्वरानें फार आग्रहाची विनंति केली. त्याप्रमाणें त्यानें निघण्याचा बेत केला. पण विमलेला तें पसंत पडलें नाहीं. तिनें पुष्कळ त्रागा केला. त्यानें भागेना. तेव्हां आपल्या मुलाला घेऊन मोठ्या युक्तीनें ती हिमालयांत आपल्या घंटकापालिक नांवाच्या गुरूकडे मंत्रसाधन करण्यासाठीं गेली. रात्रीं हा प्रकार झाला व सकाळीं विजयपाळ पहातो तों बायको आणि मुलगा यांचा पत्ता नाहीं. ]

## विमला व जयचंद.



मागील चार प्रकरणांत सांगितलेली सर्व हकीकत घडून सुमारें दोन वर्षें झालीं, इतक्या अवधींत विमलेचें राजा अनंगपाळानें नांवसुद्धां काढलें नाहीं. याला तिचा भयंकर तिटकारा आला होता. कमला मात्र या कारणामुळें अत्यंत कष्टी असे. आपल्यामुळें बापाचें व आपल्या वडील बहिणीचें इतकें वैमनस्य आलें हें राहून राहून तिच्या मनांत येऊन तिला असें वाटे कीं, आपण कांहीं तरी करून आपल्या वडिलांच्या मनांतून विमलेविषयींचा तिरस्कार नाहींसा करावा. काय युक्तीनें हें साधेल हें मात्र तिला कांहीं समजेना. तिनें आपल्या नवऱ्यालाही पुष्कळ वेळां अशी विनंति केली कीं आपण कांहीं तरी युक्ति काढून हा योग जुळवून आणावा. त्या बुद्धानें त्यानेंही एकदां दोनदां आपल्या सासऱ्यास चार दिवस अजमिरास रहाण्यास यावें असा आग्रह केला आणि इकडे आपल्या साडूस म्हणजे विमलेच्या पतीस व तिला स्वतःलाही चार दिवस आपले येथें पाहुणचार घेण्यास यावें असें आमंत्रण केलें. त्याच्या मनांतला उद्देश हा कीं, अशा प्रकारें ही सर्व

मंडळी एकत्र आली, तर फार चांगलें होईल. मागलें सर्व विसरून जाऊन पुन: सर्वांचें ऐक्य होईल. निदान मनांतली तेढ तरी नाहींशी होईल. परंतु मनुष्य चिंतीत असतो एक आणि घडतें भलतेंच. याप्रमाणेंच याही वेळीं झालें.

पृथ्वीराजाला रामगुरूजवळ ठेवून त्याचा विद्याभ्यास बराच झाला. आतां त्याला चार दिवस त्याच्या बापाकडे जाऊं देण्यास हरकत नाहीं व आपलेही आतां तपोवनांत जाण्याचे दिवस आले तेव्हां एकवार जांवयाला, मुलीला वाटतें आहे म्हणून त्यांचे घरीं जाऊन यावें. आपला विचार काय आहे तेंही जांवयास स्पष्टपणें सांगावें असें अनंगपाळाच्या मनांत येऊन त्यानें सोमेश्वराचें आमंत्रण स्वीकारलें.

अनंगपाळानें आमंत्रण स्वीकारलें असें कळतांच सोमेश्वराचे मनांत विशेषच आशा उत्पन्न होऊन त्यानें विजयपाळास फार आग्रहाचें पत्र लिहिलें. इतकें कीं, तें वाचून विजयपाळास ' नाहीं येत ' असें म्हणणें मोठें जिवावर आलें. त्यानें आपल्या पत्नीस सांगितलें कीं, सोमेश्वराचें इतक्या आग्रहाचें पत्र आलें आहे, तर आपण नाहीं म्हणूं नये. जावें हें चांगलें. परंतु विमला म्हणजे केवळ दंश धरणारी सर्पिणी होती. तिला तें आपल्या नवऱ्याचें भाषण मुळींसुद्धां रुचलें नाहीं. " मी ? आणखी त्या चांडाळणीच्या घरीं जाईन ? या जन्मांत तर मी तिचें तोंड पाहणार नाहीं, मी तिच्या इथें पाऊल कुठली घालायला ? आपल्यालाच मी सांगतें, कीं आपला मान राखून घ्यायचा असेल, तर आपण जाऊं नका. ती चांडाळीण उद्यां मरावयाला जरी टेकली आणखी मला तिनें शेवटल्या भेटीसाठीं म्हणून बोलावलें तरी सुद्धां मी जावयाची नाहीं. आणखी मी मरावयाला टेकलें आणखी ती आपण होऊन माझ्या जवळ आली, तर मी डोळ्यांवर हात ठेवून तिच्याकडे पाठ करून तिला नाहीं नाहीं त्या शिव्यान् शाप देत प्राण सोडीन. "

विमलेचे ते भयंकर शब्द ऐकून विजयपाळालासुद्धां त्या प्रसंगीं आश्चर्य वाटलें. विजयपाळालासुद्धां म्हणण्याचा अर्थ इतकाच कीं आपल्या बायकोचा स्वभाव फटकळ व खुनशी आहे हें त्याला पक्कें माहीत होतें, त्याबद्दल अनेक अनुभवही त्याला आले होते. परंतु त्या खुनशीपणाची मजल या पल्ल्यापर्यंत येईल असें त्याला वाटलें नव्हतें. तिचीं विलक्षण भाषणें आजपर्यंत त्यानें अनेक ऐकलीं होतीं, परंतु आजच्या या भाषणानें अगदीं कडेलोट झाला. तें भाषण ऐकून त्याला तिचा रागही आला व त्या रागाचा परिणाम असा

झाला कीं त्यानें आपल्या साडूचें—सोमेश्वराचें—आमंत्रण स्वीकारावयाचें व आपली बायको जरी आली नाहीं, तरी आपण आपल्या मुलाला घेऊन द्रोणगिरीला जावयाचें असा आपल्या मनाचा निश्चय केला. इतकेंच नव्हे, तर तो त्यानें आपल्या कुटुंबाला बोलूनही दाखविला.

विमलेनें तो आपल्या नवऱ्याचा निश्चय ऐकतांक्षणींच तिला इतका संताप चढला कीं तिला कसलें भान राहिलें नाहीं. " काय ? काय ? " संतापानें ओंठ थरथरत व शब्द चांचरत चांचरत ती खेंकसून म्हणाली: " काय ? काय ? तुह्मी माझ्या पोराला त्या डाकिनीच्या घरीं नेणार—मी बरोबर नसतांना त्याला तुह्मी तिच्या घरीं घेऊन जाणार ! माझ्या पोराला ती ठार मारील. ती त्याला कांहींतरी चेटूक करील— ती मोठी डाकिनी आहे, शाकिनी आहे, अघोर आहे. ती माझ्या पोराचा बळी देईल. याबद्दल तुमच्या मनांत कांहीं येत नाहीं ? मी इथें आडवी पडेन, प्राण देईन, तुह्मी याला नेला तर. माझ्या मढ्याला ओलांडून त्याला जाऊं द्या पाहिजे तर, पण मी त्याला कधीं ह्मटल्या कधीं आपल्याबरोबर अजमिराला जाऊं देणार नाहीं. आपणही जाऊं नये. "

विमलेचे हे सर्व शब्द उच्चारतेवेळचा आविर्भाव फार भयंकर होता. तिचे वेणींतून सुटलेले कपाळाजवळचे केंस थरारून उभे राहिल्याप्रमाणें दिसूं लागले. डोळे तर इतके लाल झाले, कीं जणूं काय डोक्यांतलें सगळें रक्त खालीं उतरून डोळ्यांत सांकळून राहिलें आहे. नाकातोंडांतून वाफा निघतात कीं काय असे भयंकर फुत्कार चालले होते. तिचें तोंडही इतकें लाल भडक झालें कीं आतां गाल वगैरे फुटून रक्तप्रवाह होतो कीं काय अशी भीति वाटूं लागली. विमलेच्या संतापाचे अनेक प्रसंग अनुभवलेला विजयपाळही तें पाहतांच खूप दचकला व त्यास असें वाटलें कीं इतक्या स्थितीला हिचा संताप गेला आहे तेव्हां आतां आपणही थोडा विचार करावा. कमलेचें जें आजपर्यंतचें वर्णन त्यानें ऐकलें होतें, तें असें होतें, कीं ती फार सात्विक, साध्वी, अत्यंत गुणी आणि सर्वांगमनोहर अशी होती, तिला पाहिलें किंवा तिच्याशीं चार शब्द बोललें तर कोणाच्याही अंतरात्म्याला अत्यंत संतोषच व्हावयाचा; परंतु हिच्याच मनांत तिच्याविषयीं इतका भयंकर द्वेष कां ? केवळ तिच्या मुलाला अनंगपाळानें आपल्याजवळ ठेवलें, आपल्या देखरेखीखालीं त्याचा विद्याभ्यास चालविला आहे. जयचंद तेथें त्यांच्याजवळ असतां पृथ्वीराजाइतकें प्रेम त्याच्यावर दाखविलें नाहीं एवढ्यानें निरुपाविषयींचा—नशा सत्य-

शील स्त्रीचा—इतका राग कोणीं करावा ही त्यास कल्पनासुद्धां बरोबर वाटेना; तथापि ही वेळ तसें कांहीं बोलून आपल्या पत्नीच्या संतापांत भर घालण्याची नव्हे असा विचार करून त्यानें त्या वेळीं आपल्या पत्नीसमोरून पायच काढला.

परंतु आपल्या बायकोच्या या अकारण संतापाला महत्त्व देऊन आपण आपल्या साढूच्या व सासऱ्याच्या भेटीचा योग घालवावा हें विजयपाळास बरें वाटेना. विजयपाळ हा फार सत्वशील होता; त्याला एवढें स्पष्ट कळलें कीं, आपल्या बायकोच्या मनांत कमलेविषयीं व तिच्या पुत्राविषयीं मत्सर उत्पन्न होऊन हा सर्व प्रकार झाला आहे. तो स्वत: लोभी नव्हता. त्याचें स्वत:चें राज्य फार विस्तृत होतें. त्यामुळें अनंगपाळानें [illegible] वांटा आपल्या मुलाला न देतां एकट्या पृथ्वीराजाला सबंध राज्य दिलें तरी त्याचा राग किंवा विषाद मानण्याचें मुळींच त्याच्या मनांत येईना. आपल्या बायकोचा स्वभाव त्यास माहिती होता, यामुळें तर त्यास विशेषच असें वाटलें कीं, आपण त्या गोष्टींत मन घालूं नये. जेवढें आपलें राज्य आहे, तेवढें संभाळून क्षत्रियाला उचित असे पराक्रम करून आपल्या मुलानें पाहिजे तर राज्यविस्तार करावा. परंतु कोणी कोणाला राज्य दिलें म्हणून त्याबद्दल त्याच्यावर किंवा सगळ्या लोकांवर संतापण्याचें आणि आपल्या व दुसऱ्याच्या जिवाला विनाकारण त्रास देण्याचें कांहींसुद्धां कारण नाहीं असें त्यानें आपल्या मनाशींच म्हटलें आणि जयचंद्राला घेऊन अजमीरला जावयाचें असा कृतनिश्चय केला ! आपल्या बायकोस कळूं न देतां त्यानें आपल्या नौकर लोकांपैकीं व शिपायांपैकीं जितक्यांना बरोबर घ्यावयाचें तितक्यांना अमूक दिवशीं अजमिराला जावयाचें आहे, तयारी करा, असा हुकूम दिला; आणि जयचंद्राला बरोबर नेण्याचाही आपला विचार असल्याबद्दल त्याच्या तैनातींतल्या लोकांनाही हुकूम पाठविले. तें कानावर जातांच विमलेच्या अंगाची संतापानें लाही लाही झाली. आपण इतका त्रागा केला असतांही आपला नवरा आपला हेका चालविणार असें पाहिल्यावर—आणखी विमलेसारखी स्त्री !—तिनेंही आपल्या मनाचा कांहीं निश्चय केला व ही मंडळी कशी जातात हेंच पहातें अशी प्रतिज्ञा केली. ही प्रतिज्ञा तिनें आतां मात्र कोणास सांगितली नाहीं.

चार दिवस गेले. पांचवे दिवशीं मंडळी निघावयाची अशी जिकडे तिकडे तयारी होती. त्या तयारीप्रमाणें पहांटे गर्गाचार्यांच्या मुहूर्तावर निघावयाचें होतें. परंतु त्याच्या अगोदर एक प्रसंग घडला.

मध्यरात्रीची वेळ. जयचंद्रास आदले दिवशींच विजयपाळानें गुरुगृहाहून आणून आपल्या वाड्यांत त्याच्याकरितां सज्ज केलेल्या दिवाणखान्यांत निजविलें होतें. पहांटे निघावयाचें असा बेत होता, यामुळें ही तयारी होती. विमलेला हें सर्व कळलें होतें. आपला निश्चय झाला आहे तेव्हां आतां ती काय करणार असें विजयपाळाला वाटून त्यानें तिला स्वतः कांहीं एक न सांगतां निघण्याची तयारी केली होती. विमला पाळथीवर होतीच, तिनें आपला बेत काय झाला होता तो कोणास कळूं दिला नाहीं. सर्व कांहीं आपल्या इच्छेप्रमाणेंच घडणार असें विजयपाळास वाटूं दिलें. आपण अद्यापिही राजाच्या बेताला प्रतिकूल आहों हे समजूं द्यावयाचें नाही अशीच विमलेनें व्यवस्था केली. आपण इतका संताप दाखविला, इतका त्रागा केला, तरी पति ऐकत नाही तर पत्नीनें निमूटपणें सर्व सहन करावयाचें याच्या पलीकडे काय ? असले उद्गार आपल्या परिवारातील दासदासींच्या देखत काढून ते राजाच्या कानी जातील असे केलें. ते तसे उद्गार राजाच्या कानीं गेल्यावर तर राजास फारच समाधान झालें. आपण असाच दृढनिश्चय दाखविला, तर "मी सुद्धां येतें" असें ती म्हणेल असें सुद्धां राजाला वाटलें. त्याप्रमाणे झालें असेही दिसूं लागलें, सायंकाळीं राजाच्या कानीं असेंही गेलें, की विमलाही आपली तयारी करीत आहे. "पतीची मर्जी जर आहे, तर आपण आपला हेका कां चालवावा ? इतका संताप आपण केला हेंच फार चुकीचें झालें. पण झालें त्याला उपाय नाहीं. त्याबद्दल क्षमा मागून परिमार्जन करितां येईल," असेंही ती बोलली व तेंही राजाच्या कानीं जाईल अशी तजवीज झाली. जिकडे तिकडे वातावरण अगदीं शांत झालें. आतां कांही विघ्न येत नाहीं असें राजाच्या मनास वाटलें व त्याप्रमाणें आतां पहांटे जावयाचें तर चार घटका रात्र उरतांच मला जागे करा म्हणून त्यानें आपल्या नोकरास बजावून सांगितलें व जयचंद्रासही उठविण्यास सांगून राजा झोंपी गेला. जिकडे तिकडे शांत झालें.

मध्यरात्र झाली. पहारेकऱ्यांखेरीज कोणी कोठें जागें नाहीं. इतक्यांत एक केश पसरलेली व रक्तवस्त्र नेसलेली आणि एका हातांत एक दीपिका घेतलेली व दुसऱ्या हातांत एक खंजीर घेतलेली अशी भयंकर दिसणारी स्त्री जयचंद्राला ज्या खोलींत निजविलें होतें त्या खोलीपाशीं आली. खोलीच्या दारापाशीं जो द्वारपाल होता, त्याचा किंचित् डोळा लागला होता तो हिच्या चाहुलीनें खडबडून जागा झाला आणि आपली झोंप

मोडल्यामुळें म्हणा किंवा आपण झोप घेतो आहों असें लोकांच्या दृष्टीस पडलें यामुळें त्रासून म्हणा, पण त्या स्त्रीच्या अंगावर “ कोण आहे ” म्हणून ओरडणार, तोंच या भयानक वेषाच्या स्त्रीनें आपल्या नाकावर बोट ठेवून सीतकार करून त्यास दरडावलें व गप्प बसण्याविषयीं खूण केली. त्या सीतकारानें व त्या स्त्रीला पाहूनही तो द्वारपाल चपापला आणि फार आदरानें व नम्रपणानें दूर होऊन त्यानें तिला त्या खोलींत जाण्यासाठीं दार उघडण्याला हात पुढें केला परंतु त्या स्त्रीनें त्यास थोडें थांबवून अतिशय हलक्या आवाजानें विचारलें “जयचंद्राच्या सोबत कोण निजलें आहे?” त्यानें हळूंच उत्तर दिलें, “ एकटे चामुंडराय आहेत. दुसरें कोणी नाहीं.” तें ऐकून त्या स्त्रीचें समाधान झालें असावे असें दिसलें. नंतर ती आंत गेली. तों सुंदर अशा सोन्याच्या पलंगावर जयचंद्र अगदीं गाढ निजला आहे असें तिच्या नजरेस पडले. ती त्या पलंगाजवळ गेली आणि तिनें आपल्या हातची दीपिका थोडी उंच करून एकवार आपल्या मुलाच्या चेहऱ्याकडे पाहिलें. नंतर मोठ्यानें म्हणते “ पोरा, तुझ्या आईच्या हृदयांत कसला जाळ उठून तिची कोण भयंकर स्थिति झाली आहे ! आणि तूं स्वस्थ झोंप घेत पडला आहेस ! ऊठ. ऊठ. बावळ्यासारखा निजूं नको. ” ते तिचे शब्द ऐकून जयचंद्र कांहीं एकदम जागा झाला नाहीं. परंतु चामुंडराय मात्र एकदम खडबडून जागा झाला. त्याची दृष्टि तिच्याकडे गेली. तिचा तो भयंकर वेष पाहून तो घाबरला आणि त्याच्या तोंडून आतां कांहीं भयाचे उद्गार निघणार तोंच हिनें त्याच्या जवळ जाऊन “ चूप. चूप. दुसरं कोणी तुम्हांला खायला आलं नाहीं. मी आहें ती. असा भूत पाहिल्यासारखा घाबरतोस कां ? मला पाहिल्यानं तुम्ही इतके घाबरतां आणखी ती डाकिनी आतां तुम्हांला भेटेल तेव्हां कांही भय वाटणार नाहींनारे ? अगदीं बोलूं नकोस कांहीं. मी त्या जयाला उठवितें. त्याला आपल्या आईच्या हृदयांत काय भडका उडाला आहे याची कल्पना तरी कुठें आहे ? राहिला आहे आपला निजून. असं निजून निजून राज्य चालविणार आणखी क्षत्रियाचीं कर्में करणार काय ? आणखी पोरा, तूंही त्याला असाच निजूं देणार काय ? थांब मी त्याला उठवितें. आणखी...... ”

पुढें ती कांहीं बोलली नाहीं. त्याला तिनें हातांत धरल व त्याला बरोबर घेऊन ती जयचंद्राच्या पलंगाजवळ गेली. नंतर तिनें मोठ्यानें न बोलतां त्याला जरा मोठ्यानें हालवून जागें केलें. त्याबरोबर तो जागा झाला. प्रथम

दर्शनीं तो सुद्धां घाबरला. परंतु ही आपली आईच असं त्यानें ताबडतोब ओळखलें आणि एकदम उठून बसून त्यानें तिला म्हटलें, " आई, एवढ्या रात्रीं तूं इकडे कुठें ? मी आल्यापासून तुला भेटावें म्हणून विचारीत होतों, पण बाबा मला तुझ्याकडे येऊं देईनात. ते म्हणाले, "आपण पहांटे अजमिराकडे जाऊं. जर तिला तुला भेटण्याची इच्छा असली तर ती तुला भेटण्यासाठीं आपल्याबरोबर किंवा मागोमाग येईल आणखी तुझ्या मावशीशीं सलोखा करून तुला भेटेल. मग आई, तूं आमच्याबरोबर चलेनास? बाबांच्या...... "

परंतु विमलेनें त्याला पुढें बोलूं दिलें नाहीं. ती एकदम त्याला म्हणते: " चूप चूप. पोरा, तिकडे वेड लागलें आहे. आणखी म्हणून तुला घेऊन जाताहेत; पण ती चांडाळीण तुला वेळ पडली तर ठार करण्यालासुद्धां कमी करणार नाहीं. एवढ्यासाठींच माझा जीव तुझ्याबरोबर घोंटाळतो आहे; पण तिच्या घरांत– त्या चांडाळणीच्या घरांत– पाऊल घालायचं म्हणजे अग्नीच्या खाईत पाय घातल्याप्रमाणें मला वाटत आहे. ते कसंही असो. मी आतां आलें ती एवढ्याकारितांच कीं तूं किती शहाणा झाला आहेस तें पहावं आणखी तुला मी मागें काय सांगितलं त्याची आठवण आहे कीं नाहीं, आणखी मी सांगेन तसं ऐकतोस कीं नाहीं तें पहावं. "

" आई, गुरुजी तर मला म्हणतात, कीं तूं फार चतुर, शहाणा आणखी क्षात्रविद्येंत चांगला प्रवीण झाला आहेस. ते तर म्हणाले, कीं तूं उद्यां अजमिराला गेलास म्हणजे तेथें तुझे आजोबा येतील त्यांना म्हणावं ' रामगुरूचा शिष्य पृथ्वीराज आणि द्रोणाचार्यांचा शिष्य जयचंद या दोघांची परीक्षा घ्या ' म्हणजे कोण किती धनुर्विद्येंत पारंगत झाला आहे हें समजेल."

बिमला देवी तें आपल्या मुलाचें बोलणें मोठ्या प्रेमानें ऐकत होती. तो थांबतांच. त्याला म्हणाली: " तें सगळें खरं. पण तुझ्या त्या विद्येचा उपयोग काय ? आतां या वयांत तूं त्या चांडाळणीच्या पोरापेक्षां कितीहि प्रवीण ठरलास तरी काय होणार ? अशी शपथ वहा शपथ—तुझ्या समोर उभ्या राहिलेल्या तुझ्या आईच्या पायाची शपथ वहा कीं, दिल्लीचं राज्य तुझ्या आजानं पृथ्वीराजाला दिलं, तर तूं तें त्याच्याशीं लढाया करून, काय वाटेल तें करून त्याच्यापासून हरण करून त्याला बंदिवान् करून आणून आपला दास बनवशील. हें सारं पहाण्याला मी जगलें तर फारच चांगलं, तें मी तुझ्या हातून करवीन; पण न जगलें तर मी पिशाच्च

होऊन तुझ्या आसपास हिंडत राहून तुझ्याकडून हें करवल्याखेरीज मुक्ति घ्यायची नाहीं. त्या चांडाळणीनें बाबांना भुरळ घालून तिनें आपल्या मुलाला त्यांचा आवडता केला. ते आतां त्याला आपला पुत्रच समजतात. त्याच्यावर आपल्या राज्याचा भार टाकून आतां ते तपश्चर्येला जाणार, तेव्हां अशा प्रकारानें तिनें मिळविलेलें राज्य तिच्या पोरापासून पराक्रमानें हिसकावून घेतलंच पाहिजे ! त्याखेरीज माझा आत्मा शांत व्हावयाचा नाहीं. तुला सांगितलंना कीं मी जर लवकर मेलें आणखी स्वर्गांत मला कोणी न्यायला लागलं तरी मी जाणार नाहीं, इथें राहीन आणखी तुझ्याकडून हें करवीन. असं तुला कितीदां सांगूं ? पण मी हें काय करतें आहें ? मी इतक्या रात्री अगदीं गुपचूप तुझ्या खोलींत आलें कोणत्या हेतूनें आणखी करतें आहें काय ? पोरा, तूं माझं ऐकणार का त्यांचं ऐकणार ? बोल. माझी इच्छा आहे कीं, तूं त्यांच्याबरोबर त्या चांडाळणीच्या घरीं जाऊं नयेस, तुला आपली आई हवी असली, तर तूं जाऊं नको. तूं आणखी मीं चार दिवस इथून कुठें तरी जाऊं. कुठें जायचं तें मी सगळं योजून तजवीज करून ठेविली आहे. पोरा, तिकडे कांहीं समजत नाहीं. भोळा स्वभाव आहे. तुला घेऊन जाताहेत पण त्याचा काय नेम ? मी तुझ्याबरोबर नाहीं. तिच्या घरांत मला पाऊल घालायचं नाहीं. तिचं तोंड मला पहायचं नाहीं. ती तुझ्या जीवाला —मी तुला सांभाळायला नाहीं असं पाहून —कांहीं तरी अपाय करायला चुकायची नाहीं. त्यांतून तुझी आणखी त्या तिच्या कारट्याची परीक्षा घेतल्यावर तुझी प्रवीणता जर कां बाबांच्या दृष्टीस पडली तर तिचा मत्सर अधिकच पेटेल आणखी त्याच्या खाईत तुला ती जाळून टाकल्याखेरीज कधीं रहायची नाहीं. म्हणून सांगतें कीं तूं आतां लहान नाहींस. तुला समजायला लागलं आहे. मी काय ह्मणतें तें तुला नीट समजलं असेलच. तूं त्यांच्याबरोबर जाऊं नको. माझ्याबरोबर चल. मी हिमाचलाच्या रानांत माझे गुरु अघोरघन्ट कापालिक आहेत त्यांच्याकडे तुला नेतें. तिथें आपण कांहीं दिवस राहूं. ते तुला मंत्रविद्येंत निपुण करतील, अस्त्रविद्येंत करतील, शस्त्रविद्येंत करतील. या साऱ्या विद्यांत प्रवीण असा त्यांच्यासारखा दुसरा कोणीही आज या भरतखंडांत नाहीं. मी तुला त्यांच्या पायावर घालण्याचं बोलून आलें आहें, मी त्यांची आवडती शिष्यीण आहें, हें कोणालाही माहीत नाहीं. आज प्रथम मी हें तुला सांगतें आहें, तर तूं आतां वेडा होऊं नको. बाळा जयचंदा, आईचं मुलावर जसं प्रेम असतं तसं पित्याचं नसतं. त्यांना

समजत नाहीं. पृथ्वीराजाला कोणी वांटेकरी राहूंच नये म्हणून ती काय करील आणि काय करणार नाहीं. आयताच तूं आतां व्याघ्राच्या गुहेंत—हरिणाचें पाडस शिरल्याप्रमाणें—जातो आहेस पण मी तुला जाऊं द्यायची नाहीं. पहा आतां वेळ नाहीं. आणखी घटका दोन घटकांत तुला जागें करण्यासाठीं लोक येतील. त्याच्या आंत तूं इथून चल. ऊठ. ऊठ. निजूं नकोस. अगदीं निजूं नकोस. ऊठ. ”

असें म्हणून तिनें त्याला उठविलें. हातानें पलंगावरून खालींच ओढलें म्हटलें तरी चालेल. नंतर ती त्या दुसऱ्या मुलाकडे—चामुंडरायाकडे—पाहून म्हणते, “ पोरा, थोड्या वेळांत जयचंदाला उठवण्यासाठीं मंडळी येतील पण खबरदार जर यांतलं एक अक्षर बोललास कोणाजवळ तर. अगदीं झोंपेचं सोंग घे. जयचंद अंथरुणावर नाहीं असें पाहून गडबड झाली तरी जागा झाल्यासारखं दाखवूं नको. आणखी तुला मुद्दाम कोणी जागं केलं तर “आतांच झालों. जयचंद निजला होता, केव्हां आणखी कुठं गेला मला काय ठाऊक?” असं म्हण. जर का मी इथें आलें होतें आणखी मी त्याला कुठें नेला हें सांगशील तर माझ्याशी गांठ आहे. तूं आपला खुशाल त्यांच्याबरोबर जा. तुझ्या जिवाला ती चांडाळीण कांहींसुद्धां करणार नाहीं. बजावलं आहे बरं तुला. मी आलें होतेंन् मी याला घेऊन गेलें हें जरी सांगितलंस तरी कुठें गेलें हें सांगूं नको बरं. तें तुझ्याखेरीज कोणालासुद्धां माहीत नाहीं. तूं तेवढं ऐकलं आहेस. नीज. नीज. मी तुला पांघरूण घालतें. ”

असें म्हणून तिनें त्याला पांघरूण घालून दडपून निजविलें आणि आपण जयचंदाला घेऊन बाहेर पडली. तेथें जो द्वारपाल होता त्याला तिनें कांहीं द्रव्य दिलें व त्याच्या कानांत सांगितलें कीं मी आलें होतें हें एक प्रहरभर कबूल करूं नकोस. प्रहरानंतर सांग, कीं मी येऊन याला घेऊन गेलें. म्हणजे तुला कोणी कांहीं शिक्षा करणार नाहीं. मला एक प्रहर सांपडला कीं, मी कोठें गेलें याचा पत्ता मुळींच कोणाला लागावयाचा नाहीं. त्या द्वारपालानें तें कबूल केलें आणि क्षणार्धांत तीं मायलेंकरें विमलादेवीच्या अंत:पुरांत गेलीं.

राजा विजयपाळ आपल्या मुलास उठवावयास स्वत: आला, तों मुलाचा ठावठिकाण नाहीं. सुमारें प्रहरभर कांहींच वार्ता लागेना. पुढें विमलादेवीनें त्याला नेलें असें कळलें, म्हणून अंत:पुरांत तिचा शोध केला तों तिचाही शोध नाहीं.

*

# प्रकरण ६ वें.

[ विजयपाळानें खूप धडपड केली. द्वारपाळाला धाकदपटशा देऊन पाहिला. त्याचा धाकटा मुलगा चामुंडराय हा जयचंदाजवळ होता त्याला खोदखोदून विचारलें. पण कांहीं थांग लागेना; तेव्हां विजयपाळ भारीच निराश झाला. आपली बायको आणि पोरगा गेलीं तरी कोठें ? शेवटीं विमलेनें जयचंदाला नेलें एवढें समजलें. पण ती गेली कोठें हें गूढच राहिलें. शेवटीं तो एकटाच अजमिरास गेला. तेथें त्याची हकीगत ऐकून सर्वांनाच भारी खेद झाला. असो. पुढें पृथ्वीराजाला राज्याभिषेक करून आपण तपश्चर्येला वनांत जाणार असें अनंगपाळानें स्पष्ट कळविलें. विजयपाळाची त्याला भीति होती. पण त्यानें आनंदानें कबुली दिली व मदत करण्याचें आश्वासन दिलें. अनंगपाळाचा गुरू धौममुनि हिमालयांत होता त्याची अनुमति मिळवावी आणि आपलें तपश्चर्येचें स्थान एकवार पाहून यावें म्हणून तो हिमालयांत गेला. तेथें त्याला धौममुनींकडून 'अघोरघंट कापालिका'चीं अनेक दुष्कृत्यें कळलीं, आणि त्याचा नाश करावा म्हणून धौमानें त्याला विनंतिही केली. म्हणून अनंगपाळ तूर्त तेथेंच राहिला. ]

## अनंगपाळाचा निश्चय.

आपला पोरगा व बायको दोन्हींही नाहींत असें कळतांच राजा विजयपाळास फार आश्चर्य वाटलें, खेद झाला व संतापही आला. चामुंडरायास त्यानें पुनः पुनः विचारलें, कीं " तूं येथें जयचंदाच्या सोबत म्हणून निजला असतां तुला तो कोठें गेला, कोणीं नेला, त्याला कोणीं बोलवायला आलें होतें कीं तो आपण होऊन उठून गेला. हें कांहीं कसें ठाऊक नाहीं ? जयचंद आधीं तुला टाकून जायचा नाहीं, त्यांतून कोठें गेला, तरी तुला सांगितल्याखेरीज खचित जायचा नाहीं. तेव्हां काय खरें आहे तें सांग. "

परंतु चामुंडरायानें अगदीं असें वेड पांघरलें होतें कीं वा ! तो म्हणे: " आपण येथें येऊन जयचंद अंथरुणावर नाहीं, कोठें गेला याबद्दल गडबड

उजेडेपर्यंत मी अगदीं गाढ झोंपेंत होतों. झोंप येण्यापूर्वीं तो मला एवढें मात्र म्हणत होता, कीं ' आईच्या दर्शनाला आपल्याला बाबा जाऊं देत नाहींत याला काय करावें ? तसेंच त्यांना न विचारतां जावें, तर त्यांची अवज्ञा केली म्हणून त्यांना राग येईल; बरें न गेलें तर मनाला कसेंसेंच वाटतें आहे हें एक आणि मी गुरुगृहाहून वाड्यांत आलों असून तिला न भेटतां बाबांच्या बरोबर गेलों असें तिला कळलें, कीं ती तरी काय म्हणेल ? ती माझ्यावर अतोनात प्रेम करते आणखी तिचें नुसतें दर्शन घेण्याचीही मला मनाई व्हावी ! ' अशी एकसारखी त्यानें भुणभुण लावली होती, पण त्या त्याच्या भुणभुणींतच केव्हांच त्याला आणखी मला झोंप लागली. पुढें काय झालें, विमलाकाकू येथें येऊन त्याला घेऊन गेल्या कीं तोच मध्यें जागा होऊन आपण उठून त्यांच्याकडे गेला मला कांहीं म्हटल्या कांहीं माहित नाहीं. द्वारपाळाला तें सगळें माहित असेल, आणखी त्यानें सांगितलें तेंच खरें. ''

चामुंडरायाचें हें सारें बोलणें इतकें सरळपणानें झालें कीं तो हें सारें केवळ नाटक करीत असेल, ही कल्पनासुद्धां कोणास आली नसती. त्याचें वय कांहीं जयचंद्रापेक्षां फार अधिक नव्हतें. दोघे बरोबरीचेच-फार तर दोन वर्षांचेंच अंतर. चामुंडरायाच्या भाषणाचा हा प्रकार झाल्यानंतर द्वारपाळ—त्या द्वारपाळाला तर देहांतशिक्षेचीही भीति घातली गेली. परंतु तो अगदीं मख्ख—साफ असें म्हणाला कीं " लागूं नये डोळा, मी अगदीं सावधपणानें रहावें, पण नाहीं भान राहिलें आणखी गेली झोंप लागून. आणखी त्या तितक्या अवकाशांत आईसाहेब इकडे आल्या कीं युवराज तिकडे गेले, कांहींच मला कळलें नाहीं. आपण आतां आलां नसतां तर मी असाच पहारा करीत बसलों असतों. आपण या माझ्या अजागळ आणखी असावध वागण्याबद्दल जी शिक्षा कराल ती मला मुकाट्यानें सोसली पाहिजे."

एखाद्याच्या हातून चुकी झाली आणि ती त्यानें आंतबाहेर कांहीं न ठेवतां सरळपणानें त्वरित कबूल केली म्हणजे त्याच्यावरचा राग अर्धा अधिक एकदम कमी होतो हा अनुभव कोणाला नाहीं ? तो लबाड नाहीं, मूर्ख आहे अशी एकदम भावना होते. तशीच त्या द्वारपाळासंबंधानें राजा विजयपाळाची भावना झाली. त्यानें त्याला देहांतशिक्षेचा धाक घातला; अंधारकोठडींत कोंडण्याची आज्ञा केली, पुनः पुनः खरें सांगण्याविषयीं विचारलें, परंतु व्यर्थ. त्याचें सांगणें एक; तेव्हां आतां

मात्र निरुपाय म्हणून राजानें त्यास अटकेंत मात्र ठेविलें. होतां होतां एक प्रहर गेला. युवराज जयचंद्र नाहींसा झाल्यामुळें राजाच्या चित्ताची झालेली दुःस्थिति मनांत आणून त्या द्वारपाळानें पुनः आपणास राजासमोर नेण्याविषयीं विनंति केली. इतका वेळ जें सांगण्याबद्दल मला निषेध होता, तें आतां सांगण्यास कांहीं अडचण नाहीं. पण तें मी राजाजवळ मात्र सांगेन असें तो म्हणूं लागला. राजाजवळ त्यास नेतांच जें काय खरोखर घडलें तें त्यानें सांगितलें, कीं " ऐन मध्यरात्रींच्या वेळीं महादेवी विमला येऊन त्यांनीं युवराज जयचंद्राला हातीं धरून आपल्या अंतःपुरांत नेलें आणि आपण असें केलें हें एक प्रहरपर्यंत कोणाला न कळविण्याविषयीं अगदीं कडक आज्ञा केली होती. त्याप्रमाणें एक प्रहरभर आपण बोललों नाहीं. कारण, देवीनें आपल्याला फार विलक्षण धाक घालून आपल्यापासून शपथ वाहून घेतली होती, ती मोडतां येईना. आतां याहून आपल्याला कांहीं माहिती नाहीं. आतां काय शिक्षा व्हावयाची असेल ती भोगायला मी तयार आहें."

हा द्वारपाळ स्पष्टपणें हें सांगेपर्यंत विजयपाळास शंका येऊन त्यानें विमलादेवीचा शोध केला होता, व ती कोठें नाहीं हेंही त्यास कळलें होतें. द्वारपाळाच्या सांगण्यानें एवढेंच झालें, कीं तीच त्याला घेऊन कोठें तरी गेली याविषयीं शंका राहिली नाहीं.

राजा विजयपाळाच्या अंगाचा संताप झाला, परंतु काय करतो. बायकोनें मुलाला कोठें तरी नेलें, याबद्दल उट्टें काढणार कोणावर ? त्यानें अंतःपुरांतील प्रत्येक स्त्रीला आपल्यापुढें आणून तिच्याजवळ जितकी चौकशी करावयाची, तितकी केली. विमलेच्या विश्वासाच्या दासी होत्या त्यांस छेडून छेडून आणि छळून छळूनही प्रश्न विचारले, परंतु त्यांच्यापैकीं कोणाला खरोखरीच कांहीं माहीत नसल्यामुळें त्यांच्याकडून कांहीं म्हटल्या कांहीं सुद्धां माहिती लागली नाहीं. शेवटीं आपल्या बायकोचा काय हा आततायीपणा ? असें म्हणून त्यास स्वस्थ बसावें लागलें. परंतु त्यानें अजमीरला जाण्याचा आपला निश्चय मात्र बदलला नाहीं. आपल्याबरोबर वालुकरायाला त्यानें घेतलें आणि अजमिरास प्रयाण केलें.

अजमिरास गेल्यावर राजा अनंपाळास त्यानें झाला तो वृत्तांत सांगितला. अनंगपाळासही फार वाईट वाटलें. परंतु वाईट वाटून उपयोग काय ? त्यावेळीं तिघे राजे एकत्र झाले होते; परंतु एक अबला आपल्या एका लहान मुलाला घेऊन कोणीकडे निघून गेली याचा शोध लावून आणण्या-

चेंही सामर्थ्य नाहीं असें म्हणून ते स्वस्थ बसले. त्यांना एवढें पूर्णपणें ठाऊक होतें, कीं केवळ कमलेचें मुख पहावयाचें नाहीं हा आपला निश्चय पाळण्यासाठीं व आपल्या मुलाला तिच्या घरीं नेलें तर ती त्याला ठार मारील अशी शंका—मूर्खपणाची शंका—घेऊन केवळ मत्सराच्या अतिरेकानें विमलेनें हें धाडस केलें, परंतु या अकारण द्वेषाचें व मत्सराचेंच त्या सर्वांना वाईट वाटलें.

कमलेच्या कानीं हा वृत्तांत गेल्यावर तर तिला मरणप्राय दुःख झालें. आपल्यामुळें हा सर्व प्रसंग आला म्हणून तिच्या मनांत असें सुद्धां आलें, कीं आपण आतां आपला प्राणांत करून घ्यावा. तिला रडतां भुई थोडी झाली. राजा अनंपाळानें व तिच्या पतीनें तिची पुष्कळ समजूत घातली, परंतु व्यर्थ. तिची अशी विलक्षण स्थिति झाली हें कळून राजा विजयपाळानेंही तिला पुष्कळ समाधानाचे निरोप पाठविले; परंतु तिच्या चित्तास कांहीं केल्या समाधान होईना.

शेवटीं पुढें चार दिवसांनीं राजा अनंगपाळानें आपला बेत ठरला होता तो आपल्या दोघां जांवयांस सांगितला व आपल्या सिंहासनावर पृथ्वीराजाला बसवून आपण तपोवनास जाण्याचा दिवसही त्यानें ठरविला.

राजा अनंगपाळाचा हा निश्चय ठरल्याचें त्याचेच तोंडून कमलादेवीनें ऐकतांक्षणींच तिला आनंद होण्याचें एकीकडेच राहून ती फारच खिन्न झाली. आपली बहीण आपल्या मुलाला घेऊन कोणीकडे तरी गेली. ती केवळ वैतागल्यामुळें गेली हें तर तिला उघड उघड दिसत होतें; आणि ती अशा प्रकारें गेली असतां आपण आपल्या मुलास राज्य मिळण्याच्या आपल्या वडिलांच्या निर्धारास अनुमोदन द्यावें हें तिला अगदीं सुद्धां ठीक वाटेना. “ बाबा, आपण करतां आहां ही गोष्ट अगदीं वाईट आहे, माझ्या मनास ती मुळींच येत नाहीं. मी आपली अनुमति त्याला स्वप्नांतसुद्धां देणार नाहीं. आपण विमलाताई कोठें गेली त्याचा आधीं तपास लावा, जयचंद्राला आणा आणखी तपश्चर्येसाठीं वनवासास जावयाचें असा कृतनिश्चयच असला तर दोघांनाही सारखें राज्य वांटून द्या. म्हणजे एकावर तुमचें मन फार आणखी दुसऱ्यावर मुळींच नाहीं असे म्हणायला कोणाला जागाच राहणार नाहीं. ” असें तिनें त्यांना निक्षून निक्षून सांगितलें.

परंतु राजा अनंगपाळ नुसता हंसला मात्र. त्यानें तीस कांहीं वेळ कांहींच उत्तर दिलें नाहीं. नंतर हलकेच त्यानें तिला आपल्याजवळ बोलावून म्हटलें,

" पोरी, मला तुझा राहून राहून चमत्कार वाटतो, तुला मीं कधींच नाहीं बरें सांगितलें, की ती तुझ्यासारखी नाहीं. तिला अर्ध्या राज्यानें संतोष व्हावयाचा नाही. तिला कशानें संतोष व्हावयाचा नाहीं. तिच्या चित्तानें असें घेतलें आहे, कीं माझें सगळें राज्य तिला—तिच्या जयचंदाला मिळावें. आणखी तूं आणि तुझी मंडळी नौकर म्हणून त्यांच्या घरीं राहावेत ! तिचें लक्षण मी पूर्णपणानें इथेंच ओळखलें. तिनें त्या वेळींच आपल्या मनांत काय होते नव्हतें तें अगदीं स्पष्टपणानें बोलून दाखविलें. आणखी तिच्या त्या बोलण्यानें मला तिचा वीट आला. तो वीट आतां अगदीं मनांतून कधीं जायचा नाहीं. ती फार लोभी आहे. तिचाच स्वभाव जर त्या जयचंदाच्या अंगीं उतरला असला, तर तो राज्याच्या आणखी लौकिकाच्या आशेनें कोणाचा घातपात करायला तयार होईल आणखी कोणाचा सत्यानाश करील याचा नेमच सांगवत नाहीं. त्याची आई फार शहाणी. आपण म्हणतों तें कांहींच नाहीं. ती आणखी काय काय कारस्थानें करील, याचा कांहीं नेम नाहीं. तेव्हां तूं अगदीं सुद्धां मनाला वाईट वाटून घेऊं नको. ती जी कुठें गेली असेल, ती कांहीं उगीच गेली नसेल, तशाच कांहीं हेतूनें गेली असेल. तूं आपल्या मनांतला विषाद काढून टाक. हस्तिनापुराच्या गादीवर बसण्याला जर कोणी योग्य असेल तर तो पृथ्वीराजच आहे. त्याची मीं परीक्षा करून टाकली आहे. त्याच्या हातावर चक्रवर्ति होण्याच्या रेषा आहेत. त्याच्या जन्मपत्रिकेवरून सुद्धां तो चक्रवर्ती होऊन हस्तिनापुराचें नांव पुनः सर्वतोमुखीं करणार असें आहे, तेव्हां तूं आतां भलल्यासलत्या शंका मनांत आणून आपलें मन दुःखी करून घेऊं नकोस आणि माझ्याही मनाचा विरस करूं नकोस. त्या पोरीनें मला इतकें दुखविलें आहे, कीं मी तिचें पुनः तोंड पहाणार नाहीं अशी प्रतिज्ञा केली आहे. आणखी आतां तुला काय सांगूं ? "

इतकें राजा अनंगपाळानें सांगितल्यानंतर आणखी काय पाहिजे ! त्या बिचाऱ्या कमलेचें काय चालणार ! तिनें आपला हेका सोडून दिला. राजा अनंगपाळानें आपल्या दोघां जांवयांस आपला विचार सांगितला आणि हस्तिनापुरास पृथ्वीराजाला आपण अमुक दिवशीं राज्याभिषेक करून आपले गुरु धौम यांच्या आश्रमांत तपश्चर्येकरितां जाणार असेंही निश्चयानें सांगितलें. सोमेश्वरास अर्थातच वाईट वाटण्याचें कारण नव्हतें. परंतु विजयपाळाचें मन थोर असल्यामुळें त्यासही वाईट वाटलें नाहीं. त्यानें राजा

अनंगपाळास "या आपल्या हेतूला माझी पूर्ण संमति आहे. जयचंद्राला कांहीं कमी नाहीं. त्याला राज्यविस्तार करण्याचें सामर्थ्य जरी असलें तरी सामर्थ्याचा उपयोग करण्यास केवढी थोरली तरी पृथ्वी विस्तृत आहे. अशाच प्रकारचें भाषण केलें इतकेंच नव्हे तर अनंगपाळास त्यानें असेंही आश्वासन दिलें, कीं या आपल्या हेतूप्रमाणें सर्व यथासांग पार पाडण्यास जें काय साहाय्य लागेल तें आपण स्वतः देऊं. कधीं यत्किंचित्सुद्धां कसूर करणार नाहीं."

राजा अनंगपाळाला जें काय पाहिजे होतें तें हेंच कीं, आपण आपला राज्यभार आपल्या एका नातवावर टाकण्याच्या सत्कार्यांत राजा विजयपाळाकडून मुळींच विघ्न येऊं नये. न जाणों विमलेची दुर्बुद्धि ऐकून जर त्याच्या मनानें असें घेतलें, कीं ऐन प्रसंगीं हस्तिनापुरावर चक्र आणावें व युद्ध करून आपणच राज्य जिंकावें तर आपल्याला विनाकारण त्रास होईल; परंतु विजयपाळानें अशा प्रकारचें आश्वासन दिल्यानंतर त्याच्या मनांतील भीति दूर झाली. विजयपाळाचा अत्यंत निर्लोभी स्वभाव पाहून त्याला आनंद झाला. हा आपल्या रक्तामांसाहाडांचा नसून आपल्याविषयीं इतकी आदरबुद्धि व इतका निर्लोभीपणा धरतो आणि आपली प्रत्यक्ष मुलगी केवळ भयंकर लोभाला बळी पडून तशा प्रकारें कोणीकडे निघून गेली याबद्दल तो आपल्या मनांत चमत्कारला. विजयपाळाची त्यानें फार स्तुति केली, त्यानें त्याला खरा क्षत्रियवीर असें म्हटलें आणि सांगितलें कीं, राज्याभिषेकाच्या प्रसंगीं आपण हस्तिनापुरास अवश्य आलेंच पाहिजे. आपण येऊन सगळें कार्य निर्विघ्नपणें पार पाडलें पाहिजे. जामात हा पुत्राच्याच ठिकाणीं असतो. पुत्रानें करावयाचीं सर्व कार्यें त्यानें केलीं पाहिजेत. आपण पृथ्वीराजाच्या राज्याभिषेकाचें कार्य आटपून आमच्याबरोबर आमच्या आश्रमांत येऊन तेथील सगळी व्यवस्था पाहून मग आपल्या द्रोणागिरीस जावें.

अशा प्रकारें अनेक गौरवाचीं भाषणें बोलून अनंगपाळानें त्यांस मोठेपणा दिला. नंतर आणखी दोन चार दिवस काय रहावयाचें तें राहून पृथ्वीराजास व कमलेस घेऊन राजा अनंगपाळ आपल्या हस्तिनापुरास आला. राजा सोमेश्वर ऐन मुहूर्ताचे दिवशीं येण्याचें ठरलें. राजा अनंगपाळानें मुहूर्त वगैरे ठरविला खरा; परंतु त्याच्या मनांत एकवार आपले गुरु धौम होते तेथें जाऊन आपल्या आश्रमाची व्यवस्था पहावयाची होती. 'धौम' हे मुनि या नांवानें हिमाचलांत प्रसिद्ध होते व अनंगपाळाप्रमाणेंच पुष्कळ

क्षत्रियांचे ते गुरु होते. राजा अनंगपाळानें आतां राज्योपभोगाचा अधिक लोभ न धरतां आपल्या परलोकच्या कल्याणासाठीं कांहीं तरी व्यवस्था करावी आणि प्राचीन काळच्या क्षत्रियांप्रमाणें वृद्धापकाळीं अरण्यांत येऊन चतुर्थाश्रम घ्यावा असा त्यांचाच अत्याग्रहाचा उपदेश होता. त्या उपदेशा-प्रमाणें करण्याचें राजाच्या मनांत येण्याला तरी तेंच कारण होतें. आपल्या आश्रमाजवळच राजानें आपला आश्रम घालून जनकाप्रमाणें वेदांताच्या विचारांत आपला काळ घालवावा, आपले व त्यांचे संवाद व्हावे आणि एकंदरीत राजाला आपला व आपल्याला राजाचा सहवास घडावा. या हेतूनें त्यांनीं सर्व व्यवस्था करण्याचें योजिलें होतें, याच हेतूनें त्यांनीं वैत-रणी नदीचे तीरीं आपल्या आश्रमापासून जवळ दुसरा एक अनंगपाळाश्रम सिद्ध करण्याची राजास आज्ञा केली होती. राजा अनंगपाळास झालेला पुत्र धनंजय एकाएकीं निवर्तल्यामुळें तर राजाच्या मनानें असें पूर्ण घेतलें कीं, आपण आपलें आयुष्य आतां अरण्यांत जाऊन तपश्चर्या करण्यांतच घातलें पाहिजे. परंतु राज्य कोणाच्या तरी हातीं देऊन जावें हें त्याला अर्थातच इष्ट वाटेना. तेव्हां आपल्या दोघां नातवांस चार दिवस आपलेकडे रहाण्यास आणून त्यांच्यापैकीं आपल्या सिंहासनावर बसविण्यास कोण योग्य तें ठरवून आपण त्याच्यावर राज्यकारभार टाकावा आणि मग आपल्या वानप्रस्थाश्रमांत जावें; याच हेतूनें जयचंद आणि पृथ्वीराज या दोघांस आपल्याजवळ आणून त्यांत परीक्षा करून पृथ्वीराजास आपल्या हेतूप्रमाणें शिक्षण देऊन कशींतरी दोन वर्षें काढलीं. परंतु आपण असाच कांहींना कांहीं तरी विचार करीत राहिल्यास आपल्या विचाराला अंतच नाहीसा होऊन आपण यांतल्या यांतच गुरफटून राहून एके दिवशीं यमसदनास जाऊं. त्यापेक्षां आतांच काय चार दिवस सांपडतील तेवढ्याचा उपयोग करावा. आणि आपल्या गुरूसारख्या विद्वान्, पवित्र व उदात्त अशा सत्पुरु-षाच्या संगतींत उरलेले दिवस काढावे हें चांगलें, असा पोक्त—खरा पोक्त—विचार त्यानें केला व त्याप्रमाणें सर्व व्यवस्था केली. जांचयांस काय सांगा-वयाचें तें सांगितलें, आतां आणखी काय उरलें. आतां आपल्या नातवाच्या राज्याभिषेकाच्या दिवसापूर्वीं आपलें चित्त शांत करण्यासाठीं व आपली एकंदर व्यवस्था पाहून येण्यासाठीं त्यानें वैतरणी नदीच्या तीरीं जाऊन येण्याचा कृतनिश्चय केला.

हिमाचल पर्वत म्हणजे एक अंतःशांतीचें निवासस्थान होय. या स्थानांत किती पवित्र व पावन असे ऋषि, साधुपुरुष, धर्मात्मे आपल्या चित्ताला

परमशांति प्राप्त व्हावी म्हणून व आपला परमकाल परमेश्वराच्या चिंतनांत जाऊन अंतीं त्याच्या संनिध आपला आत्मा जावा म्हणून वास करण्या-सांठीं आश्रम करून राहिलेले आजमित्तीस सुद्धां असल्याचें आपण ऐकतों, मग ज्या काळाची कथा आम्ही लिहीत आहों, त्या काळीं तर काय अशा पुरुषांची गर्दी असलीच पाहिजे. आणि त्याप्रमाणें होतीही. हिमालयाच्या निरनिराळ्या पुडांतून व निरनिराळ्या शिखरां—पठरांवरून लहान लहान अशा सुंदर नद्या वाहत असलेल्या दृष्टीस पडतात. आजमित्तीससुद्धां त्या भिन्न भिन्न नद्यांच्या तीरांवरून प्राचीनकाळीं अमुक ऋषींचें तपोवन येथें होतें. अमुक ऋषींचा आश्रम येथें होता. अमुक ऋषींचा अमुक यज्ञ येथें झाला, त्याचें भस्म अद्यापि येथें सांपडतें. अशा प्रकारच्या आख्यायिका आपणांस त्या त्या प्रदेशांत प्रवास करीत असतां ऐकूं येतात. आणि तशी एखादी आख्यायिका ऐकिली म्हणजे आपल्या चित्तास, तें खरेंही वाटतें. कारण तो तो प्रदेश खरोखरी फार पवित्र व रमणीय असा दिसतो.

वैतरणी नदी अशा लहान लहान नद्यांपैकींच एक होती व तिच्या एका तीरावरून दुसऱ्या तिराला सहजगत्या केव्हां पायानें तर केव्हां थोडेंसें पाण्यावर तरंगून जातां येत असे, यामुळेंच तिला वैतरणी हें शोभण्याजोगें नांव कोणीं तरी दिलें असावें. या नदीच्या तीरावर पांच चार आश्रम होते. त्या आश्रमांत धौममुनींचा म्हणजे राजा अनंगपाळाच्या गुरूचा आश्रम फार मोठा आणि अतिशय महत्त्वाचा असा होता. प्राचीन काळीं ज्यांना कुलगुरु असें नांव देत असत, त्यांच्यापैकींच हा धौममुनि होता. त्याच्या आश्रमांत विद्याध्ययनाकरितां अनेक ब्राह्मण कुमार येत असत. इतकें कीं, केव्हां केव्हां आतां या मुलांना आपण करावें काय ? याचें त्यांस मोठें गूढ पडे. परंतु कोणाही ब्राह्मणकुमारास किंवा आपल्याकडे शिकण्याला आलेल्या राजकुमारास त्यानें कधीं नाहीं म्हणावयाचें नाहीं असा निश्चय केलेला होता, यामुळें त्याच्या आश्रमांत गर्दीचगर्दी उडालेली असे. ही गर्दी होण्याचीं कारणें अर्थात धौममुनींचा सुस्वभाव, त्यांचें पावित्र्य व पावनत्व आणि त्यांची विद्या हीं होत. त्याप्रमाणें त्यांच्या शिष्यांत अनंगपाळासारखे महाराजे होते, हेंही त्यांच्या कीर्तीस एक फार मोठें कारण होतें. या धौममुनींच्या आश्रमांत आतां आपणास जावयाचें आहे.

राजा अनंगपाळ हा वर सांगितल्याप्रमाणें निश्चय करून धौममुनींच्या दर्शनासांठीं व त्यांचा विचार घेण्यासाठीं आला होता. तो आल्याची वर्दी

पोंचतांच धौममुनीनें त्यास आपल्याजवळ बोलावून घेतलें. कुशलप्रश्न झाल्यानंतर राजानें त्यांस राज्यत्याग करून आपल्या संगतींत परमकाल घालविण्याचा निश्चय झाला व त्यासंबंधाचा दिवसही आपण निश्चित केला असें सांगितलें. धौममुनीनें तें ऐकून अर्थातच फार संतोष दर्शविला आणि म्हटलें,

" राजा अनंगपाळा, हा तुझा निश्चय फारच योग्य काळीं झाला. मीं वाटच पहात होतों. " " महाराज " अनंगपाळानें एकदम विचारलें, " फारच योग्य काळीं असं कां म्हणतां ? माझ्या मतें फार अतिकाळ झाला. आपल्या आज्ञेप्रमाणें मीं केव्हांच येथें येऊन रहायला पाहिजे होतें. आपण मला उपदेश केल्याला किती दिवस झाले बरें ? "

" राजा, तूं म्हणतोस ही गोष्ट खरी, परंतु आतां " फारच योग्य काळीं झाला, ' असें तुला मीं म्हटलें तें त्या अर्थानें म्हटलें नाहीं. माझ्या म्हणण्याचा उद्देश फार निराळा होता. "

" तो काय ? " राजानें अत्यंत उत्सुकतेनें धौममुनींस विचारलें.

" राजा, आतांशा आमच्या या आश्रमाला फार मोठा उपसर्ग पोहोंचतो आहे. त्या उपसर्गापासून आश्रमाचें रक्षण करण्याला कोणा तरी चांगल्या क्षत्रिय वीराची फार अवश्यकता आहे. यामुळें म्हटलें, कीं तूं येथें येण्याचा निश्चय केलास तो फारच योग्य काळीं केलास. राजा, कोणी एक कापालिक या वैतरणीच्याच उत्तर तीरीं वरच्या बाजूस आला आहे. त्याच्या मंत्रतंत्रसिद्धीसाठीं तो ज्या कांहीं चेष्टा करतो त्या फार अनान्वित अशा आहेत. त्याच्या सिद्धीसाठीं त्याला कांहीं यवनांचेंही सहाय्य आहे असें दिसतें. या त्याच्या सहाय्यकर्त्यांपासून व त्या कापालिकापासून आम्हांला फार मोठा उपसर्ग पोहोंचतो आहे त्याचें निवारण तूं केलें पाहिजेस. दुसरें काय ? "

"एवढेंच ना ? मग त्याला माझा राज्यत्याग करून घेण्याचीच अवश्यकता काय ? मी आलों आहें असाच आपल्या पाठमागला उपसर्ग नष्ट करून टाकल्याखेरीज परत जात नाहीं. मग झालें कीं नाहीं. "

# प्रकरण ७ वें.

[ विजयपाळाला वाटलें होतें कीं, आपली बायको येथेंच कोठें तरी दडून बसली असेल. ती लवकर येईल. पण त्याची निराशा झाली. म्हणून आपल्या धाकटया मुलाला—चामुंडरायाला राज्याधिकार देऊन आपण वनांत जाण्याचा त्यानें निश्चय केला. ही वार्ता कळतांच चामुंडरायाला वाईट वाटलें. आपला वडील भाऊ हयात असतां त्याचें सिंहासन घेणें त्याला पातक वाटलें, आणि शेवटीं त्यानें आपल्या आईचा पत्ता विजयपाळास सांगितला. तेव्हां विजयपाळ एकदम हिमालयावर जाऊन आपल्या श्वशुरास भेटला, आणि त्यानें त्याला सर्व हकीकत कळविली. शेवटीं सासरे जांवई मिळून अघोरघंटाच्या नाशाच्या मार्गाला लागले. ]

## विजयपाळ हिमाचलास जातो.

राजा विजयपाळास विमलेचा स्वभाव पूर्णपणें माहीत होता, यामुळें त्यानें पहिल्या तडफीस तिचा व जयचंद्राचा शोध केला नाहीं, परंतु असा शोध न करतां किती काळ जाणार ? जेमतेम चार दिवस त्यानें सोमेश्वराच्या घरी काढावयाचे होते, तेवढे काढले. आपल्या सासऱ्याच्या इच्छेप्रमाणें करण्यांत मध्यें विघ्न आणण्याला आपली बायको नाहीं हें एका अर्थीं बरेंच झालें असेंही त्याच्या मनास वाटलें आणि तो " आतां हें सर्व कळल्यानंतर तिच्या जिवाचा काय जळफळाट होईल ! " असें मनांत येऊन आपल्याशींच हंसला. त्यानें आपल्या लोकांसही कोणास तिचा शोध आणना म्हणून सांगितलें नव्हतें. त्याची पूर्ण समजूत अशी कीं आपण सोमेश्वराचे घरीं जाऊं नये म्हणून ती मुद्दाम कोठें तरी लपून बसली आहे. आपण शोधाचे नादीं लागलों कीं अर्थातच जाण्याचें राहील, आणि तिला जें इष्ट तेंच घडेल, तेव्हां इतर कोणत्याही कारणासाठीं, नसलें तरी आपण शेवटीं आपल्या इच्छेप्रमाणें नवऱ्यास जाऊं दिलें नाहींच असें तिला म्हणण्याला जागा ठेवावयाची नाहीं, एवढ्याचकरितां आपण येथें रहावयाचें नाहीं, तिचा शोध करावयाचा नाहीं, असा विजयपाळानें निश्चय केला होता.

हा त्याचा निश्चय जेमतेम सोमेश्वराच्या घरून परत आपल्या वाड्यांत येईपर्यंत टिकला. आपण निघुन गेलों तेव्हां राजानें आपला शोध करावयाचा; परंतु त्यानें एका शब्दानें सुद्धां शोध केला नाहीं असें एकदां कळून आलें कीं, ती तावडतोब परत येईल असा त्याचा समज. आणि म्हणून त्यानें आपला जाण्याबद्दलचा बेत बदलला नाहीं इतकेंच नाहीं तर तेथें गेल्यावर दूतांकडूनही शोध आणविला नाहीं, परंतु द्रोणगिरीहून परत आल्यावरही जेव्हां विमलादेवीचा किंवा जयचंद्राचा पत्ता नाहीं असें त्याला कळलें, तेव्हां हा प्रकार विचित्र झाला. आतां स्वस्थ बसतां उपयोगी नाहीं. संतापाचे भरांत कांहीं अनन्वित कृत्य तर हिनें केलें नाहीं ? असें आतां त्याच्या मनांत आलें. आतां अधिक चौकशी करावयाची कशी व कोणापाशीं ? ज्या द्वारपाळानें आपल्या आज्ञेचा भंग केला, त्यास त्यानें आधीं बोलावून आणून पुष्कळ प्रश्न विचारले, परंतु त्यानें एकच उत्तर दिलें. मध्यरात्रीच्या सुमारास त्या आल्या, मला दरडावून युवराजाच्या खोलींत शिरल्या आणि थोड्या वेळानें बाहेर येऊन त्यांना कोठें घेऊन गेल्या. जातांना मला बजावून गेल्या, कीं मी जाऊन चांगले चार सहा प्रहर होईपर्यंत जर तूं मीं जयचंद्राला घेऊन गेलें असें कोणाला सांगितलेंस तर माझ्याशीं गांठ आहे ! म्हणून मीं भेदरून प्रथम कांहीं बोललों नाहीं. सावधपणा ठेवला नाहीं म्हणून आपण मजवर संतापाल हें मी जाणून होतों; परंतु आपण आपल्या संतापानें जी शिक्षा सांगाल, तिच्या सहस्रपट क्रूर शिक्षा त्या करतील याबद्दल मला किंवा कोणाला तीळभरसुद्धां शंका नाहीं, म्हणून मी तसें केलें. बाकी मीं बेसावध राहून भलतेंच कांहीं तरी घडूं दिलें असें मात्र नाहीं. हें त्यानें पुनः सांगितलें. तेव्हां विजयपाळास फारच विलक्षण वाटलें. त्यानें आपल्या अंत:पुरांतील प्रत्येक दासीला व कंचुकीला विचारलें, परंतु कांहीं पत्ता नाहीं. कोणी कांहीं सांगूं शकेना. वाड्यांतल्या वाड्यांत कोठें तरी असेल, गांवांतल्या गांवांत कोठें तरी असेल, असले सगळे तर्क केव्हांच संपले आणि सगळ्या राज्यांत जेथें जेथें म्हणून नात्यागोत्याचीं किंवा स्नेह्यासोबत्यांचीं घरें होतीं तेथें तेथें जाऊन त्यांनीं शोध आणविला; परंतु कांहीं सुद्धां ठिकाण लागला नाहीं. शेवटीं राजा विजयपाळ अगदीं निराश झाला, आणि त्यानें असें पाहिलें, कीं आतां शोध करावयाची जागाच उरली नाहीं. तो फार खिन्न झाला. आपल्या बायकोच्या मत्सराची परमावधि शेवटीं आपला व आपल्या पुत्राचा अंत करून घेण्यापर्यंत जाईल हें तर त्यास संभवनीय वाटेना. परंतु ती आणि युवराज जय-

चंद अशा प्रकारें नाहींशीं व्हावीं कीं आपल्या पदरच्या व राज्यांतल्या एकाही माणसास तिची माहिती असूं नये याचें त्याला राहून राहून आश्चर्य वाटूं लागलें. तो स्वभावतः कृपाळु यामुळें त्यास कोणासही विनाकारण छळण्याची बुद्धि होईना.

राजा विजयपाळ याप्रमाणें अत्यंत खिन्न झाला असतां व त्याच्या मनाची पूर्ण निराशा झाली असतां त्याचे मनांत एकदम विचार आला कीं आपण आतां आपला धाकटा मुलगा चामुंडराय याला सिंहासनावर बसवून आपण राजा अनंगपाळाबरोबरच तपश्चर्येला जातों अशी वार्ता उठवावी म्हणजे विमला जेथें कोठें लपली असेल, तेथें तिला ती कळली कीं जयचंद्राला अनंगपाळाचें राज्य नाहीं तर नाहीं, परंतु त्याचें त्यालाही नाहींसें होणार, असें पहातांच ती आपला आततायीपणा टाकून मुकाट्यानें येईल. हा विचार विजयपाळाच्या मनांत येतांच त्यानें आपल्या उपाध्यायांस वगैरे बोलावून आणून सर्वांस आपला विचार काय आहे तो कळविला. तो ऐकतांच अर्थातच सर्व मंडळी आश्चर्यचकित झाली. परंतु कोणाचे म्हणणें राजा ऐकेना. त्यानें आपला बहाणा पूर्ण करण्याकरितां हिमाचलांत तपश्चर्येकरितां योग्य असें स्थान शोधून तेथें आपल्याला सुखावह होईल असा आश्रम बांधावयाचा, तेव्हां आधी चार दिवस त्या पवित्र पर्वतावर जाऊन येण्याचाही निश्चय सर्वांस कळण्याकरितां थाळी वाजवून डांगोरा पिटविला. राजाचें हें करणें कित्येकांस विक्षिप्तपणाचें वाटलें, कित्येकांस अगदीं साहजिक वाटलें. अद्यापि तपश्चर्येस जाण्याचें वय झालें नसतां लहान मुलांच्या व मंत्र्यांच्या अंगावर राज्यभार टाकून जाणें म्हणजे विक्षिप्तपणाच होय असें कांहीं लोक म्हणूं लागले. व ऐन आनंदाच्या दिवसांत आपली पट्टाभिषिक्त राणी व आपला युवराज हीं एकदम नाहींशीं झालीं; तेव्हां अर्थातच त्याला उद्वेग येऊन राज्यसुखाचा त्याग करावा असें कित्येकांनीं म्हटलें. परंतु होतें आहे हें कांहीं कोणत्याही दृष्टीनें बरें नव्हे असें अर्थातच सर्वांस वाटलें. मंत्रिमंडळानें राजास आपले विचार कळविलेही. परंतु राजा मुळींच त्यांचें ऐकेना, तुम्हां सर्वांवर माझा पूर्ण विश्वास आहे. मी एकाएकीं मृत्यु पावलों तर तुम्ही काय कराल ? असा निर्वाणीचा प्रश्न विचारून त्यानें त्यांस निरुत्तर केलें व शेवटीं त्यांस सांगितलें कीं, माझा निश्चय आतां ढळायचा नाहीं. तुम्ही आपल्या तयारीला लागावें तें बरें. तेव्हां ते बिचारे काय करतात ? तयारीला लागले.

आपली आई जयचंद्राला घेऊन कोठें तरी गेली हें चामुंडरायाला माहीत होतें हें वाचकांच्या ध्यानांत असेलच; परंतु आईनें त्याला बजावून बजावून सांगितलें होतें कीं, "पोरा, तूं जर बोलशील कोठें कोणाजवळ तर तुझें काय करीन आणखी काय नाहीं याचा नेम नाहीं; यामुळें तें मूल प्रथम त्यास विजयपाळानें विचारलें तेव्हां बोललें नाहीं. आणि पुढें पुनः त्याला कोणीं विचारलें नाहीं म्हणून त्यानें उच्चार केला नाहीं. परंतु आतां जयचंद्राला सिंहासनावर न बसवितां आपल्याला बसविणार हें ऐकतांच त्या बंधुनिष्ठ मुलास तें बरें वाटलें नाहीं. आपण आपल्या भावाच्या सिंहासनावर बसूं नये असें त्याच्या मनांत आलें आणि त्यानें बापाला एकीकडे गांठून म्हटलें "बाबा, आई परत आली—तुम्हीं तिला परत आणलेंत आणखी तिला जर कळलें कीं ती कुठें गेली आहे तें मी तुम्हाला सांगितलें, तर ती रागें भरेल, मला कडक शिक्षा करील, या भयानें मी आजपर्यंत बोललों नाहीं. पण मला आतां रहावत नाहीं, कारण तुम्हीं जयचंद्राचें सिंहासन मला देण्याचा विचार केला आहे. बाबा, आई जयचंद्राला घेऊन जातांना म्हणाली: "चल आपले गुरु अघोरघंट कापालिक हिमाचलांत आहेत त्यांच्या पर्णकुटींत राहूं. ते तुला शस्त्रविद्या, अस्त्रविद्या, मंत्रविद्या सर्व कांहीं विद्या शिकवितील." तेव्हां ती त्याला घेऊन तिकडे गेली आहे. आपण शोध केला तर तिकडे करा. माझा वडील बंधु जिवंत असतांना मी सिंहासनावर कसा बरें बसूं ? बाबा, आईनें त्याला नेलें म्हणूनच तो गेला. नाहीं तर कशाला गेला असता. मला तिनें नेलें नाहीं; नाहीं तर मी सुद्धां गेलों असतों. पण तुमचा जसा माझ्यावर लोभ आहे तसा तिचा त्याच्यावर लोभ आहे. ती अगदीं खचित अघोरघंटाकडे गेली आहे. आणखी त्याचा आश्रम हिमाचलांत कोठें तरी आहे."

चामुंडरायानें अघोरघंटाचें नांव प्रथम काढल्याबरोबरच राजा विजयपाळाची तंद्री त्यासंबंधानें विचार करण्याकडे लागली होती. त्याला पुढलें चामुंडरायाचें भाषण मुळींच ऐकूं आलें नाहीं. यामुळें तो मुलगा आपला आपल्याप्रकारें बडबडतच राहिला. इतक्यांत इकडे विजयपाळाचा विचार चालला होता, तो अर्धवट संपून तो अर्धवट शुद्धीवर आला व चामुंडरायाला एकदम त्रासून म्हणतो:—"काय म्हणतोस ती जयचंद्राला घेऊन हिमाचलांत अघोरघंटाकडे गेली ? आणखी तुला हें पक्कें ठाऊक असून तूं आतांपर्यंत सांगितलें नाहींस ! आतां तर मग माझा निश्चय पक्काच ठरला, कीं, जयचंद्र जरी

सांपडला, त्याची आई त्याला घेऊन परत आली तरी त्याला मी आतां सिंहासनावर बसविणार नाहीं. तो आतां कापालिकांचा शिष्य झाला. कापालिकांचे शिष्य क्रूरकर्मीच निपजतात. आणखी क्रूरकर्मा पुत्र या सिंहासनावर मी कधीं बसूं देणार नाहीं. तूं सांगितलीस ही वार्ता फार चांगली सांगितलीस. आतां ती अवदसा जरी त्याला घेऊन परत आली, तरी मी आपल्या निश्चयापासून यत्किंचितही ढळणार नाहीं. मी आतां आपली तपश्चर्येची जागा पहाण्यासाठीं जाणार. " हें बापाचें भाषण ऐकून चामुंडराय खिन्न झाला. आपल्या भावाला परत आणण्याचा विचार न करतां आपल्याला सिंहासनावर बसविण्याचा विचार त्यानें कायम केला हें त्यास मुळीं सुद्धां आवडलें नाहीं. परंतु लहान मुलगा जास्त काय बोलणार ? एवढेंच म्हणाला, कीं " बाबा, आपण मला सिंहासनावर बसविलें तरी मी रामचंद्राचा भाऊ भरतजी त्याच्यासारिखें करीन. जयचंद्दादा परत येईपर्यंत त्याच्या पादुका सिंहासनावर ठेवून मी राज्य चालवीन. तो ज्या घटकेस परत येईल, त्या घटकेस त्याला सिंहासनावर बसवीन. आणखी मी त्याच्या आज्ञेप्रमाणें वागेन."

तें ऐकून राजा विजयपाळ एकदम हंसला व त्यास म्हणतो: " ठीक आहे, ठीक आहे. पण राज्याधिकार हातीं आला म्हणजे मग जयचंद्र तर काय ? पण मी स्वतः परत आलों आणखी राज्य परत मागूं लागलों, तरी सुद्धां देणार नाहींस. समजलास ? "

चामुंडराय त्यावर कांहींच बोलला नाहीं. राजानें मंत्रिमंडळीला बोलावून आणून आपला विचार पुनः एकदां त्यांना सांगून टाकला. नंतर म्हटलें " मी आतां दोन चार महिने हिमाचलांत कोठें आश्रम बांधावयाचा तें पहाण्यासाठीं जातों. राजा अनंगपाळ गेला आहे, त्याच्या शेजारींच कोठें तरी आपलाही आश्रम करावा. तुम्ही आतांपासूनच आपल्या मार्गाला लागा. हा चामुंड तुमचा राजा, याला माझ्या ठिकाणीं समजून राज्यकारभार चालवा. "

बायको व मुलगा दोघेंही एकदम नाहींशीं झालीं यामुळें राजा वैतागून अशा विचाराला लागला असें त्यांस दिसलें आणि त्यामुळें त्यांनीं पुनः नाना प्रकारांनीं त्यास " आपण असें करूं नये. आपल्याला तपश्चर्येला जाण्याचा विचार करण्याला अद्यापि पुष्कळ अवधि आहे. आपण गेल्यानें व बालराजा सिंहासनावर बसल्यानें आपल्या शत्रूंस फावेल. शिवाय आज नाहीं उद्यां महादेवी जयचंद राजास घेऊन आली असतां भाऊबंदकी

माजेल ती निराळीच. " परंतु राजा कांहीं केल्या ऐकेना. त्यानें सांगितलें, " माझा जो निश्चय ठरला तो ठरला. मी जी आज्ञा तुम्हांला करतों आहें त्या आज्ञेप्रमाणें तुम्ही करा. तुम्हांला कोणत्याही प्रकारच्या अडचणी पडणार नाहींत. "

आपल्या मंत्रिमंडळास याप्रमाणें सांगितल्यानंतर राजा विजयपाळानें आपल्याबरोबर निवडक पांच माणसें घेतलीं आणि अधिक कांहीं कोणाचें न ऐकतां तो हिमाचलाकडे चालता झाला. त्याचा पहिला विचार आपला सासरा अनंगपाळ याच्या गुरूच्या आश्रमांत जाण्याचा होता आणि पुढला विचार अघोरघंट कापालिकाचा शोध करून त्याला नाहींसा करावयाचा हा होता. आतांपर्यंत त्यानें या कापालिकांच्या दुष्ट कृत्यांच्या हजारों गोष्टी ऐकल्या होत्या. त्यानें आजपर्यंत असंख्य नरबळी दिले. त्याची शिष्यशाखा सगळ्या आर्यावर्तभर पसरली असून विशेषत: राजघराण्यांत फार आहे असेंही त्याच्या कानीं आलें होतें. परंतु ती शिष्यशाखा आपल्याला येऊन भिडली असेल ही कल्पना त्यास नव्हती. ती गोष्ट त्यानें आपल्याच मुलाच्या तोंडून अशी अचानक ऐकण्याबरोबर त्याला धसका बसला. आपला मुलगा आणखी आपली बायको त्याच्याकडे गेलीं आहेत आणि मुलाला अस्त्रविद्या व मंत्रतंत्रविद्या त्याच्याकडून पढविली जाणार हें मनांत येतांच त्याच्या अंगावर शहारे आले. आतां आपलें कर्तव्य म्हणजे त्यांना तेथून आणणें हें होय. परंतु आपलीं माणसें अशा माणसाजवळ आहेत, आणि त्यांना तेथून आणण्यासाठीं आपण जातों आहोंत असें महशूर करणें सुद्धां अगदीं कमीपणाचें काम आहे असें त्यास सहजच वाटलें. म्हणून त्यानें आपला पहिलाच बेत—तपश्चर्येस जाण्याचा बेत—सर्वतोमुखीं करून आपलें कार्य साधण्याचें मनांत योजिलें.

अघोरघंटानें हिमाचलांतील लोकांना—तपश्चर्येकरितां जाऊन राहिलेल्या साधुसंतांनासुद्धां—फार त्रास दिला आहे असेंही सर्वतोमुखीं झालें होतें. एखादा रानांत राहणारा क्रूर वाघ ज्याप्रमाणें अचानक एखाद्या हरिणीवर किंवा तिच्या पाडसांवर हल्ला करतो, त्याप्रमाणें हा सर्व हिमाचलांत वावरून कोठें एकटीं दुकटी ब्राह्मणाचीं किंवा क्षत्रियांचीं मुलें दिसलीं; कीं यानें त्यांच्यावर झडप घालून त्यांस आपल्या मंतरलेल्या स्थानांत नेऊन त्यांचा बळी द्यावा. कांहीं तापसकन्याही अशा प्रकारें त्यानें नेल्या अशाबद्दल जिकडे तिकडे गवगवा होता. त्या गवगव्यावरून कित्येक वेळां विजयपाळाच्या मनांत आपण

त्याला ठार मारावें असें आलें होतें. परंतु त्याचा तो विचार अर्थातच तितका तीक्ष्ण झाला नाहीं. आतां जेव्हां गळ्याशींच आलें, तेव्हां त्यानें वर सांगितल्याप्रमाणें निश्चय करून हिमाचलाचा मार्ग धरला.

विजयपाळ प्रथम गेला, तो राजा अनंगपाळाच्या गुरूच्या आश्रमांत गेला. तेथें गेल्यानंतर त्याची व अनंगपाळाची अर्थातच भेट झाली. आपला जांवई आपल्या मागोमाग आलेला पहातांच अनंगपाळास फार आश्चर्य वाटलें. व तो त्यास साहजिकपणेंच म्हणालाः—" आपण इतक्या तांतडीनें इकडे येण्याचें कारण काय ? मला वाटलें आपण आतां आपल्या राज्यांत सुखानें......"

अनंगपाळाचें वाक्य पुरें होण्याच्या आधींच विजयपाळ त्यास म्हणालाः " कसलं सुख आणि कसलें काय ? चामुंडरायाला सिंहासनावर बसवून आपल्याप्रमाणेंच वानप्रस्थाश्रम घेण्याचा प्रसंग मजवर आला आहे. मात्र त्या दुष्ट व अघोर कापालिकाचा नाश करून त्याच्या त्या कर्मभूमीचा उच्छेद केल्याच्या आधीं तसें करणार नाहीं. "

कापालिकाचें नांव निघतांच अनंगपाळाचें आश्चर्य दुणावले व तो एकदम विजयपाळास म्हणतोः— " काय म्हणतां, तो दुष्ट कापालिक ? त्याच्याशीं आणखी तुमच्याशीं काय संबंध आला ? " " महाराज, माझ्याशींच काय, परंतु आपल्याशींही आला आहे आपली कन्या माझी पत्नी ही जयचंद्राला घेऊन त्याच्या सन्निध जाऊन राहिली आहे. ती त्या मध्यरात्रीं जयचंद्राला जी घेऊन गेली, ती त्या दुष्ट कापालिकाकडे गेली असेल. इकडे तिकडे कोठें तरी, ती गेल्याचें स्तोम माजवूं नये, कोणी चौकशीसुद्धां करीत नाहीं असें दाखवावें म्हणजे ती ताळ्यावर येईल असा विचार करून मीं तिचा शोध केला नाहीं. कोणी शोध करतां कामा नये म्हणून सक्त ताकिदी दिल्या, जणूं काय आपला बेत बदलण्याला कांहीच कारण झालें नाहीं असें दाखविण्यासाठीं अजमिरास येण्याच्या पहिल्या बेताप्रमाणें आलों. पुढें परत गेलों आणि शोध करूं लागलों, तरी कांहीं पत्ता नाहीं, शेवटीं आतां युक्ति करून पहावी म्हणून मीं आपल्या मंत्रिमंडळास बोलावून आणून सांगितलें कीं, मी आपल्या धाकट्या मुलाला गादीवर बसवून तपोवनांत जाणार. मनांतला हेतु हा कीं, ही वार्ता ऐकून तरी जयचंद्राची गादी जाते म्हणून ती कोठें असेल तेथून धांवत येईल. परंतु त्या माझ्या करण्यापासून तिसरेंच कांहीं निष्पन्न झालें. जयचंद्राला एकीकडे करून आपला पिता आपल्याला सिंहासनावर बसविणार हा विचार चामुंडाला

अगदींसुद्धां आवडला नाहीं. तो एकदम मला म्हणालाः “ बाबा, तुम्ही असें काय म्हणून करणार ? आई जयचंद्राला घेऊन हिमाचलांत अघोरघंट कापालिकाच्या दर्शनाला व त्यांच्याकडून जयचंद्र दादाला मंत्रविद्या, अस्त्र-विद्या शिकविणार आहे. ”

अनंगपाळानें इतका वेळ दाबून ठेवलेला आपला श्वास एकदम लांब असा सोडला, आणि विजयपाळास म्हटलें: “ ती कारटी तशीच आततायी आहे. एकूण ज्याचा नाश करण्यासाठीं म्हणून मी इथें राहिलों, त्याचाच नाश करण्यासाठीं आपण आलां, फार चांगलें झालें. एखाद्या मदोन्मत्त रानडुकराची किंवा व्याघ्राची शिकार करण्याप्रमाणेंच हें कार्य आहे असें मला पहिल्या प्रथम वाटत होतें, परंतु त्यापेक्षां हें कार्य फार कठिण आहे. किती कठिण तें तुम्हांला अनुभवावांचून समजायचें नाहीं. इतर शत्रू दुर्ग करून राहतात; परंतु हा आपल्याभोंवतीं मंत्राचा दुर्ग करून राहिल्यामुळें तो कोठें राहिला आहे, याची कर्मभूमि कोणती कांहींसुद्धां पत्ता नाहीं ! त्याने या गरीब तापसतापसींना फार छळलें आहे. रोज एखादा कुमार किंवा एखादी कुमारी नाहींशी होते. अशामुळें यांच्या तपःक्रिया निर्विघ्न-पणें कशा काय चालाव्या ? बिचाऱ्यांच्या आश्रमांत रोज रोदन चाललेलें आहे. चार दिवस झाले, मी आज एकसारखा त्याच्या पाळथीवर बसलों आहें. हिमाचलाच्या या इकडल्या प्रदेशभर हिंडलों, परंतु त्याचें स्थान म्हणून कांहीं सांपडत नाहीं. एका प्रहरा दीड प्रहरांत त्याचा नाश करीन अशी आकांक्षा धरून इथें राहिलों, त्याला आज चार दिवस झाले, तो किंवा त्याची भूमि अद्यापि दृष्टीससुद्धां पडेना. तेव्हां एकास एक दोघे आपण झालों हें फार उत्तम झालें. काय म्हणालांत, विमला त्याच्याकडे आली आहे ? आणखी जयचंद्राला घेऊन ? तो नरपशु तिचा आणि त्याचा बळी न घेवो म्हणजे झालें. या अघोरपंथी लोकांची मोहविद्या तरी केवढी भयंकर असते ! विमलेनें त्याला गुरु म्हणण्याला तिचें आणि त्याचें दर्शन तरी कोठें झालें ? पण ती अशीच चेटकें करण्यांत नेहमीं निमग्न असायची. तेव्हां कधीं कोणाच्या गुप्त साहाय्यानें तिनें त्याचें दर्शन घेतलें असेल व त्यानें तेवढ्यांत तिच्यावर मोहिनी टाकली असेल. तें कांहीं असो, त्याचा नायनाट आपण केलाच पाहिजे.

---

# प्रकरण ८ वें.

[ अत्यंत निबिड अशा वनभागावर हिमालयाचें एक शिखर होतें. त्याला चंडीकूट म्हणत. या कूटावर अघोरघंट कापालिक हा शाक्त रहात होता. निरुपद्रवी मुनिजनांचीं मुलें धरून आणून तो चंडीला बळी देई, आणि चंडीला संतुष्ट करी. त्याची शिष्यशाखा फार मोठी होती. कपालेश्वर नांवाचा त्याचा पट्टशिष्य होता. त्याच्या तंत्रानेंच बहुधा तेथलीं सारीं सूत्रें हालत. विमलेला इकडे येऊन बरेच दिवस झाले असल्यामुळें सिद्धि मिळवून परत जावयाला ती फार उतावीळ झाली होती. आणि तशी आपली रवानगी करावी म्हणून ती कपालेश्वरास गळ घालीत होती आणि तो तिला नाना आशा दाखवून झुलवीत होता. ]

## अघोरघंट कापालिक.

हिमाचलांत जितका सद्वस्तूंना आश्रय, तितकाच दुर्वस्तूंनाही आश्रय. सूर्य जसा सुष्टांवर व दुष्टांवर सारखाच प्रकाशतो, पृथ्वी जशी सुष्टांस व दुष्टांस सारखाच आधार देते, वायु जसा सुष्टांसाठीं व दुष्टांसाठीं सारखाच वहातो, अग्नि सुष्टांची मात्र पाकसिद्धि करतो, आणि दुष्टांची करीत नाहीं असें नाही, तशीच हिमाचलाची स्थिति आहे. त्याच्या एकांत स्थलांत जाऊन राहून आपली कार्यसिद्धि करून घ्यावी अशी बुद्धि धरून त्याचा आश्रय करणारा माणूस सुजन असो, दुर्जन असो, त्याला तो आपला आश्रय देतोच. त्याच्यावर देवदेवी राहतात तर राक्षस राक्षसणीही राहतात, त्याच्यावर सिद्ध गंधर्व व अप्सरा देवांगना राहतात, तर भूतें पिशाच्चें व शाकिनी डाकिनीही राहतात. त्याच्यावर नरनारायणासारखे ऋषि तपश्चर्या करतात, तर गज रावणासारखे असुरही आपलीं पुरश्चरणें पार पाडतात. त्याच्यावर मृत्युहारक अशा वनस्पति आहेत तर मृत्युकारकही आहेत. त्याच्यावर सिंहव्याघ्रादि हिंस्रपशु आहेत तर हरिण शशकादि नम्र पशुही आहेत. सारांश, जितका तो पर्वतराज सज्जनांचा तितकाच दुर्जनांचाही आश्रयदाता आहे. हा उपकारी आणि तो अपकारी हा भेद याच्याजवळ नाहीं.

यामुळेंच ज्याला ज्या गोष्टीची सिद्धि करून घ्यावी अशी इच्छा असेल तो याचा आश्रय करून ती सिद्धि होण्यासाठीं आपआपला उद्योग चालवीत असे. धौम्य, याज्ञवल्क्यादि ऋषि ब्रह्मप्राप्तीसाठीं तपश्चर्या करीत होते, तर अघोरघंट मदोत्कटासारखे कापालिक सिद्धि प्राप्त होण्यासाठीं आपापलीं पुरश्चरणें करीत होते. या अघोरघंटाचा आपल्या या कथानकाशीं फार संबंध आहे म्हणून आपण आतां त्याचें काय चरित्र आहे तें पहाण्यास जाऊं.

हिमालयाचा अत्यंत निबिड असा भाग. तोही एका अत्यंत उंच अशा व अत्यंत बिकट अशा शिखरावर. या स्थानांत देवदारु, तमाल, शाल्मली आणि बिल्व या चार वृक्षांची अगदीं घनदाट गर्दी. इतकी कीं कोणीही मनुष्य सरळ चार पावलें चालेन असें म्हणेल, तर तें त्याला अगदीं अशक्य. सर्पगतिखेरीज कोणास दुसऱ्या गतीनें या अरण्यांतून चालणेंच शक्य नव्हतें आणि अंधकार तर इतका मी म्हणत होता कीं, जर कोणा एखाद्या वीरास तेथून जावयाचें झाल्यास त्यास त्यांत खड्ग भोंकसून त्याचे तुकडे करावे तरच आपल्यास त्याच्यापुढें जाणें शक्य असें वाटल्याखेरीज राहतें ना. या हिमाचलाच्या शिखरास चंडीकूट असें नांव पडलेलें होतें.

या चंडीकूटाबद्दल हिमाचलांतल्या लोकांत अशी समजूत होती कीं त्यावर जे पशुपक्षी आहेत ते सर्व मंत्रमूढ म्हणजे मंत्रानें भारून टाकलेले आहेत. त्यांना आंखून दिलेल्या मर्यादेबाहेर मुळींसुद्धां ते पळावयाचे किंवा उडावयाचे नाहींत. त्याचप्रमाणें त्या चंडीकूटावरून वाहत येणाऱ्या नदी प्रवाहाचें पाणी कांहीं एका सीमेच्या पलीकडे जाऊन प्यालें तर त्या पिणारास तात्काळ भ्रांति उत्पन्न होते. तो वेडा होतो. कांहीं एका सीमेच्या आंत असणाऱ्या वृक्षाचें पान जर तोडलें तर त्याला मूर्छाच येते. अशा नाना भयप्रद कल्पना या चंडीकूटासंबंधानें हिमालयांतील लोकांत प्रचलित होत्या आणि त्या सर्वांचें आदिकारण तें चंडीकूट अघोरघंट कापालिकाचें पुरश्चरणस्थान होय अशी ज्याची त्याची पक्की भावना होती. आतांपर्यंत कित्येक लोकांचीं लहान मोठीं मुलें, कुमार व कुमारिका एकाएकीं नाहींशा झाल्या. गरीब बिचारे लोक पायथ्याच्या नगरांत विकण्यासाठीं कोठें कांहीं वनस्पति गोळा करण्यास जात, तर एकदम एखादा गरुड किंवा घार वरून उडून येऊन त्यांच्यांतल्या लहान अर्भकांस आपल्या गवींत घेऊन पार निघून जाई. या गरुडाचें रूप तो अघोरघंट घेऊन येतो अशी सर्वांची समजूत असे. जी स्थिति या रानटीं

लोकांची तीच अन्य शिखरांवरून तपश्चर्या करीत राहिलेल्या ऋषींच्या आश्रमांतील लोकांची होई. त्यांच्या तपःक्रियांकरितां कांहीं दर्भ समिधा अगर फुलें पुष्पें आणण्यासाठीं गेलेल्या दहावीस कुमारकुमारींपैकीं एखादी कुमारी किंवा एखादा तरी कुमार आपला नाहींसा व्हावयाचा. कोणाचा कुमार किंवा कुमारी हीं कशा प्रकारें नाहींशीं झालीं याबद्दलच्या कथा ऐकूं येत त्याही मोठ्या विचित्रच असत. कांहीं तरी अद्भुत् प्रकार घडून हीं मुलें नाहींशीं होतात अशी सर्वांची समजूत आणि त्यामुळें हिमाचलाच्या त्या सर्व परिसरांतल्या आश्रमांतून मोठा हाहाःकार उडाला होता. आपण सत्क्रिया करण्यासाठीं तपोवनें बांधलीं आणि तेथें शांतपणें आपली तपश्चर्या करीत असतां हा दैत्य येऊन आपल्यास छळतो; याचें पारिपत्य करण्यास व आम्हाला याच्या या तापांतून मुक्त करण्यास कोणीच समर्थ असा क्षत्रिय राजा पुढें येत नाही काय ? असें तेथील सर्व तापसतापसांना वाटे आणि त्यामुळें त्यांनीं आतांपर्यंत पुष्कळ क्षत्रिय राजांना विज्ञप्ति केली. त्या विज्ञप्तीला मान देऊन पुष्कळ क्षत्रिय राजांनीं त्या दुष्ट चंडीउपासकाचें पारिपत्य करून पाहिलें; परंतु आश्चर्य हें कीं, त्यांचे ते सर्व प्रयत्न अगदीं निष्फल झाले. आधीं कित्येक दिवस त्याच्या कर्मभूमीचाच पत्ता कोणास लागला नाहीं. हें त्याचें चंडीकूट शोधून काढण्यासच कित्येक दिवस लागले. पुढें तें सर्वांस कळल्यानंतर त्यावर प्रयोग कसा करावा याचीच सर्वांस अडचण पडली. कोणाला तात्काल मृत्यु आले, कोणाचें ज्ञान पार नाहींसें होऊन, ते वेड्याप्रमाणें सर्व हिमाचलभर हिंडूं लागले, कोणी व्याघ्रमुखी पडले, कोणी सिंहमुखीं पडले, कोणी एखाद्या गुहेंत जाऊन शोध करण्यास धजले तर ती गुहाच एकदम नाहींशी झाली. अशा प्रकारच्या गोष्टी ज्याच्या त्याच्या तोंडीं पसरल्या होत्या. या गोष्टींतलें तथ्य काय असेल तें एक परमेश्वर जाणें. परंतु त्या काळीं त्याजवर सर्वांचा भरंवसा बसला असून भस्मासुरादि दैत्याप्रमाणेंच हा कोणी तरी असुर पुनः जन्माला येऊन देवांचा, ऋषींचा आणि इतर गरीब तापसांचा व साध्या लोकांचा एकसारखा नाश करीत सुटला आहे असें ज्याच्या त्याच्या मनांत पक्कें बिंबलें होतें. मुख्य व विशेष गोष्ट होती ती ही कीं, अघोरघंट कपालिक कसा होता हें एकासही सांगतां येत नसे. कोणी म्हणे तो त्या कूटावर व्याघ्ररूपानें हिंडतो, किंवा सिंहरूपानें किंवा गरूडरूपानें संचार करतो. त्या रूपांत तो मनुष्यावर एकदम झडप घालतो आणि त्यास आपल्या कर्मभूमींत नेऊन चंडीस आपला बळी देतो. त्याची ती पुरश्चरणभूमि आहे त्या

भूमींत मात्र तो अगदीं आपल्या सत्य स्वरूपांत बसून आपलें पुरश्चरण करीत असतो; तेव्हां त्याला यमसदनास पाठविण्याला त्याच्यापेक्षां बलाढ्य असा कोणी देवच पृथ्वीवर अवतरल्याखेरीज आपलें हें नष्टचर्य संपत नाहीं अशी ज्याच्या त्याच्या मनाची खात्री झाली होती.

या अघोरघंटाचे शिष्य व शिष्यिणी हीं असंख्य रूपांनीं सर्व हिमालय-भर संचार करीत असतात; तेव्हां त्याला एकट्यालाच भिऊन कांहीं भागत नाहीं. त्याचा त्रास दिवसानुदिवस वाढतच जाणार असें ज्याला त्याला वाटूं लागलें व ज्यांना शक्य ते तो प्रांतच सोडून जाण्याच्या मार्गास लागले होते. ही जशी गोष्ट घडत होती तशीच अशीही गोष्ट घडे, कीं मधून मधून त्याच्या पुरश्चरणभूमींत जाऊन एकवार त्याचें दर्शन घ्यावें आणि त्याच्या प्रभावानें आपली कार्यसिद्धि झाली तर घडवून आणावी अशा बुद्धीनें कांहीं क्षत्रिय, कांहीं ब्राह्मण व क्वचित् कोणी संकरजातीय त्या पर्वतप्रांतांत शिरत. त्यांची शिष्यशाखा इतर ऋषींच्या शिष्यशाखेपेक्षांही फार प्रचंड आहे असाही लोकांचा फार दृढ समज असे. असो. परंतु हें त्याचें बाह्य वर्णन करण्यापेक्षां आपण आतां आपल्या मानस विमानाच्या सहाय्यानें त्या प्रांतावर जाऊन त्याची मूर्ति किंवा तपोभूमि दिसली तर पाहूं.

वर सांगितलेंच आहे कीं, चंडीकूट हें अघोरघंटाचें राज्य होतें. या चंडीकूटावर वर सांगितल्या वृक्षांची इतकी भयंकर गर्दी होती, कीं जर हिमाचलाच्या कांहीं वनस्पतींच्या अंगीं तेजप्रसाराचा गुण नसता, तर हा सर्व पूर्व प्रांत काल रात्रीच्या अंधारानेंच ग्रस्त केल्याप्रमाणें दिसला असता. या चंडीकूटाच्या बऱ्याच वरच्या बाजूस एक लहानसें पठार होतें. त्या पठारावर विशेषतः चंदन, बिल्व व तमाल या तीन जातींच्याच वृक्षांची राई होती. या पठाराच्या एका बाजूस मोठें थोरलें खिंडार होतें त्यांत दहा वीस गुहांचीं तोंडेंही दिसत होतीं. अघोरघंट दर अष्टमीला चंडीचें हवन करण्यासाठीं बाहेर येऊन नवीन कोणी बळी आणला असेल त्याचें हवन करतो आणि पुनः आपल्या त्या गुहांपैकीं एकींत जाऊन बसतो. त्याचे शिष्य व शिष्यिणी मात्र त्यानें शिकविलेल्या मंत्राच्या साहाय्यानें गुरूस हवनासाठीं अवश्यक ते बळी आणून देतात असाही एक समज तेथील लोकांत होता. असो.

या पठारावर पुष्कळशीं झाडें कापून काढून चांगली स्वच्छ जागा केलेली होती. तेथें मध्यस्थळीं मोठें थोरलें कुंड तयार केलेलें असून त्यांतून एकसारख्या ज्वाला निघत होत्या. एखाद्यास त्या ज्वाला पाहून असें वाटलें

असतें कीं, हें हवनकुंड नसून ज्वालामुखी पर्वतास तोंड फुटलें असून त्यांतून या ज्वाला निघत आहेत. या मध्यकुंडापासून सुमारें दहा पंधरा हातांच्या अंतरावर आणखी लहान लहान कुंडें होतीं. त्या कुंडांतूनही अशाच ज्वाला निघत होत्या. या प्रत्येक कुंडावर एक एक मनुष्य बसलेला होता व ते कसल्या तरी आहुति देत होते. त्यांच्या तोंडांतून "ओं र्‍हीं क्रीं" अशा प्रकारचा कांहीं मंत्रजप चालला होता. हे मंत्र कांहीं आवृत्ति होईपर्यंत चालत, नंतर एकदम सर्वांच्या तोंडून स्वाहाकार निघे व त्याबरोबर कोण्या प्राण्याची वपा किंवा दुसरा कांहीं शरीरभाग आहुति म्हणून त्या कुंडांतून टाकला जात असे. त्याबरोबर तडतड आवाज होई व पुष्कळसा धूर उठे. तेव्हां त्या धुराबरोबर अर्थातच घाण उमदळे. परंतु ते जे आहुति देणारे होते त्यांनीं आपलीं नाकें कधीं धरलीं नाहींत किंवा मुरकलींही नाहींत. मुख्य कुंडापाशीं मात्र कोणीं नव्हतें. तें कुंड मुख्य गुरुजींचें असावें हें उघडच होय.

हा वरील प्रकार चालला असतां वरून एका गुहेंतून एक तरुण सुंदरी बाहेर पडली व खालीं त्या पठारावरील एका कुंडापाशीं गेली व तेथें त्या कुंडांत आहुती देणाऱ्यास उद्देशून म्हणते: " कपालेश्वरा, गुरुजी, माझ्यावर अजून प्रसन्न होऊन मला निरोप कां देत नाहींत ? माझा बाळ हे रोजचे प्रकार पाहून अगदीं घाबरून गेला आहे. येथून लवकर चल म्हणून पाठीस लागला आहे. येथें अगदींसुद्धां करमत नाहीं. तर आज तरी त्यांना विनंती करून माझी सुटका कर. "

हें त्या सुंदरीचें भाषण ऐकलें, तरी तो हवन करणारा एक रेसभरही जागचा हलला नाहीं, त्यानें आपली दृष्टि कोणीकडे वळविली नाहीं. तो आपल्या जपाच्या नादांत व मधून मधून स्वाहाकार करण्यांत अगदीं पक्का निमग्न होता. ही स्त्री मात्र त्याच्याशीं एकसारखें कांहींना कांहीं तरी बोलतच होती.

थोडया वेळानें त्याचें जपाचें एक आवर्तन झालें, तेव्हां तो तिला म्हणतो: " विमलाताई, गुरुजींच्या मनांत एक मोठें हवन करावयाचें आलें आहे. या हवनाला योग्य अशी तिथि आणखी आठ दिवसांनीं आली आहे. तें हवन करून ते तुझ्या जयचंद्राला कांहीं मंत्र पढविणार आहेत. त्या मंत्राच्या योगें करून त्याला कधीं युद्धांत पराभव म्हणून होणारच नाहीं अशी सिद्धि प्राप्त होणार आहे. तेव्हां तूं उगीच घाई करूं नको. तूंच सांग बरं. मी तुझ्या

राज्यांत आल्यामुळें तुला गुरुजींनी आपली शिष्यीण केली. तेव्हांपासून तुझें कांहींतरी उणें पडलें काय ? जें जें तूं इच्छिलें तें तें तुला सिद्ध झालें, तुझा नवरा तुझ्या कह्यांत. तूं म्हणशील त्याच्याबाहेर एक रेंसभरही कधीं जात नाहीं. तुला ऐश्वर्य किती प्राप्त झालें. बरें, तूं आपण होऊन जयचंद्राला कांहीं सिद्धि प्राप्त करून द्या म्हणून आलीस, त्यांना विनंती केलीस, त्यांनीं अनुमति दिली, आणखी आतां तुझी जाण्याची चुळबूळ कां ? ”

“ चुळबुळीचें कारण दुसरें कांहीं नाहीं ” विमला त्यास एकदम म्हणाली. “ चुळबुळीचें कारण इतकेंच कीं घरचीं माणसें काय समजतील. एकट्या चामुंडाखेरीज कोणाला माहीत नाहीं मी इकडे आलें आहें म्हणून. मी या मार्गांत आहें, गुरुमहाराजांनीं माझ्यावर कृपा केली आहे, हें कानाच्या कोंपऱ्याससुद्धां माहीत नाहीं. म्हणून तुम्हांला म्हणतें कीं, लवकर निघून गेलें तर अमुक ठिकाणीं गेलें होतें हें कळायलासुद्धां मार्ग नाहीं. ”

“ कळलें म्हणून काय झालें ? कांहीं आमचा मार्ग निंद्य आहे कीं काय ? ”

“ मला जर तो निंद्य वाटता, तर मीं दीक्षा कशाला घेतली असती ? परंतु माझ्या वडिलांना या मार्गाचा फार तिरस्कार आहे. त्याचप्रमाणें आमच्या घरांतही आहे. तसें नसतें तर दीक्षा घेण्यालाच इकडे आणलें असतें. फार तिरस्कार, इतका तिरस्कार कीं......”

“ इतका त्यांना तिरस्कार, तर त्यांच्या मुलाला तूं इकडे कां घेऊन आलीस ? ”

“ कां म्हणजे ? तो मुलगा माझा नाहीं वाटतं ? कपालेश्वरा, त्याच्या पायांवर हजारों मांडलिकांनीं आपलीं मुकुटमंडित डोकीं ठेवलेलीं पहावीं अशी माझी फार फार इच्छा आहे. त्यांत माझ्या वडिलांचें सिंहासन आपल्या बसण्यानं विटाळणारा माझ्या त्या लोभी व मत्सरी वहिणीचा मुलगा तर याचा द्वारपाळ व्हावा. राजसभेंत प्रवेश करण्याचीसुद्धां त्याला पदवी असूं नये......”

“ होईल ! होईल ! ताई तशीही स्थिति गुरुकृपेनें होईल. धीर धर. ”

---

# प्रकरण ९ वें.

[ पण कपालेश्वराच्या आशीर्वादानें विमलेचें समाधान झालें नाहीं. आपण इकडे आल्याचें कदाचित् आपल्या नवऱ्याला कळेल, व मग तो आपल्यास परत नेण्यासाठीं वाटेल तें करून शाक्तांचा निःपात केल्यावांचून रहायचा नाहीं, ही तिची खात्री. पण ही खात्री तिनें कपालेश्वराजवळ उघड करतांच तो चिडला, तुझ्या नवऱ्याला चंडीला बळी देऊन तुला इथेंच कायमचें आम्ही ठेवून घेणार असें सांगितलें. तुला इथून कधींही जातां येणार नाहीं. जायचा प्रयत्न करशील तर फार भयंकर परिणाम होईल, अशी त्यानें तिला दहशत घातली. अशाप्रकारें मिळणारी मंत्रसिद्धी अर्थातच विमलेला पसंत पडली नाहीं. आपल्या सौभाग्यापेक्षां कांहीं राज्य अधिक नाहीं. तेव्हां आपणांस मंत्रसिद्धी नको, सार्वभौमत्व नको, कांहीं नको, मुकाट्यानें पोराला घेऊन जाऊंदे म्हणजे पुष्कळ झालें अशी तिनें विनवणी केली. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. चंडीद्वेष्ट्या पतीची सेवा करणें म्हणजे वैधव्य आहे, त्यापेक्षां त्याच्या महामांसाचें हवन करून आम्हां शाक्त तरुणांची सेवा करीत रहा हेंच सौभाग्य म्हणून त्यानें तिच्या मर्मावर डागण्या दिल्या. इतक्यांत गांधारांतील उपासक मुंडकोटि एका यवनास घेऊन गुरूकडे आल्याचें त्याला समजलें, म्हणून विमलेवर एका शाक्तास नजर ठेवायला सांगून कपालेश्वर गेला. ]

## कपालेश्वर.

इतकें त्याचें बोलणें झाल्यानंतर कपालेश्वर मुकाट्यानें पुनः आवर्तनाला लागला. इतर कुंडांजवळ बसलेले दुसरे कपालेश्वरासारखेच यजक प्रत्येक कुंडाजवळ बसलेले होते. त्यांचे जप चालूच होते. त्यांनीं दिलेल्या आहुतींपासून अत्यंत दुर्गंधि जिकडे तिकडे पसरलेली होती. त्या प्रत्येक कुंडाजवळ कोणत्याना कोणत्या प्राण्याचें रक्त व मांस दिसत होतें. निरनिराळ्या कुंडांजवळ बसलेले याजक निरनिराळ्या प्राण्यांचा बलि देत असून निरनिराळ्या मंत्रांचा जप करीत असावे, मात्र आवर्तन झाल्याबरोबर

सर्वजण एकदम आहुति देत व त्या आहुतीमुळें होणाऱ्या आवाजाच्या एकवटण्यानें मोठा आवाज होऊन त्या साऱ्या पठारावरील दिग्प्रांतांत दुमदुमे. कपालेश्वर आपल्या कार्यास लागला हें विमलेनें पाहिलें, परंतु स्त्रियांच्या नैसार्गिक स्वभावामुळें आतां आपण याचें आवर्तन संपेपर्यंत बोलूं नये हें ध्यानांत न राहून ती पुनः त्यास म्हणतेः " कपालेश्वरा, मला दुसरें कांहीं भय वाटत नाहीं. मी येतांना सहज चुकून कुठें जाणार तें मोठ्यानं बोललें. चामुंडानं तें ऐकलं, परंतु मी कुठें गेलें हें बोललास तर तुला काय करीन तें करीन असा धाक घातला. यामुळें तो बहुतकरून बोलणार नाहीं; पण न जाणो पोराची जात आहे. कोणत्यावेळीं त्याला काय बुद्धि होईल आणखी तो पटकन् आई अमुक ठिकाणीं गेली आहे असं बोलून जायचा. तसं जर का बोलला तर-" कपालेश्वराचें इतका वेळ आपल्या आवर्तनाकडे लक्ष्य होतें; परंतु विमलेचें हें बोलणें ऐकतांच तो आपली नरांगुलीच्या सांध्यांच्या हाडांची व स्नायूंनीं ओवलेली माळ एकदम खालीं टाकून म्हणाला " विमले, तो बोलला तर काय होईल ? तुझा नवरा तुझ्या शोधाकरितां म्हणून इकडे येईल आणि आमचा नाश करील हेंच ना तुझें म्हणणें ? विमले, तुझ्या नवऱ्याच्या शौर्य-धैर्याबद्दल तुझा फाजील अभिमान आणखी भीति आहे. अगे, आजपर्यंत असे कितीक कृष्णोपासक राजे आमच्या गुरूंच्या तपश्चर्येचा भंग करून त्यांना ठार करण्याचा उद्योग करण्याला आले; परंतु त्यांची या परिसेंत पाऊल घालण्याची सुद्धां छाती झाली नाहीं. अग वेडे, ती भैरवी कशी आहे!

काली करालवदना नयनत्रयधारिणी ।
कपालचित्रखट्वांगधारिणी भीमनादिनी ॥
करिचर्मपरीधाना शुष्कमांसातिभैरवा ।
त्रैलोक्याग्रसमानास्या जिव्हाद्वितयभीषणा ॥
जयतुंडा महोग्रा च भीमा भीमकपालिका ।
अट्टाट्टहासिनी नित्या प्रगम्या घोररूपिणी ॥
अतिकाली महाकाली महानित्या महाभया ।
विचित्रा चित्ररूपा च भीमनादाननादिनी ॥
महाघोरा शुष्कभीमा नरमुण्डविभूषिता ।
रक्तमांसप्रिया चंडी रिपुकोटिभयप्रदा ॥

अशी काली तुझ्या नवऱ्यासारख्या यःकश्चितापासून आमच्या गुरुजींचें

रक्षण करूं शकणार नाही, असें तुला भय वाटतें काय? तुला त्याच्या कचाट्यांतून सोडवून कायमची सेवा करण्याला इथें ठेवून घ्यायचें असेंच त्या चंडीच्या मनांत असेल. म्हणून तुला इकडे येण्याची बुद्धि झाली, चंडीनें जो आपला उपासक म्हणून जवळ केला, त्याला ती त्वरित फलप्रद व्हावयाचीच. विमले, तूं इकडे आलीस हें तुझ्या नवऱ्याला कळणार, तो तुझा व आपल्या मुलाचा शोध करण्यासाठीं धांवत येणार, तो आला म्हणजे देवी त्याचें कंदन करून गुरुजींना त्याच्या शवावर आसनारूढ करून, मी सांगतों त्या पर्व दिवशीं महामांस हवन करविणार, असेंच ठरलें आहेसें दिसतें. तसें जर झालें तर तूं महाकालीची सेवा करण्याला एकदम मोकळी झालीस. जयचंद लागलीच सिंहासनारूढ झाला, आणि आमच्या पंथाला एक आधारस्तंभ मिळाला? मग त्याच्या हातून...... "

तें ऐकून विमलेचें अंग एकदम थरारल्यासारखें झालें. आणखी ती अगदीं कावरी बावरी होऊन त्या आपल्या गुरुबंधूस म्हणते: " कपालेश्वरा, काय! हें काय बोलतोस? तूं असें बोललास की माझ्या बाबा अंगावर शहारे येतात! असा प्रसंग ओढवणार असला तर मी आपली चालती होतें कशी!"

" तूं जातेस?" कपालेश्वर एकदम थोडा त्वेषानें म्हणाला: " आतां कशी जाणार तूं? विमले, तुला येणें जितकें सोपें होतें, तितकें जाणें सोपें आहे असें वाटतें काय? या परिखेच्या पलीकडे पाऊल उचललेंस कीं काय स्थिति होईल, याची तुला कल्पना आहे? आंत येणें फार सोपें; परंतु बाहेर जातांना गुरुजींची अनुज्ञाच पाहिजे. आणखी आंत येणारा तरी उपासकच पाहिजे. उपासकावांचून कोणी छाती केलीच तर त्याला मृत्यु ठेवलेलाच आणि अनुष्ठानें करण्याच्या वेळीं प्रेत लागतें, तें अनायासें गुरुजींना बहुतकरून लाभतें. तसेंच या वेळीं व्हायचें असलें, तर त्याला तूं तरी काय करणार? मुलाला त्रैलोक्य विजेता करण्यासाठीं जें हवन करावयाचें ते त्याच्याच चंडीद्वेष्ट्या बापाच्या प्रेतावर आसन करून षट्कोणांत. तिची अर्चा केली म्हणजे किती फलप्रद होईल.

षट्कोणे पूजयेद्देवीं कालीं चंडां प्रचंडकां ।
इच्छापूर्तीं महाभीमां शिवानीं वामवर्त्मगः ॥

अशी शास्त्राची आज्ञाच आहे. तुझ्या इकडे येण्यानें हा जर प्रसंग आला तर आणखी काय पाहिजे?"

हें बोलत असतां कपालेश्वर इतका उग्र दिसत होता व त्याच्या डोळ्यांत इतका द्वेषाग्नि दिसत होता कीं, विमला त्याचें तें स्वरूप पाहून अत्यंत घाबरली व एकदम तिचें शरीर थरथर कांपूं लागलें. ताजें प्रेत कोठलें तरी आणून त्याच्यावर आसन टाकून स्मशानांत अघोरपंथी लोक आपलीं पुरश्चरणें करतात असें तिनें ऐकलें होतें, परंतु प्रत्यक्ष कधीं पाहिलें नव्हतें. याच्या पूर्वीं ती आपल्या गुरूच्या तपोवनांत एकदां दोनदां आली होती; परंतु आली, गुरूचें दर्शन घेतलें आणि लागलीच तेथून निघाली असा प्रकार झाला होता. त्या प्रसंगीं कधीं तसला भयंकर पूजाविधि तिनें पाहिला नव्हता आणि आज हा तिचा मूळमार्गदर्शक अशा निष्ठुरपणें तिच्याच नवऱ्याच्या प्रेतावर आसन ठोकून हवन करण्याचें अगदीं शांतपणें बोलतो आहे हें पाहतांच तिची फार भयंकर स्थिति झाली तर त्यांत नवल काय ? तिच्या अंगाला कांपरें सुटलें, तिच्या डोळ्यांत पाणी आलें, तिच्या तोंडून शब्द उमटेना, तिला तें चंडीचें कपालेश्वरानें वर्णिलेलें भयंकर स्वरूप डोळ्यांपुढें दिसूं लागलें आणि तेथें आल्याचा पश्चात्ताप झाला.

ती तिची स्थिति पाहून त्या क्रूर चंडी उपासकास संतोष झाला असें दिसलें आणि तो तिला अधिक भिवविण्यासाठीं म्हणतो: " विमले, नुसतें हें सारें ऐकून जर तुझी अशी विलक्षण स्थिति झाली तर उद्यां हा प्रकार पाहून तुझी काय अवस्था होईल ? तुला तुझा मुलगा जयचंद चक्रवर्ति व्हायला पाहिजेना ? त्याच्या पायाशीं भरतखंडांतले सगळे राजे लोळले पाहिजेतना? तो तुझ्या बापाच्या सिंहासनाला आपल्या बसण्यानें विटाळणारा तुझा भाचा त्याचा द्वारपाळ व्हायला पाहिजेना ? हें सारें जर पाहिजे तर त्याला दुसरा राजमार्ग नाहीं. हाच मार्ग आहे. गुरुजींनीं मला काल रात्रींच हा असा प्रकार होणार म्हणून सांगितलें, आणखी त्यांना तर त्यापासून फार संतोष झाला. कारण तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं घडून येण्याला तो एक मोठा सुसंधि आला असें त्यांचें म्हणणें." जसा एकादा कृष्णसर्प आपण दंश केलेल्या आपल्या शत्रूवर आपल्या दंशाचा काय परिणाम झाला, हें पाहण्यासाठींच काय आपली फडा उभारून त्याच्याकडे पहातो. तसाच तो कपालेश्वर तिच्याकडे तिच्या मनावर आपल्या भाषणाचा परिणाम काय झाला हें पाहूं लागला.

ती बिचारी आतां तर अगदींच भेदरून गेली. हा कपालेश्वर आपल्याला इतका चांगला वाटत होता, आणखी एकाएकीं इतका दुष्ट व कठोर कसा

झाला ? आपल्या पतीला मारून त्याच्या प्रेतावर आसन ठोकून आपल्या मुलाला चक्रवर्तिपद मिळवून देण्याचें अनुष्ठान करण्याचें याच्या तोंडून निघतें तरी कसें असें तिला वाटूं लागलें. पुष्कळ वेळ झाला तिच्या तोंडून शब्द बाहेर पडेना; परंतु प्रसंग पडला म्हणजे त्यांतल्या त्यांत धैर्य येतें म्हणतात, त्याचप्रमाणें तिला धैर्य येऊन ती त्यास म्हणते: “ कपालेश्वरा, अशाप्रकारें अनुष्ठान गुरुजी करणार असले तर माझ्या पोराला तें सार्वभौमपदही नको, आणखी दुसरें कांहींसुद्धां नको. मला त्याला घेऊन परत आपल्या राजधानीला जाऊं द्या. मी पुनः गुरुजींजवळ कांहीं म्हटल्या कांहीं सुद्धां मागणार नाहीं. माझें सौभाग्य मला...... ”

“ तुझें सौभाग्य ? ” कपालेश्वर तिच्या अंगावर आल्याप्रमाणें करून म्हणाला, “ तुझ्या सौभाग्यावर काय धाड पडणार आहे ! तुझ्या नवऱ्याचा देह चंडीच्या सेवेला लागेल, तूं अखंड सौभाग्य पावशील. कारण तूं स्वतः त्या भवानीची व गुरुजींची अखंड सेवा करण्याला इथें राहशील. तुझ्या इच्छेप्रमाणें जयप्राप्ति होऊन जयचंद सार्वभौम होईल. तुझ्या भाच्याला त्याचें दास्य करावें लागेल. चंडी व तिचें पट्टोपासक गुरुजी यांची सेवा हें खरें सौभाग्य कीं चंडीद्वेष्ट्या पतीची सेवा करणें हें खरें सौभाग्य ? मला वाटतें आतां विधवा आहेस, मग सधवा होशील !...”

या बोलण्यानें अगदीं कळस झाला. तिला त्याचा किळस आला. तिला जर कपालेश्वराच्या अद्भुत सामर्थ्याचें भय वाटलें नसतें, तर तिनें त्याला त्या वेळीं फाडून खाल्लें असतें; परंतु ती आपल्या वडिलांच्या घरीं व आपल्या पतीच्या घरीं अगदीं कर्दनकाळाप्रमाणें वावरणारी विमला त्या कपालेश्वरापुढें अगदीं गोगलगाय झाली ! भेदरून गेली. तिला कांहीं सुचेना. तिच्या अंगाला थरकांप सुटला. तोंडचें पाणी पळालें आणि आतां आपण येथून निसटून जावें एवढेंच काय तें तिला वाटूं लागलें. वाघाच्या तडाक्यांत सांपडलेली शेळी किंवा गिधाडाच्या गळींत सांपडलेली चिमणी जशी आपल्या त्या शत्रूकडे अगदीं केविलवाण्या व भयभीत मुद्रेनें पहाते, त्याप्रमाणेंच ती त्या कपालेश्वराकडे पाहूं लागली. तिच्या त्या मुद्रेनें व पहाण्यानें तो दुष्ट तरुण कापालिक फारच संतुष्ट झाला आणि तिच्याकडे विशेष मर्मभेदी दृष्टीनें पाहूं लागला. तिला त्याचें तें पहाणें सहन होईना. तो त्या पाहण्यानें आपल्याला जाळून भस्म करील, कीं आपलें रूपांतर करील कीं काय करील याचा तिला नेम वाटेना. तिच्या राजधानींत कांहीं वर्षांपूर्वीं येऊन आपल्या मृदुभाषणानें

व नाना प्रकारच्या विलोभनांनीं आपणास मंत्रसिद्धीचा प्रभाव सांगून वाममार्गाची दीक्षा व वशीकरणादि मंत्र सांगणारा कपालेश्वर आणि आतां आपल्यापुढें दिसणारा कपालेश्वर हे एकच काय ? अशी तिला शंका आली व त्याच्यापासून आतां एक एक पाऊल दूर होऊन आपण परस्पर गुरुजींची अनुज्ञा घेऊन येथून मुकाट्यानें चालतें व्हावें असें तिच्या मनानें घेतलें. परंतु त्या कपालेश्वराच्या अंतर्भेदी दृष्टीला तें कांहीं दिसलें नाहीं असें नाहीं. तो तिला लागलीच म्हणाला: " विमले, आतां तूं कितीही धडपड केलीस तरी तुझी सुटका होणार नाहीं. तूं आतां आमच्या तपोवनांत आलीस. गुरुमहाराजांनीं जरी तुला जाण्याबद्दल अनुज्ञा दिली तरी मी आतां तुला येथून जाऊं देणार नाहीं. तूं आतां सधवा किंवा विधवा कोणत्याही स्थितींत राहिलीस तरी तुला सदैव इथेंच आम्हां चंडीच्या उपासकांची सेवा करीत राहिलें पाहिजे. तुझी एक इच्छा मात्र मी परिपूर्ण करीन, ती ही कीं तुझा पुत्र तुझ्या पतीच्या सिंहासनावर बसवीन, पण तुझा पति चंडीच्या उपासनेला बळी पडणार आणि तूं इथें सदासर्वदा सेवा करीत रहाणार. तुला आम्हां चंडी उपासकांचें सारे उपासना प्रकार कोठें कळले आहेत ? त्या प्रकारासाठीं दर खेपेला नवीन स्त्री कोठून मिळणार ? तेव्हां आतां तूं अनायासानें येथें आलेली रूपवती, कुलवती, तरुणी, त्या तुला आम्ही—गुरुजी तरी—आपल्या हातची जाऊं देतील काय ? तूं आमची दीक्षा घेतली आहेस. आतां तुझी सुटणूक नाहीं. तुझ्या इच्छेप्रमाणें जयचंद्राला मात्र आम्ही जाऊं देऊं; त्याचें यथास्थित कल्याण करूं; पण तूं मात्र आतां विनाकारण धडपड करण्याच्या नादीं लागूं नको. सधवास्थितींत पतिसेवेपेक्षां विधवास्थितींत महाकाली व तिचे महामहा उपासक अघोरघण्ट, मी व हे इतर तरुण यांची सेवा किती फलप्रद याची तुला कल्पना होत नाहीं ? तूं इथें स्वस्थ रहा, मी तुला हे सर्व उपासनेचे प्रकार सांगेन; ते ऐक. ते ऐकलेस म्हणजे तुला येथून जावें अशी मुळींच बुद्धि व्हावयाची नाहीं. आणखी काय सांगूं ? तूं मला निष्ठुर, दुष्ट, चांडाळ समजूं नको. मी तसा नाहीं, तुझ्या हिताची गोष्ट तुला समजत नाहीं. म्हणून कठोरतेनें बोललों तर त्यावर जाऊं नको. मी म्हणेन त्याच्या बाहेर जाण्याचें मनांत सुद्धां आणूं नकोस. तुला गुरुजी सोडतील असें वाटतें, पण तीही तुझी समजूत चुकीची आहे. गुरुजी म्हणजे मी. मी म्हणेन त्याच्या बाहेर एक केंसभर सुद्धां जावयाचे नाहींत. जाणार कसे ? त्यांचा महिमा एवढा वाढवला कोणी ? त्यांच्या उपासनेला लागणारे बळी, त्यांना लाग-

णाऱ्या कुमारी, त्यांना लागणारी सर्व प्रकारची सामग्री आणून दिली कोणी? ते माझ्या तंत्रानें चालतात ते उगीच ? तें कांहीं नाहीं. तूं आतां आमची पट्टशिष्यीण झालीस, आतां तुला हळू हळू सर्व प्रकारची इथलीं कामें केलीं पाहिजेत. आणि.........”

परंतु इतक्यांत दुसरा एक उपासक खालून वर पठारावर आला तो तडक कपालेश्वराजवळ येऊन त्यास म्हणतो: “गांधारांतील उपासक मुंडकोटि फार तांतडीनें आला आहे. त्याच्या बरोबर आणखी कोणी तरी मनुष्य आला आहे. तेव्हां गुरुजींनीं सांगितलें आहे कीं, जपाचें आवर्तन अर्धें झालेलें असलें तरी तसेंच टाकून आपणास खालीं बोलावलें आहे.”

“ काय मुंडकोटि आला आहे ? आणखी त्याच्याबरोबर कोणी मनुष्य आला आहे ? ठीक. ठीक, मी त्याची वाटच पाहातों आहें. तो मनुष्य कसा काय दिसतो आहेरे अष्टांगवक्रा ! ”

“ कसा ह्मणजे ? ” अष्टांगवक्र त्यास म्हणतो: “ उपासकांपैकीं दिसत नाहीं. उलट मला तर तो यवन असावा अशी शंका येते. ”

“ यवन असावा अशी शंका येते ? ” कपालेश्वर फार आश्चर्यानें ( परंतु अंतर्गत संतोषानें ) ह्मणाला: “ असला तर फारच चांगलें झालें. आपला कार्यभाग लवकर उरकेल. बरें पण असूं दे. मी उठतोंच गुरुजींकडे जायला.” असें म्हणून तो उठला व सुमारें पांच पन्नास पावलें पलीकडे गेला. नंतर त्यानें डोळ्याची खूण करून अष्टावक्राला जवळ बोलावलें. विमलेकडे पाहून त्यानें त्याला कांहीं बजावून सांगितलें. अष्टांगवक्रानें, एकदां दोनदां तिच्याकडे चमत्कारिक दृष्टीनें पाहिलें. नंतर कपालेश्वराकडे पाहून अनुमतिदर्शक मान हलविली. कपालेश्वर तेथून निघून गेला. हा सर्व प्रकार विमलेनें स्पष्टपणें पाहिला आणि ती फारच उद्विग्न झाली. कपालेश्वरानें अष्टांगवक्रास आपल्यावर कडक नजर ठेवण्यास सांगितलें हें तिला स्पष्ट समजलें व तिनें “हाय!” असें म्हणून दीर्घ सुस्कारा टाकिला.

---

# प्रकरण १० वें.

[ अघोरघंटाची गुहा फार विस्तीर्ण होती. त्या गुहेंतच चंडीचें स्थान होतें- तिच्या गळ्यांत मुंडमाला असून सर्वांगावर अस्थींचीं भूषणें होतीं, आणि कोणालाही भय वाटावें अशी तिची मूर्ति होती. अघोरघंटाच्याही अंगावर हाडांचे दागिने होते. मुंडकोटीनें आपल्याबरोबर एक मंत्रतंत्र जाणणारा मुसलमान आणला होता. अघोरघंटापासून आपल्यास अधिक मंत्रसिद्धी मिळवावयाची आहे असें तो म्हणत होता. तो मुसलमान आणि कपालेश्वर हे परस्परांना आपण ओळखीत नाहीं असें दाखवीत होते, पण त्यांची पुष्कळ जानपछान असावी असा मुंडकोटीला संशय होता. कपालेश्वरानें शाक्तपंथाच्या वाढीवर खूपसें व्याख्यान देऊन शेवटीं अघोरघंटाला कळविलें कीं विमला निरोप मागावयाला आलीतर तिला निरोप देऊं नये. तें अघोरघंटानें कबूल केलें. ]

## मुंडकोटि व त्याचे बरोबरचा माणूस.

कपालेश्वर तेथून निघाला तो त्या अष्टांगवक्राबरोबर चालला. अष्टांगवक्रानें जी त्याला बातमी सांगितली ती ऐकल्यापासून त्याच्या मनाला फार समाधान झालेलें असलें पाहिजे. कारण त्या समाधानाची छटा त्याच्या मुखावर स्पष्टपणें दिसूं लागली होती. तो चालतां चालतां अष्टांगवक्रास म्हणतो: ‘ अष्टांगवक्रा, तूं मुंडकोटीबरोबर आलेल्या माणसास यवन रे कां म्हणतोस ? यवन गांधारांतून येण्याचा संभव आहे. आणखी मुंडकोटि गांधारांतून आला एवढेंच कारण ना तुला तसें म्हणायला ? का आणखी कांहीं आहे ? ”

“ छे. छे. आणखी कांहीं नाहीं. त्याला आपल्यासारखें कांहींच चिन्ह दिसत नाही. शिखा नाहीं, सूत्र नाहीं, गंधानुलेपन नाहीं, वाणीही आपल्यासारखी नाहीं आणि गांधारांतून आला एवढ्याचमुळें मी म्हणतों. दुसरीं तिसरीं कारणें मला काय सुचायचीं आहेत ? ”

अष्टांगवक्र याप्रमाणें बोलत असतां कपालेश्वर निव्वळ मान हलवीत होता. त्याच्या डोक्यांत निराळाच कांहीं तरी विचार चालला असावा हें

उघड दिसत होतें. अष्टांगवक्राचें बोलणें थांबलें तरी याचा विचार चाललाच होता. अष्टांगवक्र नुसता याच्याबरोबर चालला होता व मधूनमधून कपाले- श्वराच्या मुखाकडे पहात होता.

याप्रमाणें बराच वेळ विचार व चालणें दोन्ही झाल्यानंतर ते दोघे आपल्या गुरुजींच्या गुहेजवळ आले. अष्टांगवक्र बाहेरच उभा राहिला. कपाले- श्वर आंत गेला.

अघोरघंटाची ही गुहा फार विस्तीर्ण होती. अघोरघंट हिला गुहा म्हणे व त्यामुळें सर्वच तिला गुहा म्हणत; वस्तुतः तिला गुंफा म्हणतां येईल अशी तिची बाह्यरचना होती. अंतर्रचना मात्र फार निराळी होती. एक तर ती अतिशय विस्तीर्ण अशी होती. ही अघोरघंटाच्या उपासक शिष्यांपैकीं कोणी महासमर्थ राजानें डोंगरांत कोरवून अघोरघंटास दिली अशी सर्वांची समजूत होती. कोणाकोणाची मात्र अशी समजूत होती, कीं ही गुहा फार प्राचीन काळापासून अशी आहे. पांडव अरण्यवास करीत असतांना त्यांनीं रहाण्यासाठीं जीं नाना स्थळें तयार केलीं त्यांपैकींच ही एक गुहा होती, कसेंही असलें तरी एवढी गोष्ट खरी, कीं ती गुहा फार विस्तीर्ण होती. गुहेंत अघोरघंटाची उपास्य देवता जी चंडी तिची भीषणमूर्ति होती आणि चंडीच्या उपासकांच्या परम गुरूला शोभेल अशी तेथील सर्व व्यवस्था होती. त्या भीषणमूर्तीचें रौद्र स्वरूप वर्णन करण्यास कितीही भयानक व कठोर वर्णांचीं वर्णनात्मक विशेषणें योजिलीं तरी तिचें स्वरूप यथातथ्य वर्णन करणें शक्य नाही.

देवीचें सर्व शरीर तांबडें लाल असल्यामुळें म्हणा किंवा खरोखरीच त्या दिवशीं तिला रुधिरस्नान घातल्यामुळें ती अगदीं भयंकर दिसत होती. तिच्या डोळ्यांच्या ठिकाणीं फार मोठालीं अशीं माणकें बसविलेलीं होतीं. आणि एका डोळ्यांतला त्या माणकाच्या भोंवतीं जो पांढरा भाग होता, त्यावरून रक्ताचा एक ओघळ गेला असल्यामुळें तो डोळा फारच भयंकर दिसत होता. देवीची मूर्ति अगदी दिगंबर होती. कमरेला नररुंडांची—लहान लहान अर्भकांची हत्या करून तीं मुंडकीं घेऊन त्यांची—मेखला केलेली होती. या मुंडक्यांवरूनही रक्ताचे ओघळ गेले असल्यामुळें जणूं काय त्या मुंडक्यांतूनच रक्त गळतें आहे असें दिसत होतें. त्याचप्रमाणें त्या मूर्तीच्या गळ्यांत एक मुंडमाला घातली होती. तिच्यावरूनही रक्ताचे ओघळ वहात असून मधून मधून त्या रक्ताचे बिंदु त्या मुंडांच्या तोंडांतून बाहेर निघालेल्या जिभांवरून

खाली पडत होते. देवीच्या पायावर जेथें सांखळ्या असावयाच्या तेथें नराच्या अस्थीच्या तुकड्यांच्याच सांखळ्या ह्मणा अगर तोरड्या ह्मणा किंवा वाळे ह्मणा, परंतु कांहीं तरी नरास्थिभूषण होतें. देवी बसलेली नव्हती. व्याघ्राच्या पाठीवर देवी उभी होती. तिच्या हातांत परशु, डमरु आणि त्रिशूल अशी शस्त्रें होती. त्याचप्रमाणें पाश, अंकुश हेही होते. एका हस्तांत तिनें मारलेल्या असुराचें शिर व दुसऱ्या हस्तांत त्याचीं आंतडी होती असा कांहीं भयंकर देखावा होता. त्या देवीपुढें मोठमोठाले प्रचंड दीप जळत होते. ते दीपही मनुष्याच्या किंवा दुसऱ्या कोणत्या तरी पशूच्या पायाच्या अस्थींचे-त्याजवर तेलाच्या टवळ्यांच्या जागीं कपाल बसवून त्यांत घृत जळत ठेवलेलें असें दिसलें. त्या गुहेंत सर्वत्र अंधार होता. तो ठिकाठिकाणीं या अशा प्रकारच्या दिव्यांनीच नाहींसा करण्याचा प्रयत्न केलेला होता. त्या योगानें एवढेंच झालें होते कीं, तो त्या गुहेंतला अंधकार विशेष दृश्यमान होऊन आंतील सर्व वस्तु व व्यक्ति विशेष भेसूर दिसत होत्या. देवीच्या स्वरूपाचें वर्णन वर आलेंच आहे. देवीप्रमाणेंच इतर सर्व वस्तुहि होतांहोईतों रक्त, मांस किंवा अस्थि यांनीं विभूषित किंवा विहित होत्या. एखाद्या हिंस्र पशूच्या गुहेंत ज्या प्रकारची दुर्गंधि येते तशा प्रकारचीच दुर्गंधि आणि मधून मधून मात्र कोठें अगुर्वादिक सौगंधिक द्रव्याच्या धूम्रापासून येणारा सुवास येत असे. अशा या गुहेंत ठिकठिकाणी आस्थि व चर्मे-कोठें गजाजिन, व्याघ्राजिन, हरिणाजिन व अशाच प्रकारचीं कांही आजिनें--कोठें नाना प्रकारच्या पशूंचे दांत, असे पदार्थ पडलेले होते. या गुहेचें अशा प्रकारचें वर्णन कितीही करीत बसलें तरी तें पुरें पडणार नाही. तेव्हां कारणपरत्वें जसजसा प्रसंग येईल, तसतसा तिच्या भिन्न भिन्न भागांचा किंवा तदंतर्गत वस्तूंचा उल्लेख करूं. सध्यां कपालेश्वर तेथें आल्यानंतर तेथें काय झालें तेवढेंच सांगतों.

कपालेश्वर तेथें गेल्यावर त्यानें आंत एकवार डोकावून पाहिलें. तो बाहेरून उजेडांतून आला असल्यामुळें आंतील अंधकारांत एकदां आपले डोळे निर्ढावावे व तसें झाल्यानंतर मग आंत पाऊल घालावयाचें असा त्याचा विचार. शिवाय कदाचित् त्याचा विचार असाही असावा, कीं मुंडकोटीच्या बरोबर आलेला गृहस्थ कोण हें आधीं नीट पाहून जाणावें आणि मग काय तें करावें. सुमारें एकअष्टमांश घटकापर्यंत त्यानें आंत मुंडकें घालून इकडे तिकडे पाहिलें, आणि नंतर आपणास चांगलें दिसूं लागलें असें जेव्हां त्यानें पाहिलें तेव्हां तो पुढें सरला.

अघोरघंट एक उंच अशा चौरंगावर व्याघ्राजिनावर बसला होता. त्याची चूडा बुचडयाप्रमाणें बांधली असून, तीवर पुष्पमाला घातली होती. त्याच्या अंगावर उजव्या कांखेखालून डाव्या खांद्यावर येऊन बांधलेलें असें आणखी एक व्याघ्राजिन होतें. त्याच्या दंडावर पुष्कळसे ताईत बांधलेले होते! गळ्यांत कसकसल्या माळा होत्या हें सांगणेंच कठिण आहे. त्याची लांब अशी दाढी त्या माळांवरून त्या व्याघ्राजिनावरून खालीं बैठकीला लागण्यासारखी पडली होती, तिनें त्याचा उरःप्रदेश अगदीं झांकलेला होता. तथापि कांहीं रुद्राक्ष, कांहीं नरकरांगुलींच्या अस्थींचे मणी, कांहीं मरकत मणी, कांहीं स्फटिक अशा किती तरी माळा त्याच्या गळ्यांत असाव्या असें दिसलें. त्याचप्रमाणें त्याच्या कपाळावर त्यानें कुंकुमाचा मळवट भरला होता. डोळ्यांभोंवतीही तांबडे पट्टे ओढलेले होते. हातांत नाना प्रकारच्या आंगठ्या होत्या. त्या सर्व आंगठ्या अशाच कांहींना कांहीं तरी मांत्रिक तांत्रिक होत्या हें उघड होतें. त्याच्या सर्वांगावर जेथें म्हणून कांहीं बांधण्याजोगें होतें, तेथें कांहींना कांहीं तरी गंडा बांधलेलाच होता. त्याचे समोर जीं पात्रें—संध्ये-पूजेचीं पात्रें—होतीं, तीं सर्व तसल्याच प्रकारचीं होतीं. त्यांचेपुढें त्याचें हुबेहूब अनुकरण करणारा प्रत्येक बाबतींत हुबेहूब नक्कल करणारा, असा एक उपासक बसला होता व त्याच्या शेजारीं दुसरा एक इसम बसला होता त्याच्याकडे पाहून कपालेश्वर म्हणालाः—

" मुंडकोटी, तुला इतके दिवस कां लागले ? गुरुमहाराज, हा मुंडकोटी दिवसानुदिवस फार आळशी होत चालला आहे. याला आपण कधीं बरें येथें बोलाविलें होतें ? याला कोणतेंही काम सांगा, हा दिरंगाईखेरीज करी-तच नाहीं. याला एकदां......"

" कपालेश्वरा ! " मुंडकोटि एकदम त्यास म्हणालाः " तूं म्हणतोस ती गोष्ट खरी; परंतु माझ्या कार्यांत अडचणी किती येतात याची तुला कांहीं तरी कल्पना आहे ? तुला आपली येथें नुसतीं वर्तनें, पुरश्चरणें आणखी हवनें करावयाचीं, दुसरें काय ! आपलीं मला नांव ठेवायला सोपीं, परंतु किती संकटांतून मला निभावून इकडे यावं लागलं याची कल्पना तुम्हांला कोणाला तरी आहे का ? गुरुमहाराज, एक आपल्याला मात्र माझ्या कष्टांची कल्पना येणार आहे; कारण आपण त्रिकालज्ञ आहां. "

ओहो हो हो ! काय कष्ट तुला पडतात ! तुझे कष्ट तूंच करू जाणेस खरें बुवा !

" पण तें असूं दे. तूं काय केलेंस तें तर सांग. बाबारे, आपण असे जर स्वस्थ बसलों तर आपला तेव्हांच सत्यनाश होईल, करितां कांहींना कांहीं तरी व्यवस्था करून ठेविली पाहिजे. म्हणून तुला एवढा त्रास आम्हीं दिला. तर बोल काय केलेंस तें. "

" मीं बाबा कांहीं केलें नाहीं. " मुंडकोटि त्यास एकदम म्हणाला, " काहीं केलें नाहीं. कारण कांहीं शक्य नाहीं; शिवाय खरं जर पुसशील कपालेश्वरा तर मला असें वाटतें कीं या अशा भानगडीत आपण पडूं नये. कितीही झालें तरी...... "

" मुंडकोटि, तुझें हें बोलणें मी अनेक वेळां ऐकलें आहे. तुझ्या बोलण्यांत कांहीं अर्थ नाही. बरें तें जाऊं दे. पण हे तुझ्याबरोबर कोण आले आहेत ? "

" हे ? हे मीरासाहेबांचे चेले आणखी आपल्या गुरुमहाराजाची सेवा—पादसेवा—करण्यासाठीं आलेले एक उपासक आहेत. यांची इच्छा अशी आहे कीं गुरुमहाराजांची चरणसेवा करून मंत्रसिद्धि मिळवावयाची. हे गांधार देशांतील आहेत. यांची इच्छा फार कीं त्यांचा धर्म सोडून—त्यांच्या धर्मात कांहीं जादूचे इल्म थोडे नाहींत—त्यांच्या सहवासानें मला त्यांची भाषा थोडीथोडी येऊं लागली आहे. परंतु त्यांच्या त्या मंत्रविद्येपेक्षां आपल्या गुरुजींची मंत्रविद्या फार विलक्षण. तिचें सामर्थ्य कांहीं आणिक—तेव्हां त्यांचें माझें बोलणें चाललें असतां मीं गुरुमहाराजांचें व त्यांच्या सामर्थ्याचें त्यांच्याजवळ वर्णन केलें तें ऐकून त्यांना अशी इच्छा झाली कीं मी त्यांना येथें गुरुदर्शनाला आणावें, तेव्हां कृपा करून त्यांना आपल्या छत्राखालीं घ्यावें, आपल्या कार्यास त्यांचा फार उपयोग होईल. त्यांची आपण चार दिवसांच्या सहवासानें परीक्षा घेतली कीं आपल्याला माझ्या म्हणण्याचा खरेपणा सहज कळणार आहे. "

तें भाषण ऐकून कपालेश्वर मोठ्यानें हंसला व म्हणतो: " एकूण तूं आतां फारच बहार केलीस. कोणत्या कामाकरितां तुला पाठविलें, काय म्हणून पाठविलें. त्याचा कांहीं पत्ता नाहीं आणखी हें तिसरेंच कांहीं लफडें काढलें आहेस. तेव्हां तुला काय म्हणावें ? बरें यांचें आमचें बोलणें चालणें होईल तेव्हां मग पुढें पहातां येईल. आतां सध्यां त्यांनीं बाहेरल्या त्या बंध्या गुहेत रहावें. गुरुमहाराजांच्या मनांत त्यांच्यावर कृपा करायची असली तर

तेव्हांच त्याला बोलावून आणतील आणखी सर्व करावयाचें तें करतील. पण आतां तूं त्यांना घेऊन तिकडे जा. ”

तें ऐकतांच मुंडकोटि उठला आणि आपल्या बरोबरीच्या माणसास घेऊन गुहेंतून बाहेर पडला. जातांना त्या माणसाचा आणि कपालेश्वराचा कांहीं नेत्रसंकेत झाला असावा असें दिसलें.

ते दोघे तेथून गेल्यानंतर कपालेश्वर आपल्या गुरूच्या अगदीं जवळ गेला व त्यास म्हणतो: “ येथपर्यंत तर सर्व ठीक झालें, परंतु आपण पुढें काय करणार? आपल्या मनाचा एक निश्चय होत नाहीं यामुळें किती प्रकारांनीं नाश होतो पहा. आपण जर स्वस्थ बसलों तर आपल्या पाठीमागें लागलेले हे सर्व राजे तेव्हांच आपला पाठलाग करून एखाद्या हिंस्र पशूप्रमाणें आपला नाश करतील. कधीं राहणार नाहींत; आपलें हें महाहवन तर झालें पाहिजे. त्याला लागणारी एक सामग्री आपल्या हातांत आली आहे. तिला हातची दवडूंच देतां कामा नये. आतां राहिली एक कुमारी तीही मी आणीन. परंतु आपण कांहीं तरी निश्चयीपणा धरा. अगदीं धीर धरला पाहिजे. कच्चेपणा झाला, कीं गेलेंच. ही विमला आयती आपल्या तावडींत सांपडली आहे. तिला हातची जाऊं देऊं नका. विजयपाळ हा आम्हां उपासकांचा केवढा शत्रू आहे याचा विचार करा. तो आतां तिच्या शोधाकरितां येणार. सैन्य घेऊन येईल. तो मोठा शूर आहे, परंतु त्याचा आपण युक्तीनें नाश केला पाहिजे म्हणजे विमला आपल्या ताब्यांत राहिली. हा बाल राजा होईल. आपण त्याच्या भोंवतालीं आपलें मंडळ पसरूं आणखी या राजस्थानांत एक तरी आपलें चंडीउपासकांचें राज्य करूं. जिकडे पहावें तिकडे आज मितीला कृष्णाची—विष्णूची—शिवाची उपासना. दुसरी उपासना नाहीं असें कां व्हावें? चंडी महादेवी आदिशक्ति भैरवी तिचे आम्ही उपासक—आम्हांला चोरदरवडेखोरांप्रमाणें आपलीं कार्यें—आवर्तनें, हवनें लपवून मनुष्य-स्त्रीपासून दूर अशा ठिकाणीं करायला लागावीं हें काय आहे ? तें कांहीं नाहीं. हा प्रसंग आहे. हा आपण साधला पाहिजे. या विमलेला भुलवून तिच्या पतीला तिच्याकडून फसवून आपल्या पाशांत पकडून त्याचा नाश केला पाहिजे. विमला विधवा होऊन आमच्या हवनाला उपयोगी पडली पाहिजे. तिच्या साहाय्यानेंच आम्हांला कोठली तरी राजकुमारी हवनासाठीं मिळवून आणली पाहिजे. आज आयती आतां आपल्या हातीं सांपडली आहे तिला सोडूं नका. ती जातें जातें म्हणून पाठीस लागेल. मीं तिचा रोंख जाणला आहे. मीं तिला आपला हेतु काय

तो स्पष्टपणें कळविला आहे. तिला भय दाखविलें आहे. अष्टागवक्राला तिच्यावर दृष्टि ठेवण्यास सांगितलें आहे. सर्व जें कांही करायचें तें मीं केलें आहे; पण आपण जरा दृढपणा धरला पाहिजे म्हणजे सारें कांहीं आपल्या इच्छेप्रमाणें होईल......"

कपालेश्वर याप्रमाणें एकसारखा बोलत होता. किती तरी बोलला. परंतु अघोरघंटाच्या मुखावर एक स्मित दिसण्याखेरीज दुसरी कोणत्याही विकाराची छटा दिसली नाहीं. त्या स्मितामुळें उगीच तें सारें बोलणें त्यानें ऐकलें असें तरी दिसलें, नाहीं तर त्याला ऐकूं येतें कीं नाहीं याची सुद्धां शंकाच वाटली असती. त्यानें त्यावर प्रत्युत्तर म्हणून कांहीं केलें नाहीं. जसा एखादा वेडा कांहीं एक न बोलतां कोणी कांहीं बोललें, कीं नुसता हंसतो, त्यांपैकींच त्याचा प्रकार होता.

कपालेश्वरास हें सर्व ठाऊकच होतें. म्हणून तो त्यास म्हणाला: "विमला आपली आज्ञा घ्यायला आली म्हणजे तिला जाऊं देऊं नका. जसें आतां कांहीं न बोलतां स्मित करतां तसेंच करा. बाकी मी तिचा जो बंदोबस्त करायचा तो करतों."

अघोरघंट पुनः कांहीं बोलला नाहीं पण आतां त्यानें स्मितही केलें नाहीं.

---

# प्रकरण ११ वें.

[ कपालेश्वर गेल्यावर विमला आपल्या स्थितीचा विचार करूं लागली. येथून कशीही सुटका करून घेतली पाहिजे, त्यावांचून गत्यंतर नाहीं, असें स्पष्ट तिला दिसलें. पण येथून सुटका होते कशी ? कपालेश्वर मोठा बिलंदर आहे. येथल्या मंडळींपैकीं कोणाचें तरी साहाय्य असल्याशिवाय चालावयाचें नाहीं. असा विचार करून ती तिच्यावर नजर ठेवण्यास ठेवलेल्या अष्टांगवक्राला कपालेश्वराविरुद्ध चिथावूं लागली. पण अष्टांगवक्रानें तिला मोडून काढलें. कपालेश्वराविरुद्ध उघड जाण्यांत अर्थ नाहीं, उलट नुकसानच आहे, त्याच्या तंत्रानेंच घेऊन त्याला फसविलें तर कांहीं तरणोपाय आहे, एरवीं संकटच यावयाचें म्हणून त्यानें सांगितलें. पण तरीही ती कपालेश्वराविरुद्ध बोलतच होती. तिचें तें बोलणें आडून कपालेश्वरानें ऐकलें, आणि मग तिला त्यानें खूपच दरडाविलें. तुला एथें कायमची ठेवून घेऊन तुझ्या पतीला ठार करूं. कांहीं गडबड केलीस तर तुला यवनी बीरमंत्र्याला देऊन टाकायला आपण बिलकुल मागें घेणार नाहीं असें त्यानें तिला बजावलें. विमला प्रथम घाबरली, पण तिनें मनांत निश्चय करून ती वरून वरून त्याच्या म्हणण्याप्रमाणें वागण्यास तयार झाली. तो तिला आणखी भीति घालीत आहे, इतक्यांत मालिनीतीरावरची कांहीं बातमी घेऊन एक शाक्त आला तेव्हां तिला पुन्हां भिववून तिला एका गुहेंत कोंडून ठेवण्यास त्यानें अष्टांगवक्राला बजावलें व तो गेला. वैकंकट आणि रौद्रमुख या दोघां भिल्लांनीं विमलेला गुहेकडे चालविलें. ]

## विमलेचा निश्चय.

**कपालेश्वर** तेथून निघून गेल्यानंतर विमला फार बुचकळ्यांत पडली, कीं आपण आतां या संकटांतून सुटावें कसें ? कपालेश्वर म्हणजे गुरुजी. कपालेश्वराच्या म्हणण्याबाहेर गुरुजी एक पाऊलभर देखील टाकावयाचे नाहींत, हें ती पक्कें जाणून होती. आणि कपालेश्वरानें जें एकदां म्हटलें, तें तो कधींसुद्धां सोडावयाचा नाहीं, खरें करून दाखविल्याखेरीज

रहावयाचा नाहीं, हेंही पण तिला पूर्णपणें माहीत होतें. या पारध्यांच्या जाळ्यांत आपण सांपडलों, आतां यांतून सुटका कशी तरी करवून घेतली पाहिजे हें तिला राहून राहून वाटूं लागलें. तिला तिच्या पुत्राचें कल्याण व्हावयाला पाहिजे होतें. हा पुत्र आपल्याला चंडीच्या कृपाप्रसादानें--अघोर-घंट गुरूंच्या आशीर्वादानें--झाला अशी तिच्या मनाची पक्की खात्री होती. यामुळेंच तिनें त्याचें नांव जयचंडी असें ठेविलें होतें. परंतु इतर लोकांना तें तसें न वाटून त्यांनीं त्याचें जयचंद्र--जयचंद असें केलें, हें सगळें खरें. अघोरघंट, कपालेश्वर यांच्यावर तिची श्रद्धा खरी, परंतु आपल्या पतीचा वध किंवा नाश होऊन आपल्या मुलाला सिंहासन मिळावें हा विचार तिच्या मनास कधीं शिवला नाहीं. कपालेश्वरानें तसल्या विचारांना उच्चारून दाखविलें, तेव्हां तिच्या अंगावर शहारे आले. ती पतिव्रता--मुसळ देवता; पतिव्रता--होती. भांडेल, नवऱ्याच्या अंगावर जाईल. आपल्याला इष्ट असें वर्तन त्यानें केलें नाहीं म्हणजे त्याला पाहिजे तसें बोलेल. त्यानें सांगितलेली गोष्ट तिच्या मनाप्रमाणें नसली तर ती फेंकून देईल. परंतु त्याच्याविषयीं प्रेम मात्र अपरंपार. त्याच्या ठिकाणीं निष्ठा मोठी. त्याचें उणें पडलें तर तिला खपावयाचे नाहीं. अशी तिची स्थिति होती. यामुळें कपालेश्वराचे अत्यंत निर्दयपणाचे कठोर असे उद्गार तिच्या काळ-जास भिनले व ती एकदम तेथून निघून जावें असा विचार करून त्या मार्गास लागली. परंतु आपणास हा कपालेश्वर जाऊं देणार नाहीं, हा आपल्या मार्गांत कांहींना कांहीं तरी आडकाठी घालील. न जाणों आपण जर तसाच हट्ट करून जाऊं लागलों तर काय प्रसंग आपल्यावर आणील याचाही नेम नाहीं असेंही भय तिच्या मनास वाटूं लागलें परंतु ती कांहीं अगदींच केवळ भित्री व संकट आलें किंवा येतेंसें पाहिलें कीं हात जोडून बसणारी स्त्री नव्हे. त्याच्या युक्त्यांना आपल्या युक्त्या लढवूं असें म्हणून तिनें काय करावयाचें असा विचार चालविला. अष्टांगवक्राला आपल्यावर नजर ठेवण्याविषयीं कपालेश्वरानें सांगितलें आहे, याबद्दलही तिला संशय आला होता. तो संशय कितपत खरा आहे हें पाहण्यासाठीं युक्ति योजाव-याची म्हणून ती त्याला म्हणते:

" अष्टांगवक्रा, तूं इथें रे राहून काय करतोस ? बिचाऱ्या तुला कधीं कोणी या हवनकार्यांत घेत नाहीं. नुसते इकडून तिकडे आणखी तिकडून इकडे हेलपाटे घालण्यावारी तुझा प्राण घेतात. मग तूं तरी

असा कां रखडतोस ? माझ्याबरोबर चललास तर मी तुला कांहीं तरी चांगल्या स्थितींत ठेवीन. किती झालें तरी मीं पट्टाभिषिक्त राणी आहें. तूं माझ्या परिवारांत राहिलास तरी तुझें कल्याण होईल. आज इतकीं वर्षे तूं यांच्याजवळ राहिला आहेस, तुला काय सिद्धि या कपालेश्वरानें प्राप्त करून दिली ? गुरुजींची गोष्ट फार निराळी आहे. ते फार मायाळू. सर्वांवर सारखी कृपावृष्टि करतात, परंतु कपालेश्वर नित्य आडवा येतो. तूं आपल्यावरूनच विचार कर. ”

अष्टांगवक्र तिचें तें बोलणें ऐकून गद्‌गद्‌ा हंसला आणि म्हणतो: “विमलाबाई, आपण म्हणतां तें अगदीं खरें, पण त्याला उपाय काय ? कपालेश्वरावांचून त्यांचें एक पान हलत नाहीं. अर्थातच तो जें काय ह्मणेल तें खरं. या कपालेश्वराचा हा त्रास आम्हांला काय आवडतो का ह्मणतां ? पण त्यानं या मंत्रून टाकलेल्या अरण्यांत एकदां सांपडलेला प्राणी परत जातो कसचा ! कुठेंही हिंडा या परिखेच्या आंत वाघ आपल्याशीं अगदीं मांजराप्रमाणेंच वागतात. आणखी जरा त्या रेषेच्या बाहेर पाय ठेवा, कीं तेच वाघ आले चवताळून अंगावर, मग जीव घेऊन पळून कुठें जाऊं असं होतंना आपल्याला ? हा सगळा कोणाचा पराक्रम ? तूं ह्मणशील गुरुजींचा, पण मीं ह्मणतों कपालेश्वराचा. त्याच्या तावडींतून कोणी सुटायचं नाहीं. मी सुटत नाहीं, आणखी तूंही पण आतां सुटत नाहींस. विमलाबाई, मी तुम्हाला असा भोळ्याबावळ्यासारखा दिसतों; परंतु खरोखर तसा नाहींहो. मला सगळं कांहीं समजतं आहे. मी इतका आपला प्राण देऊन काम करतों पण मला कांहीं याच्यापासून प्राप्त व्हायचं नाहीं हें मला दिसतं आहे. तरी करणार काय ? आपल्या प्राणाची आपल्याला जर जरूरी असली, तर आपण असेच दिवस कंठले पाहिजेत. कपालेश्वराच्या इच्छेविरुद्ध एक पाऊलभर जर गेलों तर माझे तो या व्याघ्रारीसांकरवीं शतशः नव्हे लक्षशः तुकडे करवील. याला आतां सिद्धि इतकी प्राप्त झाली आहे कीं तो सगळं जगत् भस्म करून टाकायचं म्हणाला तर तसं करील, कधीं सोडणार नाहीं. तर तूं आतां इथून निसटून जाण्याची आशा सोड. आतां तो तुला जिवंत सोडीत नाहीं, मक्केच्या मीरासाहेबांचा पट्टशिष्या रोषनवल्ली हा महामांत्रिक आहे. तो त्याच्याच आमंत्रणावरून आला आहे. तो गांधारांत शहाबुद्दीन घोरीजवळ आहे. वेळ पडली तर कपालेश्वर तुला त्याच्या स्वाधीन करून गांधारांत पाठवून द्यायलासुद्धां कमी करणार नाहीं. कपालेश्वराची खरी माहिती तुला नाहीं. तो

तुझ्या राज्यांत येऊन ज्या गोड वाणीनं तुला उपदेश करीत असे, ती त्याची गोड वाणी इथें नाहीं. इथें तो कर्दनकाळासारखा आहे. आजपर्यंत त्यानं कित्येक स्त्रिया या रोषनवल्लीला त्याचे जादूमंत्र सिद्ध करण्याकरितां त्यांच्या वेताळजींना बळी देण्यासाठीं दिल्या. तुला त्याची कल्पना तरी आहे ? मुळींच नसायची. तुझ्या मतें हा काय पहिल्यानंच इकडे आला आहे ? नाहीं. मी जसा कांहीं त्याला आतांच पाहिल्याप्रमाणें बोललों. पण कपालेश्वराची आणखी त्याची किती तरी दिवसांची मैत्री आहे. त कांहीं विचारूं नकोस. हा वल्ली हा मोठा मांत्रिक आहे, याच्या गळ्यांत मीं ताज्या प्रेतांचीं हाडें आणखी आंतडीं पाहिलीं आहेत. हा फार भयंकर बीरमंत्री आहे. केव्हां कोणावर काय भयंकर प्रसंग ओढवील याचा नेम नाहीं. आणखी हा आयता इकडे आला आहे तेव्हां तुझं आणखी कपालेश्वराचं जर का बिघडलं तर तो तुला त्याच्या स्वाधीन करून तुझं काय करवील आणखी काय नाहीं याचा बिलकुल नेम नाहीं. मला जें तुला सांगायचं तें तुला सांगितलं आहे. मला कांहीं त्याच्या इच्छेविरुद्ध एक केंसभरसुद्धां जातां येत नाहीं. तुलाही मी सांगतों कीं तूं तसें कांहीं करूं नको. जर कांहीं तुला साधायचं असलं तर त्याला हो हो म्हणून फसवून साधायचं असलं तर साधेल नाहीं तर साधत नाहीं. तर तूं माझं व्रत धर. तो पहा मला काय समजतो आहे ! तो मला वेडा समजतो. तो मला बावळा समजतो. त्याचीं काय इंगितं आहेत तीं मला बिलकुल समजत नाहीत असं समजतो. आणखी मीही पण अशा तऱ्हेनं वागतों कीं त्याला मी खरा कसा आहें हें मुळींसुद्धां समजूं देत नाहीं. ”

विमला त्याचें तें बोलणें—तें शहाणपणानें भरलेलें बोलणें ऐकून अगदीं चकित व स्तब्ध झाली. तिला स्वप्नांत सुद्धां असें वाटलें नव्हतें कीं हा अष्टांगवक्र इतका चतुर आणखी खोल असेल. तो अगदीं बावळा, गरीब, वेडगळ असा असला पाहिजे अशी तिची समजूत. आणखी आतांपर्यंतचें त्याचें वर्तनही तशाच प्रकारचें होतें. त्यामुळेंच तिला वाटलें कीं, आपण जर याला तूं माझें ऐक. मी तुला आपल्या राज्यांत कांहीं तरी लाभ करून देईन असें म्हटलें तर तो कबूल करील, परंतु त्याचें बोलणें जों तिनें ऐकलें, तों तें शहाण्यांपेक्षांही शहाण्यासारखें. तेव्हां अर्थात् तो एक भ्रम तिच्या मनांतून नाहींसा झाला. त्याच्या बोलण्यांत कपालेश्वराचें आणि रोषनवल्लीचें जें सख्य आलें तें ऐकून विशेषतः त्या रोषनवल्लिच्या मंत्रसिद्धिसाठीं आपल्या इकडल्या

स्त्रिया कपालेश्वर देतो, असें जेव्हां तिनें ऐकलें आणखी जर तूं त्याचें ऐकलें नाहींस तर तो तुलासुद्धां त्याच्या स्वाधीन करायला चुकायचा नाहीं असें जेव्हां त्यानें म्हटलें तेव्हां तर तिचें काळीज अगदीं चर्र झालें, आतां आपली धडगत नाहीं. आपला कांहीं तरी घात होणार. आपण आपल्या पतीशीं व पित्याशीं प्रतारणा करून इकडे आलों तें फार भयंकर झालें असें तिला वाटलें. परंतु नुसतें भयंकर झालें म्हणून उपयोग काय ? कांहीं तरी तसा उद्योग झाल्याखेरीज उपयोग नाहीं. असेंही तिच्या मनास वाटलेंच व ती आपला स्तब्धपणा सोडून त्याला म्हणाली: " अष्टांगवक्रा, तूं म्हणतोस त्या सगळ्या गोष्टी खऱ्या आहेत. पण आपण यांतून सुटून जाण्याचा यत्न नको का करायला ? का आपलं होईल तें होईल असं म्हणत बसायचं. तूं अगदीं निराश होऊन बोलल्याप्रमाणं बोलतोस तें बरं नाहीं, कांहीं तरी अंगांत दम धरला पाहिजे. कपालेश्वराला आतां अस्मान ठेंगणें झालें आहे, त्याला असं वाटतं कीं आपण म्हणूं तेंच खरं. आणखी दुसऱ्या कोणाचं कांहीं चालूं द्यायचं नाहीं. गुरुजींशींसुद्धां तो स्पर्धा आणखी द्वेष करतो. हा गुरुद्रोह नव्हे का ? बोल गुरुद्रोह नव्हे तर दुसरं काय आहे. गुरुजी त्याला कां तसे भितात ?"

अष्टांगवक्र कांहीं बोलेना. एखाद्या भयभीत झालेल्या कोंकराप्रमाणें तो अगदीं दबून जाऊन शून्य अशा दृष्टीनें विमलेच्या पलीकडे कांहीं पदार्थाकडे किंवा व्यक्तीकडे स्वारी पहात होती. हा कोणीकडे पहात आहे हें विमलेला समजेना. तेव्हां ती त्याला म्हणते: " असं कां रे बावळ्यासारखं कुठें तरी पहातो आहेस ? मला वाटतं तूं त्या कपालेश्वराला इतका अगदीं भेदरून गेला आहेस कीं तुला क्षणोक्षणीं तो सगळ्या जगभर भरलेला दिसतो आहे. माझ्यामागें आला आहे वाटतं तो ? होय. "

या प्रश्नाला अष्टांगवक्राकडून उत्तर नाहीं आलें. उत्तर आलें तें कपालेश्वराकडूनच आलें आणि त्याच्या अत्यंत कर्कश व कपटपूर्ण हास्यानें युक्त अशा वाणीनें आलें. " विमलादेवी, अहो विमलादेवी, त्याला जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं मी दिसतों बरं का ? आणखी तुमच्यावरही तीच कृपा मी करावी असं तुला वाटत असेल, अशी तुला इच्छा असेल तर मी तुलासुद्धां दिसूं लागण्याची तजवीज करीन समजलीस ! तुला तशी उत्कृष्ट इच्छा होईल यांत नवल काय ? तुझा माझा ऋणानुबंध संबंधच तसा आहे. ठीक आहे. तुझी इच्छा पूर्ण करीन, आजपासून—या घटकेपासून. अगं मूर्खे,

तुला काय वाटलं कीं या मूर्खाला हातीं धरून तूं या -स्थानमुखातून आतां सहज सुटशील ? वा ! काय पण तुझी समजूत. तूं आतां इथली झालीस. आतां तुला एकदां शेवटल्या निर्वाणीच्या गोष्टी सांगून ठेवतों. तूं बऱ्या गुण्यागोविंदानें राहिलीस तर, आम्हांला चंडीच्या तृप्तीकरितां किती तरी गोष्टी साध्य होणार आहेत. नाहीं राहिलीस, तर बलात्कारानें त्या तुझ्याकडून करून घेऊं. तुझ्याकडून तुझ्या पतीला येथें आणून त्याला मारून त्याचें महामांस हवन करूं. आणि तूं जर आमच्या हेतूंच्या आड येऊं लागलीस तर इलाज नाहीं म्हणून तुला यवनी बीरमंत्र्याला देऊन टाकूं. मग ते तुझी विटंबना करतील आणखी कोणाला बळी कशी देतील याचें मला तर कांहींसुद्धां सांगतां येत नाही. शहाणी असलीस तर आतां तूं आपली मार्गावर ये. भलता सलता विचार करूं नको. मी केव्हांपासून हें तुला सांगतों आहें, तुझ्या कांहीं तें मनांत येत नाहीं. तुला वाटतें कीं माझ्या डोळ्यांत धूळ टाकून तूं येथून जाशील, पण वेडे मी आपला डोळा झांकीन अशी धूळ सगळ्या हिमाचलाच्या कोणत्याच भागांत सांपडावयाची नाहीं. आतांसकट अशा रीतीनें मीं तीनदां तुला अगदीं स्पष्ट स्पष्टपणें सांगितलें. आतां पुनः सांगणार नाहीं. तुझें तूं आपलें कायतें पहा. तुला काय वाटतें आहे मी जाणून आहें; पण तो तुझा भ्रम व्यर्थ आहे. बोल, मी म्हटलें त्या सर्व गोष्टी कबूल आहेत कीं नाहीं सांग. तूं गुरुजींवर भरंवसा टाकूं नकोस. मी म्हणेन त्याच्याबाहेर काडीभरसुद्धां गुरुजी जाणार नाहींत. त्यांच्या मनांत असलें तरी त्यांना जाणें शक्यच नाहीं, आणखी काय तुला सांगूं ? किती स्पष्टपणानें सांगूं ? ”

पहिल्या प्रथम विमला अतिशय घाबरली. कपालेश्वराला आपलें बोलणें ऐकावयाला जाईल किंवा तो आपल्या पाठीमागें असा अवचित येऊन उभा राहील हें तिच्या मनांतही आलें नव्हतें. शिवाय कपालेश्वराचा हा भयंकर स्वभावही तिला आतांपर्यंत कळला नव्हता. यवनांच्या स्वाधीन तुला करून देईन हे त्याचे शब्द तिला अत्यंत निर्दयतेचे, अत्यंत चांडालत्वाचे वाटले. कपालेश्वरानेंच तिला शक्त्युपासकांत ओढलें होतें. त्यानेंच तिला मंत्रप्राप्तीची चट लाविली होती. सोमेश्वराच्या नकळत ती त्याची शिष्यीण झाली, आणि तेव्हांपासून थोड्या थोड्या प्रकारानें ती आपणांस कांहीं तरी मंत्रसिद्धि व्हावी म्हणून खटाटोप करूं लागली होती. या खटाटोपाची फार मोठी अवश्यकता तिला दिल्लीचें—हस्तिनापुराचें—

राज्य आपल्या मुलाला मिळत नाहीं असें दिसलें तेव्हांपासून भासूं लागली. तोंपर्यंत तिला मंत्रसिद्धीची वांछा होती, ती आपल्याला पुत्रप्राप्ति व्हावी, राणिवशांतल्या इतर स्त्रियांवर राजाचें कधीं चित्त जाऊं नये अशासाठीं उपाय म्हणून हवी होती. परंतु यापुढें तिच्या मनानें एक घेतलें. कौरव-पांडवांनीं ज्या सिंहासनावर बसण्यासाठीं एवढें घनघोर युद्ध केलें तें सिंहासन आपल्या मुलाला मिळालेंच पाहिजे. तें मिळालें नाहीं तर आपला व आपल्या मुलाचा जन्म व्यर्थ. तें, आपला बाप आपल्या बहिणीच्या कारटयाला देणार, परंतु आपण तें त्याला पचूं देतां उपयोगी नाही. आपला मुलगा त्यावर बसून धर्मीप्रमाणें त्यानें साम्राज्य केलें पाहिजे. त्याच्या पायाशीं सर्व भरतखंडांतले राजेरजवाडे लोळले पाहिजेत. त्याच्याकडून राजसूय यज्ञ करविला पाहिजे. ही अत्यंत विलक्षण महत्त्वाकांक्षा तिच्या मनांत उद्भवली. ती सिद्ध करण्यास कपालेश्वर व त्याचा गुरु म्हणजे आपलाही गुरुच जो अघोरघंट त्याच्यापासून मंत्रसिद्धिच करून घेतली पाहिजे. आपल्या पोराला मंत्रसिद्धि करून दिली पाहिजे या बुद्धीनें ती कोणास नकळत जयचंदाला घेऊन येथपर्यंत आली हें अनेकवार आतांपर्यंत या कथानकांत सांगिललेंच आहे. आणि वर सांगितलेला प्रकार होईपर्यंत आपली ही इच्छा तृप्त करून घेण्याला कांहीं भयंकर किंमत द्यावी लागेल अशी तिला कल्पनाही झाली नव्हती. कपालेश्वर व अघोरघंट हें आपणापाशीं अतोनात द्रव्य मागतील तर तें आपण त्यांस सहज देऊं अशी मोठी आढयता तिला होती. यामुळें ती कपालेश्वरास तसें बोलूनही दाखवी. परंतु कपालेश्वरानें आपलें खरें हृद्गत आतां पर्यंत तिला मुळींच कधीं कळूं दिलें नव्हतें. तें आज एकाएकीं अगदीं स्पष्ट व निष्ठुरपणानें त्यानें तिला ऐकविलें. त्याबरोबर तिचे डोळे एकदम उघडले. पहिल्यानें एक दोन वेळां कपालेश्वरानें लाक्षणिक रीतीनें तिला आपलें हृद्गत समजाविलें; परंतु ती उमजली नाहीं. नंतर त्यानें एकदां दोनदां थोडया बहुत स्पष्टपणानें तेंच तिला समजाविलें, तरी तिला उमज पडेना. पुढें तिला त्याचें बोलणें विनोदाप्रमाणें वाटूं लागलें आणि मागील एक दोन प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें जेव्हां का त्यानें स्पष्ट व कठोर अशा उक्तींचा प्रयोग केला, तेव्हां तिच्या अंतःकरणांत एकदम विलक्षण प्रकाश पडला. तिला आतांपर्यंत शाक्तांचे सर्व प्रकार पूर्णपणें माहीत झालेले नव्हते. ते आतां या स्थानांत आल्यानंतर स्पष्ट दिसूं लागले, तसतसा तिला त्यांचा वीटही येऊं लागला. परंतु ज्याच्यामुळें आपल्याला मंत्रसिद्धि होणार त्या प्रका-

यांचा वीट करून कसें चालतें असें मनांत येऊनच काय, ती त्यांबद्दल इतकी चिळसली नाहीं. परंतु आजच्या या कपालेश्वराच्या भाषणानें मात्र तिचें मन अगदीं उडालें. ती किती झालें तरी मोठी पतिव्रता होती. आपल्या पतीला हा बळी देऊन आपल्याला विधवा करून येथें ठेवणार. असें त्याच्या बोलण्यांत येतांच तिच्या अंगावर शहारे आले. आपण भलत्याच आशेनें येथें आलों. फार वाईट गोष्ट केली. येथून निघून जातां येवो, अगर न येवो, परंतु आपण इकडे येऊं नका अशी सावधगिरीची सूचना तरी आपल्या पतीला पाठवूं, असें तिनें मनांत योजिलें. कपालेश्वर म्हणाला होता, की तुझ्याचयोगानें त्याला येथें भुलवून आणीन, आणि त्याला बळी देऊन तुला विधवा करून तुझ्या द्वारानें चंडीस संतुष्ट करीन; त्याचें हें भयंकर बोलणें शेवटीं त्यानें जेव्हां निक्षून पुनः पुनः उच्चारून दाखविलें, तेव्हां तिचें अंतःकरण फाटलें. कपालेश्वराचें खरें स्वरूप इतकें रौद्र, इतकें क्रूर, इतकें बीभत्स असेल हीं तिला कल्पनाही नव्हती. आतां ती सारी कल्पना आली. आतां तिला स्पष्टपणें असें दिसून आलें कीं, आपल्याला येथून सुटण्याला सांपडो वा न सांपडो, परंतु आपल्या मुलाला येथून हरप्रयत्नांनीं लावून दिला पाहिजे आणि पति येथें येणार नाहीं अशी युक्ति केली पाहिजे.

परंतु ही युक्ति कशी करावी हें तिला समजेना. कपालेश्वराचें मन आतां आपल्याविषयी खचित संशयित झालें आहे तेव्हां आतां त्याला फसवूं म्हटलें तर तें साधेलच असें नाहीं. उलट तोही आपल्याला अशाच दृष्टीने ही आपल्याला फसवीत असेल; ही विश्वास धरण्यायोग्य नाहीं अशाच दृष्टीनें पाहील, तेव्हां त्याला फसविणें तर शक्य नाहीं. त्याचें मन वळविणेंही तिला शक्य दिसलें नाहीं. तिला आतां अनुभव आलाच होता परंतु अष्टांगवक्राच्या भाषणानेंही तिच्या अंतःकरणांत फार विलक्षण उजेड पडला.

शेवटीं ती आपल्याशींच म्हणाली, स्त्रियांचें कौटिल्य अनेकांनीं वर्णन करून त्या मोठ्या कुटिल, अत्यंत कपटी व घातकी असें जगास भासविलें आहे. परंतु हा कपालेश्वर किती कुटिल, किती कपटी, किती घातकी ! याचा डाव फसवून याला दांतीं तृण धरण्यास लावण्याला आपण काय करणार? याला तोडीला तोड देण्याला आपल्याला सामर्थ्य आहे काय ? नाहीं. परंतु नाहीं म्हणून स्वस्थ बसलें तर आपण आपल्या हातानें पतिहत्या केल्यासारखें होणार, हें तर मीं कालत्रयींसुद्धां घडूं देणार नाहीं. वेळ प्रसंग पडला आणि मला यानें बळी दिली किंबहुना चांडाळानें धाक घातला त्याप्रमाणें यवनांच्या

स्वाधीन जरी केली तरी मीं जीभ हांसडून प्राण देईन. प्रत्यक्ष पुत्राची हत्या आपल्या हातानें करण्याची पाळी आली, तरी ती करीन, परंतु पतिहत्या होऊं देणार नाहीं. मी कुटिल नाहीं, कपटी नाहीं; परंतु पति मला दैवत आहे. त्याच्या संरक्षणाकरितां काय जें वाटेल तें करीन. या चांडाळाची इच्छा कधीं तृप्त होऊं देणार नाहीं.

कपालेश्वर वर सांगितल्याप्रमाणें तिला धाक घालीत असतां, विमलेच्या मनांत हे सर्व शेवटीं दिलेले विचार चालले होते. कपालेश्वर जितक्या निश्चयानें बोलत होता, तितक्या निश्चयानें तिचे वरील निश्चय चालले होते. कपालेश्वरास तिची चर्या दिसत होती, तिचें अंतःकरण दिसत नव्हतें हें एक बरेंच झालें. तो आपल्याच आढ्यतेंत होता, यामुळें त्याला तिच्या चर्येवर प्रथम दिसूं लागलेली भीति मात्र दिसली, परंतु पुढे येत चाललेली निश्चयाची दृढता दिसली नाहीं. तो शेवटी तिला अत्यंत आधिक्षेपानें ह्मणतो: “ अशी गांधारांतल्या मेंढीसारखी माझ्याकडे बावळेपणानें पहातेस काय ? तुला मी आजपर्यंत नुसता अजापुत्र दिसत होतों. नाहीं? अगे नष्टे, मी व्याघ्र आहें. व्याघ्र. पाहिजे तर वृक ह्मण. माझी कांहीं त्याला मुळींच आडकाठी नाहीं, व्याघ्र समजलीस तरी तुला आतां मटकावणार, तुझ्या नवऱ्याला मटकावणार, वृक समजलीस तरी तेंच करणार. ”

अशा बोलण्यानें तिची भयानें जास्ती तिरपिट उडते असें जाणून ती पाहाण्याच्या आनंदानेंच त्यानें हें भाषण करून अष्टांगवक्राकडे पाहून गर्दभहास्य केलें. तें विकट गर्दभहास्य दुष्टपणाच्या आशयानें अगदीं ओतप्रोत भरलेलें होतें. यामुळें तें कानीं पडतांच विमला खरोखरीच एखाद्या मेंढीप्रमाणें भेदरून गेली; परंतु तिच्या मनांत निश्चयानें तिला धीर दिला. आतां आपण याला कांहीं तरी बोलून त्याचें त्यालाच कौतुक वाटेल असें केलें पाहिजे असें मनांत वाटून ती त्यास म्हणाली: “ कपालेश्वरा, मी तुझ्या पायां पडणार, तुझ्यापुढें दीन होणार, तुझी प्रार्थना करणार, गयावया करणार दुसरें काय करणार. तूं जर ऐकलेंस तर ठीक. नाहीं तर—नाहीं तर काय ? तूं जें भोगावयाला लावशील तें दुःख भोगणें मला भाग आहे. तुझ्यापुढें मोठमोठ्यांचें कांहीं चालत नाहीं तर माझें अबलेचें काय चालणार ? ”

“ हं ? हं ? आतां तुला हीं बोलणीं सुचताहेत काय ? पण दुष्टे कपटखनी, कपटाची तूं खाणच नाहीं तर तुला काय म्हणावें ? मी इथें

नाहीं असं पाहून तूं या अष्टांगवक्राला काय म्हणत होतीस ? माझ्यासंबंधानें त्याच्याजवळ काय बोललीस ? त्याचं मन वळवून आपल्यास वश करून घेण्याला काय काय आमिष तूं त्याला दाखवीत होतीस ? आतांपर्यंत मी जीं इतकीं पुरश्चरणं केलीं, इतके बळी दिले, चंडिकेची अशा प्रकारांनीं एकनिष्ठ सेवा केली, तें सारं काय व्यर्थच झालं ? त्याच्यामुळं माझ्या पश्चात् माझ्याविरुद्ध कोण कोणाजवळ काय बोलतो आहे हें सुद्धां का मला समजत नाहीं. अगे नष्टे ! मी इथून दोन हजार योजनांवर काय कोण करतो आहे आणखी बोलतो आहे याच्याबद्दल ज्ञान मिळवतों मग आणखी तर काय सांगूं ? तुला या गोष्टी ठाऊक नाहींत असं नाहीं, पण तुझी आतां माझ्या ठिकाणची श्रद्धा उडाली. तुला वाटलं गुरु अघोरघंट दिसले, आतां या भिकार कपालेश्वराचें काय मोठंसं मूल्य, तो झाला निर्माल्यासारखा ?...... ”

इतकें बोलून त्यानें अत्यंत विकट असें गर्दभहास्य पुनः केलें आणि पुनः तो तिला कांहीं बोलणार तोंच त्याला पुनः एक मनुष्य येऊन म्हणाला: “ मालिनीतीराचे प्रदेशांतून मुंडमालेश्वर आला आहे व त्यानें आपल्याला गुरुमहाराजांसमोर पुनः फार त्वरेनें बोलाविलें आहे. ”

“ कां रे ? इतक्या त्वरेनें तो कां आला ? ” कपालेश्वरानें थोड्या उत्कंठेनें त्यास विचारलें. परंतु निरोप घेऊन आलेला माणूस उत्तर काय देणार ?

तेव्हां कपालेश्वर पुनः विमलेकडे क्रूर दृष्टीनें पाहून म्हणतो: “ दुष्टे, तुझ्याच पतीची किंवा पित्याची कांहीं तरी वार्ता सांगायला हा आला असला पाहिजे. तूं इकडे आली आहेस हें त्यांना कांहीं कळलें नसेल असें नाहीं. तें कळलेंच पाहिजे आणि त्यांनींच आपली विजयसेना आमच्या या प्रदेशावर धाडली असेल, नाहीं तर दुसरें कांहीं कार्य मला दिसत नाहीं, कीं ज्यामुळें हा मुंडमालेश्वर इकडे यावा. या दक्षिणेकडल्या साऱ्या आश्रमांत हिंडण्यासाठीं आम्ही आपले हेर ठेविलेले आहेत ते एवढ्याचसाठीं कीं आमचें निर्मूलन करण्यासाठीं प्रयत्न करणारे त्या दिशेनें येऊं लागले, तर आह्मांला वेळींच कळवावें. आमचें निर्मूलन करणारे लोक त्या भैरवीचें चंडिकेचें निर्मूलन करताहेत असेंच समजायचें, तेव्हां तिची ती चिंता वहाण्याला कोणी समर्थ नाहीं असें नाही. आह्मीही अंतर्दृष्टीनं तें जाणून तिच्याच प्रभावानें तेथल्या तेथें—आमच्यापासून दूर असतांनाच त्यांचा पूर्ण नाश

करण्याला आम्ही समर्थ नाहीं असें नाहीं. पण आम्हांला ते इथें यायला पाहिजेत. त्यांचीं मुंडें आम्हीं यथाविधि, यथाशास्त्र तोडलीं पाहिजेत, आणखी त्यांची माला करून ती श्रीचंडीच्या गळ्यांत शोभायमान झालेली आम्हीं पाहिली पाहिजे. विमले, एका बाजूस तुझ्या पतीचें मुंड, दुसऱ्या बाजूस तुझ्या वहिणीच्या पतीचें मुंड, आणि मध्यभागीं तुझ्या पित्याचें मुंड अशी मुंडमाला करून तुझ्या या कोमल हस्तांनीं जर त्या करालवदन चंडिकेच्या कंठाभोंवतीं घातली तर तुला केवढें पुण्य आणखी आम्हांला तरी केवढें पुण्य ! वा ! तो पुण्यपरिपाक आमच्या नशिबी असो म्हणजे मात्र झालें. " या त्याच्या शेवटल्या बोलण्यानें त्या दीन विमलेच्या अंगावर कसा कंप उभा राहिला असेल याचें वर्णन करून सांगणें शक्यच नाहीं. आपल्या समोर बोलणारा हा कोणी मनुष्य नव्हे, भयंकर राक्षस आहे असें तिच्या मनास स्पष्टपणें वाटलें व ती थरथर कांपूं लागली. त्यांत आणखी आपला नवरा आला असल्याचीच वार्ता त्या मुंडमालेश्वरानें आणली असली पाहिजे असें जें म्हटलेलें तिनें ऐकलें तेव्हां तर तिच्या जीवाचा फारच थरकांप झाला. जें संकट येईल येईल असें नुसतें तिला वाटत होतें, तें जर आलेंच असें खात्रीनें तिला दिसलें, तर तसा थरकांप होणें किती स्वाभाविक होय ! तिच्या तोंडून एक सुद्धां शब्द निघेना. निघणार कसा? तिची जशी स्थिति व्हावी अशी त्याची इच्छा होती तशी स्थिति झाली, असें पाहण्याबरोबर त्याला फार समाधान झालें आणि तो पुनः आपलें अत्यंत गर्दभहास्य करून म्हणालाः—" वाहवा ! वाहवा ! विमलाताई, आपल्याला हा विलक्षण पुण्य-प्रसंग लवकरच लाभणार असें समजल्यामुळें फार आनंद झाला आहे असें दिसतें. व्हायचाच तो. असा आनंद कां होऊं नये ? पण आतां माझा तर्क खरा आहे कीं नाहीं तें पहायला जातों. असायचाच खरा म्हणा, प्रत्यक्ष जाऊन शोध करून येतों. "

इतकें तिला उद्देशून बोलल्यावर तो अष्टांगवक्राकडे वळला आणि त्याला म्हणतोः " अष्टांगवक्रा, ही कशी कपटनाटकी आहे तूं पाहिलेंसना ! आतां हिच्या शब्दावर आणखी गुळचट भुलथापांवर विश्वास ठेवूं नको. चल, हिच्यावर सारखी दृष्टि ठेव. ही आतां आपणां उपासकांचा केव्हां कसा घात करील याचा नेम नाहीं. वैकंकठाला आणि रौद्रमुखाला खूण करून बोलाव, आणखी ही त्या गुहेकडे तुझ्याबरोबर मुकाट्यानें आली तर ठीक आहे. नाहीं तर त्या दोघां आडदांडांना बेलाशक हिला उचलून नेऊन

त्या गुहेंत टाकावयाला सांग. हिचा तो मुलगासुद्धां यापुढें हिच्या दृष्टीस पडूं देतां उपयोगी नाहीं, पहातों आतां हिची काय मजा आहे ती ! ”

असें म्हणून तो तेथून निघून गेला.

विमलेनें आपलाही निश्चय मनांत दृढ करून आपला कर्तव्यमार्ग ठरविला, आणि ती मुकाट्यानें अष्टांगवक्राबरोबर गेली.

रौद्रमुख व वैकंकठ या दोघां भिल्लांना तिच्या अंगास स्पर्श करण्याचें मुळीच कारण पडलें नाही.

---

# प्रकरण १२ वें.

[ रोषनवली हा वीरमंत्री असून शहाबुद्दीन घोरीचा गुप्त हेर होता. मुंडकोटि आणि तो एका गुहेंत बसले असतां मुंडकोटीनें त्याचें रहस्य फोडण्याचा बेत केला. रोषनवली आपल्यास वरून मांत्रिकच म्हणवीत असे. पण हळुहळू मोठ्या युक्तीनें बोलणें चालवून मुंडकोटीनें त्याचें कारस्थान फोडलें. इतक्यांत भिल्ल विमलेला गुहेकडे नेत असतां तिला वलीनें पाहिलें. आणि पुढें त्याला ती कोण हेंहि समजलें. तेव्हां त्याला फार संतोष झाला. वलीला आपली भाषा समजत नसावी म्हणून मुंडकोटी अष्टांगवक्राशीं बोलूं लागला, आणि त्यांच्या भाषणावरून वलीला सर्व कळून चुकलें. त्यांचें हें बोलणें चाललें आहे तों कपालेश्वर तेथें आला. ]

## रोषनवली.

विमला व कपालेश्वर याप्रमाणें इकडे परस्परांचे हेतु कसे विफल करावे यासंबंधाचे निश्चय करीत असतां व कपालेश्वर आपल्या दुष्ट भाषणानें विमलेला घाबरवीत असतां तिकडे दुसऱ्या दोन व्यक्तींचें आणखी कांहीं विषयासंबंधानें भाषण चाललें होतें; तेंही समजणें हें आपल्या या कथानकाच्या उपयोगीं आहे. तेव्हां इकडे आपण त्यांचें भाषण ऐकण्याला व त्या दोघांचा अधिक परिचय करून घेण्यासाठीं जाऊ. ज्या गुहेंत मुंडकोटीनें त्या रोषनवलीस नेलें होतें त्या गुहेंत या वेळीं ते दोघेच होते

आणि ते एकमेकांशीं म्लेंच्छ भाषेंत कांहीं बोलत होते. त्यांतला सारांश असा:—

**मुंडकोटिः—** पाहिलेत आमचे गुरु. यांची सिद्धि फार जबरदस्त आहे. आपण आपल्याला मोठे मांत्रिक म्हणवितां, परंतु आपल्या मंत्रांचा यांच्या मंत्रांपुढें काय पाड लागणार ?

**रोषनवली** तें ऐकून हंसला आणि म्हणालाः— तुम्हांला तुमच्या गुरूंचा अभिमान असणें अगदीं साहजिक आहे; आम्हांलाही आमच्या मीरासाहेबांचा अभिमान आहे. पण अभिमान सोडून बोलायचं म्हटलं तर एवढं खरं की आमच्या मीरासाहेबांपेक्षां आपल्या गुरुजींची तयारी फार. पण मुंडकोटि, आम्हांला जर या तयारीचा उपयोग झाला नाहीं तर उपयोग काय ? आह्मी तुझ्याबरोबर आलों ते उगीच आलो नाहीं. आशेनें आलों, तेव्हां आमची कांहीं तरी दाद लाव. अशी दाद लावलीस तरच तूं आम्हांला येथपर्यंत आणल्याचं श्रेय खरं. मुंडकोटि, तूं आणखी मी आम्हां दोघांत फरक काय ? कांहीं तरी खराखरा फरक आहे का ? मग आम्हांला तुम्हीं आपल्या उपासनामार्गांत दीक्षा कां देऊं नये ? आम्हीही उपासकांत शिरूं. आम्ही तुमच्या विधीप्रमाणें सर्व विधि करूं. परमेश्वरकृपेनं आम्हांला तुमची संस्कृत भाषा येते, तुम्ही बोलतां तीही प्राकृत भाषा येते मग आम्हांला तशा अडचणी काय ? आमच्या—माझ्या स्वतःच्या मनांत असें आहे की आपल्या मार्गांत शिरून त्यांत अगदीं आजपर्यंत कोणास न मिळालेली सिद्धि मिळवावयाची आणखी कोणा तरी तुमच्या हिंदूच्या राजाच्या आश्रयाला रहायचं. मला त्या शहाबुद्दिनाचा अगदीं वीट आला आहे. यवनांना त्यांतून शहाबुद्दिनाला तर—या असल्या विद्यांचा मोठा द्वेष. ते म्हणतात हें सारें सैतानाच्या ताब्यांत जाण्याचें साधन आहे. अल्ला जो सगळ्या जगाचा नियंता परवर दिगार तो असल्या साधनांचा द्वेष करितो. पैगंबर महमंद तर या साधनांच्या नादीं लागणारांला अल्लाचे शत्रूच म्हणतो. तेव्हां माझ्या इच्छा तृप्त कशा होणार ? एखादे वेळीं आपल्यावर भलतेंच संकट ओढवावयाचें म्हणून मी आपला तेथून निसटून आलों. आमच्यांतले मौलवी, काजी वगैरे आहेत, त्यांना जर कां कळलं कीं मी अशा सिद्धीकरितां धडपड करितों आहें, तर ते मला तावडतोब बादशहाच्या पुढें ओढून नेऊन माझा निकाल लावतील, म्हणून इकडे आलों आहें. तर मुंडकोटि, तूं माझी एवढी मनीषा पूर्ण कर. तूं अघोरघंटांना सांग. तूंच कपालेश्वराला ही माझी हकीकत सांग. आणखी एवढं कर बोवा कसं तरी करून... ”

ही त्या मुसलमान मंत्र्याची चर्पटपंजरी ऐकून व आतां ही आणखी किती काळ चालणार, आपण ही थोडी बंद पाडली पाहिजे असें मनांत येऊन तो त्याला मध्येंच म्हणतो: “ रोषनवली, आपण म्हणतां ती गोष्ट खरी, पण आमचे गुरु वैदिक धर्मानुयायी. ते तुझ्यासारख्या शिखानष्टाला कसें बरें आपल्या या पुरश्चरणांत घेतील ? ”

“ काय रे झालें न घ्यायला ! तुमच्यांत आणि माझ्यांत काय फरक आहे ? आपल्या आणखी आमच्या वर्तनांत अंतर काय आहे ? स्मशानांत जाऊन तेथें टाकून दिलेल्या प्रेतांना शिवून त्यांच्या आंतड्यांनी देवीला संतोषवावयाचें हे काय आमच्या धर्माला करतां येणार नाहीं ? तुमच्यांत प्राणिहत्येच्या विरुद्ध किती तरी आरडाओरडा चालला आहे. वेड्या, तूं मला या मार्गांत घालण्याची खटपट कर नाहींतर कपालेश्वराकडे आम्ही आपलें संधान बांधतोंच. ” मुंडकोटि तें त्याचें बोलणें ऐकून हंसला आणि म्हणतो: “ रोषनवलीमहाराज, आपण जी गोष्ट बोलतां ती शक्य तरी कशी ? आपण काय समजतां ? आमचे गुरुजी किंवा कपालेश्वर आपल्याला चंडिकेपुढे तरी जाऊं देतील ? ”

मुंडकोटि मुद्दाम असें बोलतो आहे कीं सहज बोलतो आहे हें समजणें कठिण होतें. तो रोषनवलीकडे पाहून आपल्याशींच स्मित करीत असावा अशी त्याची चर्या मात्र दिसत होती. रोषनवलीच्या लक्ष्यांत तें आलें कीं नाहीं हें समजणें मुळींच शक्य नव्हतें. त्याच्या चर्येवर कांहीं सुद्धां भावना दिसत नव्हती. तो मुंडकोटीस म्हणाला:—

“ तुझ्या बोलण्याचा मला अर्थच समजत नाहीं. मघाशीं कपालेश्वरानें मला आपल्या गुरूपुढें नेऊन बसविलें तेव्हां काय तुमच्या देवीला झांकून ठेविलें होतें ? अरे बाबा, तुम्हांला काय करायचें आहे, मी कोणीही असलों तरी ? मला तुमची विद्या द्या आणखी माझी विद्या तुम्ही घ्या. म्हणजे एकमेकांच्या विद्येंत जो काय उणेपणा असेल तो निघून जाईल. वेद काय आणखी कुराण काय सगळीं एकच नाहींत का ? मी तुमच्याकडे आलों आहें आणखी मला जर तुम्ही असा झुगारून...... ”

“ छे. छे. छे. झुगारून देण्याची गोष्ट कशाला काढतां ? आपल्याला येथपर्यंत आणलें तें कांहीं झुगारून देण्यासाठीं आणलें ? कपालेश्वर सर्व कांहीं तुमच्या इच्छेप्रमाणें करील. तुम्हांला सर्व कांहीं सांगेल. मी आपला उगीच कांहीं तरी बोलत होतों. ”

“ आपली विद्या आम्हांला पाहिजे म्हणून तर आम्ही इतक्या आदरानें आपल्याला बोलावून आणलं. पण आतांपर्यंत आपलें बरेंच वायफळ बोलणें झालं. आतां पुढचं काय ? ”

“ पुढचें काय सांगू ? तुम्ही सांगायचें का मीं ? ”

मुंडकोटीनें त्याचें तें बोलणें ऐकून किंचित् विचार केल्याप्रमाणें केलें आणि ह्मटलें “ कपालेश्वराचें कांहीं जुळेल का ? ”

“ कपालेश्वराचें काय जुळायचं ? मला तुझ्या बोलण्याचा कांहीं अर्थ समजत नाहीं. ”

“ वलीसाहेब, मी आपल्या गुपितांत नाहीं असें समजूं नका. कपालेश्वरानें सर्व कांहीं मला सांगितलें आहे. अहो प्रत्येकाला कोणी तरी विश्वासाचा असतो. मी जर त्यांच्या विश्वासांत नसतों, तर तुम्हांला इकडे घेऊन आलों असतों का ? जी गोष्ट त्याला पसंत नाहीं, त्यानें अनुमोदिली नाहीं, ती करण्याचें धैर्य आहे कोणाला ? मी त्याच्या अगदीं विश्वासांतला आहें. मात्र मला कांहीं कळलें आहे किंवा त्यानें मला आपल्या विश्वासांत घेतलें आहे हें कोणाला कळूं द्यायचे नाहीं. पण त्यानें गुरुजींपासून निघून बाहेर येतांना आपल्याकडे पाहून डोळे मिचकावले, यांतला अर्थ मला कळला नाहीं असें का तुम्ही धरतां ? आपण देखील त्यांना हा मजकूर कळवूं नका. पण त्यांचें काम होईल का नाहीं तें सांगा, आपण निरोप काय आणला आहे. कपालेश्वराला जर एखादं राज्य मिळालं तर आमचं समळ्यांचें त्यांत कल्याण आहे. तेव्हां आम्हांला अशीच उत्कंठा आहे कीं याप्रमाणें घडून यावं. बोला बादशहा...... ”

इतकें सर्व—यांतील प्रत्येक शब्द बोलत असतांना मुंडकोटि रोषनवलीच्या चर्येकडे फारच तीक्ष्ण दृष्टीनें पहात होता व रोषनवलीही त्याचप्रमाणें याच्या चर्येकडे उलट तितक्याच तीक्ष्णपणानें पहात होता. वर दिलेल्या वाक्यांत मुंडकोटि गुटमळतांच रोषनवली त्यास म्हणतो: “ बाचारे, कोणी तरी कांहीं पेरलें तर उगवतें. दिलें तर परत मिळतें. उगीच कांहीं उगवत नाहीं आणखी परतही मिळत नाहीं. ”

मुंडकोटीच्या कानीं तीं अक्षरें पडतांच त्याच्या चर्येवर समाधान—आपण कांहीं धाडस केलें असतां तें सिद्धीस गेल्यावर होणारें समाधान दिसूं

लागलें. मात्र तो तें समाधान झांकून जसें कांहीं कांहींच आपल्यास समजलें नाहीं असें दाखवीत होता.

पुढें तो लागलीच त्यास म्हणाला: “ तुह्मी म्हणतां ती गोष्ट खरी; नाहीं कोण ह्मणेल ? परंतु तुह्मी असा विचार करा कीं, कपालेश्वर कांहीं तरी देण्याला समर्थ नाहीं का ? आहेच. तो तुम्हांला देण्याचें कबूल करील म्हणूनच आपण तरी त्याच्याकडे आलां कीं नाहीं. त्यानें आपल्यास कबूल केलेंच असेल; त्याखेरीज का आपण इकडे आलां. आणखी काय देण्याचें कबूल केलें हें मला का माहीत नाहीं असें आपलें मत आहे. त्याच्या फार विश्वासांतला मी आहें, आपण त्याबद्दल शंका धरूं नका. मी तसें बाहेर दाखवीत नाहीं, तोही तसें दाखवीत नाहीं, उलट बाहेरून आम्ही अगदीं विरोध दाखवितों. दुसरा मार्ग काय, इथें म्हणजे काय तऱ्हेचे लोक आहेत. एकाचा पायपोस एकाच्या पायांत नाहीं तर आतां कृपा करून आपण माझ्याशीं प्रतारणा करण्याच्या भानगडींत अगदीं पडूं नका. जें काय असेल त खुलाशानें मजजवळ बोला. ”

रोषनवली कांहीं वेळ स्वस्थ बसला. कांहींच बोलला नाहीं. तेव्हां मुंड-कोटि त्याच्याकडे अगदीं सूक्ष्म दृष्टीनें व उत्कंठेनें पाहूं लागला. आपण बोललों हें वाजवीपेक्षां जास्ती बोलत नाहींना ? आपल्या बोलण्याचा त्याच्या मनावर अनिष्ट परिणाम झाला नाहींना अशा शंकेनें जसें एखा-द्यानें बघावें तसें तो बघत राहिला.

रोषनवलीच्या मनांत निराळेच कांहीं विचार चालत असावे. थोड्याच वेळांत ते त्याचे विचार पूर्ण झाले आणि तो एकदम मुंडकोटीस म्हणतो: “ जें कांहीं कपालेश्वरानें कबूल केलें आहे, त्याप्रमाणेंच तूंही कबूल कर-शील काय ? जें कपालेश्वरास अर्पण केलें—किंवा करूं म्हणून कबूल केलें आहे—तेंच तुलाही मिळेल. मला तर वाटतें, कीं आमच्या कार्याला तुझा उपयोग ज्यास्त होईल. तेव्हां बोल काय तें, ही वेळ आहे परंतु हें लक्ष्यांत धर, कीं ज्या गोष्टी तूं कबूल करशील त्यांत अणुरेणुभरही कमी अधिक होतां कामा नये. कपालेश्वराची आणखी माझी अशीच कबुलायत झाली आहे. पण कांहीं असो. तूं त्याच्यापेक्षां पुष्कळच उपयोगी पडशील अशी माझी बालंबाल खात्री झाली आहे. पण त्याच्या बाहेर आम्हांला जायचं नाहीं. कारण पहिला तो. ”

इतकें बोलून तो मुंडकोटीकडे पाहूं लागला.

मुंडकोटी बुचकळ्यांत पडला. शेवटीं त्यास म्हणतो: " वलीसाहेब, मला आपण काय म्हणतां तें आतां मात्र समजत नाहीं. तो आणखी मी—कपालेश्वर आणखी मी—शरीरानें मात्र दोन आहों. दुसऱ्या कोणाही माणसाच्या देखत आम्ही दोन आहों. परंतु अंतर्यामीं अगदीं एक. आमचें आंतलें ऐक्य कोणाला समजायचें नाहीं. दुसऱ्याच्यादेखत आम्ही परस्परांबद्दल विरुद्धपणासुद्धां दाखवूं; परंतु अंतस्थ ऐक्य आहे तें आहेच. तेव्हां माझ्याशीं एक आणखी त्याच्याशीं एक. माझ्याजवळ निराळें आणि त्याच्याजवळ निराळें, असला प्रकार करूं नका. मला जें सांगाल किंवा म्हणाल, तें त्याला कळणार. त्याला जें म्हणाल तें मला कळणार, असा प्रकार आहे. मी त्याच्यापेक्षां अधिक उपयोगी, अधिक हुशार असें कांहीं बोलूं नका. आम्ही दोघे म्हणजे एक. काय सांगायचें तें मला सांगा म्हणजे त्याला सांगितल्याप्रमाणेंच आहे. त्याला सांगितलें तर मला सांगितल्यासारखेंच आहे. बाहेरच्या दिसण्यावर जाऊं नका. "

इतकें बोलून मुंडकोटि त्याच्याकडे अगदीं निरखून पाहूं लागला. तो आपल्या बोलण्याचा परिणाम काय काय आणि कसा कसा होतो तें जणूं काय क्षणोक्षणीं पहात होता.

रोशनवली फार बुचकळ्यांत पडला असावा असें दिसलें; परंतु तो लवकरच बुचकळ्यांतून निघून त्यास म्हणतो:

" जसा त्याला एक प्रांत कबूल केला आहे, तसा तुलाही देण्याचें कबूल केलें तर वावगें काय होईल ? "

मुंडकोटि त्याच्या त्या बोलण्यानें जरा थक्क झाला. नंतर आपण असें थक्क झाल्यासारखें दाखविलें, तर आपलें सगळें भांडवल बाहेर पडेल, असें मनांत येऊन तो एकदम म्हणतो:

" जो प्रांत त्याला कबूल केला, तो अजमीर प्रांत—तें अजमीरचें राज्य त्याला तुम्ही द्या. त्यानें मलाही सारें कांहीं सांगितलें आहे. मला आणखी एकादा प्रांत देतों म्हणालांत तर त्याला कळविल्याखेरीज मी कांहीं रहाणार नाहीं. "

परंतु इतक्यांत बाहेर कोणी तरी स्फुंदत स्फुंदत चालल्याचा आवाज त्या दोघांच्याही कानीं पडला. म्हणून ते दोघे काय आहे तो प्रकार पहाण्यासाठीं बाहेर आले. पाहतात तों दोन धटिंगण भिल्ल समोरून येत असून त्यांच्या पुढें एक सुंदर स्त्री चालली आहे, ती स्त्री स्फुंदून स्फुंदून

रहते आहे. त्या स्त्रीच्या पुढें अष्टांगवक्र चालला होता. त्यास मुंडकोटीनें पाहिलें आणि तो आश्चर्यचकित होऊन त्याच्याकडे पाहूं लागला. थोड्याच अवकाशांत त्याच्या अगदीं जवळून ती स्त्री गेली. रोषनवलीने तिच्याकडे अगदीं निरखून पाहिलें. नंतर तो पलीकडे गेल्यावर त्यानें मुंडकोटीस ' ही स्त्री कोण आणि हा प्रकार काय ? ' म्हणून विचारलें. मुंडकोटीनें आपणांस स्त्री कोण तें माहीत नाहीं, परंतु कोणी तरी आतां महाहवनाचे दिवशीं बळी देण्यासाठीं आणली असावी असें सांगितलें, परंतु त्याला ही अप्रतिम लावण्याची स्त्री कोण हें जाणण्याची उत्कट इच्छा असल्यामुळें त्यानें अष्टांगवक्रास मोठ्यानें हांका मारून आपलेकडे बोलाविलें; परंतु कपालेश्वरानें सांगितलेली एवढी कामगिरी करून येतों म्हणून त्यानें उत्तर दिलें व तो तसाच पुढे झटकला.

हे दोघेही तसेच आश्चर्यचकित नेत्रांनीं त्या स्त्रीकडे व तिच्या बरोबर चाललेल्या भिल्लांकडे व अष्टांगवक्राकडे पहात उभे राहिले. थोड्याच वेळांत ती मंडळी पलीकडल्या एका गुहेंत शिरली. सुमारें अर्ध्या घटकेनें अष्टांगवक्र एकटाच परतला. मुंडकोटीला तो तसा परत येईल हें वाटतच होतें आणि तो परत आला म्हणजे त्याला विचारूं असें त्यानें बेत केला होता.

रोषनवलीच्या मनांत अशी आशा उत्पन्न झाली होती कीं, ती स्त्री पुनः कदाचित् इकडून जाईल आणि गेली म्हणजे आपणास पुनः दिसेल. यामुळें तोहीं मोठ्या उत्कंठेनें वाट पहात होता.

अष्टांगवक्र जवळ येण्याबरोबर मुंडकोटि एकदम त्याच्यापुढें जाऊन त्याला अडवून म्हणतोः " अष्टांगवक्रा, हा काय प्रकार आहे. ही स्त्री कोण ? "

अष्टांगवक्र एकदम त्यास म्हणतोः " काय ? ही स्त्री कोण हें तुला माहीत नाहीं ? "

मुंडकोटिः— नाहीं. ही कोण आणखी कोठून आणली ?

अष्टांगवक्रः— कांहीं मृग व मृगी लांडग्याच्या तडाख्यांत सांपडतात आणि कांहीं मेंढे व मेंढ्या आपण होऊन त्यांच्या तोंडांत शिरतात.

मुंडकोटिः— एकूण ही तडाख्यांत सांपडलेली मृगी नाहीं. आपल्या पायांनीं चालत आलेली मेंढी आहे ?

अष्टांगवक्र:— हो. आपल्या पायांनीं आपल्या कोंकराला बरोबर घेऊन इकडे आली आणि आतां पश्चात्तापांत पडली आहे.

मुंडकोटि:— ही कोठून आली आणि कोणाची आहे ? कां बरें आली ?

अष्टांगवक्र:— आपल्या घरून आली. राजाची आहे आणि तिचा मृत्यु ओढवला म्हणून आली. दुसरं काय कारण असणार ?

मुंडकोटि:— अष्टांगवक्रा, तूं इतका शहाणपणानें बोलणारा असशील असें मला आजपर्यंत वाटलें नाहीं. परंतु आज...

अष्टांगवक्र:— ( मध्येंच ) शहाणपणा दिसला नाहीं, आणखी संकटांत सांपडलेल्या माणसाचा शहाणपणा चालत नाहीं. तेव्हां तो असून नसून सारखाच.

मुंडकोटि:— या भाषणानें थोडा वेळ अगदी गप्प बसला. नंतर म्हणतो: “पण मला सरळ भाषणानें या स्त्रीची हकीकत सांग.”

अष्टांगवक्रानें किंचित् वेळ दम खाल्ला. नंतर म्हणतो: “मी नाहीं सांगितली तरी ती तुला कपालेश्वराकडून समजणारच. तेव्हां आतां सांगतों.” असें म्हणून त्यानें ती कोण काय तें मुंडकोटीस सांगितलें.

अष्टांगवक्र ही हकीकत सांगत असतां रोषनवली व मुंडकोटि दोघेही एकचित्तानें ऐकत होते. मुंडकोटीच्या मनांत रोषनवलीस कांहीं समजत नसावें. परंतु हा आपला समज चुकीचा असें रोषनवलीच्या चर्येवरून त्यास स्पष्ट दिसलें.

अष्टांगवक्राची हकीकत संपते न संपते तों कपालेश्वर तेथें आला.

---

# प्रकरण १३ वें.

[ अनंगपाळ आणि विजयपाळ यांच्या तयारीमुळें कपालेश्वर बराच चिंताग्रस्त झाला होता. त्यानें मुंडकोटीला ती हकीकत सांगून आतां काय करावें म्हणून विचारलें तेव्हां मुंडकोटीनें विमलेला सोडून देण्याचा सल्ला दिला. पण तो कपालेश्वरास आवडला नाहीं. मी तिला देवीला बळी देईन नाहीं तर यवन बादशहाकडे पोंचवीन म्हणून तो म्हणाला. मुंडकोटीस याचें वाईट वाटलें. नंतर कपालेश्वरानें सर्वांना घालवून तो रोषनवलीशीं बोलूं लागला. पण वलीसाहेबानीं बाकीचें बोलणें बाजूस ठेवून प्रथम विमलेचा प्रश्न विचारला. प्रथम प्रथम कपालेश्वरानें आपणाला कांहीं ठाऊक नाहीं म्हणून खूप कांगावा केला. पण शेवटीं त्याला ती कोण, कोणाची वगैरे सांगावेंच लागलें. तेव्हां वलीनें तिची बादशहासाठीं मागणी केली पण ती गोष्ट कपालेश्वरानें साफ नाकारली. तो कांहीं कबूल होईना इतक्यांत त्याला अघोरघंटाकडून बोलावणें आलें. तेव्हां ते दोघेहि तिकडे गेले. अघोरघंटानें विमला व तिचा मुलगा यांना परत पाठवून देण्याविषयीं कपालेश्वरास सांगितलें, पण ती आपल्यास कोठें आहे हें मुळींच ठाऊक नाहीं म्हणून त्यानें सांगितलें. आणि अघोरघंटाच्या या योजनेवर तो संतापून बोलूं लागला. ]

## विमला व मुंडकोटि.

अष्टांगवक्राचें व मुंडकोटीचें इतकें रहस्य काय चाललें आहे हें आपणास समजावें अशी कपालेश्वरास साहजिकच इच्छा झाली. जो मनुष्य सदासर्वदा कारस्थानें करण्यांत मग्न त्यास कोणीही दोन माणसें एकमेकांशीं हळूहळू बोलत असतांना दिसलें पुरे, कीं तीं आपल्याविषयींच बोलत आहेत असा संशय त्याच्या मनांत उभा रहावयाचाच. अष्टांगवक्राला म्लेंच्छ भाषा येत नाहीं. तेव्हां त्याचें बोलणें रोषनवलीला समजावयाचें नाहीं हें उघड होतें; परंतु अष्टांगवक्र मुंडकोटीस काय सांगत असावा ? हें आपण स्पष्टपणें विचारावें कीं नाहीं, याबद्दल क्षणभर विचार करून त्यानें विचारूं नये असेंच ठरविलें. तो नुसतेंच मुंडकोटीस म्हणाला:

" आपणांवर अरिष्ट येणार असें दिसतें. बाकी त्या अरिष्टाला आपण दाद काय देतों ह्मणा ! पण सावध राहिलें पाहिजे. पहा हे वेद-धर्माभिमानी राजे स्वत: चंडीचे उपासक, परंतु आमचा असा छळ करतात. कां ? तर आह्मी महामांसाचें हवन करतों, आणखी चंडीला जें प्रिय तेंच तिला बळी देतों ? मुंडमालेश्वर तिकडून आला आहे. या दुष्ट चांडाळ-णीच्या पतीनें व पित्यानें आह्मांस धरून आमचा निःपात करण्याची प्रतिज्ञा केली आहे. वैतरणीच्या पैलतीरावर असणाऱ्या धौम्याच्या आश्रमांत ती मंडळी आली आहे अशी बातमी त्यानें आणली आहे. मालिनीच्या तीरावर तर कांही सेना दिसूंही लागली आहे. अशा स्थितीत आतां काय करावें या विवंचनेंत आह्मी पडलों आहों. आमच्या मंत्रसामर्थ्यानें आह्मांला आपलें संरक्षण करून घेतां येईल; परंतु आपल्या पुरश्चरण भूमीची काय अवस्था होणार ? मुंडकोटि, यावेळीं कांहीं तरी युक्ति काढली पाहिजे."

" युक्ति काय काढावयाची ? आपण आमली नेहमींची युक्ति करावी. येथून नाहींसें होऊन गांधारांत आश्रय घ्यावा. पुन: जरा स्थिरस्थावर झालं, कीं आले आपल्या पूर्वस्थलावर ? " मुंडकोटि त्यास शांतपणें म्हणाला.

कपालेश्वर:— ते खरें रे, पण प्रत्येक वेळी पळण्याची ही युक्ति कसली ? माझी तर अशी इच्छा आहे, कीं गुरुजींनीं एकदां त्यांना आपला प्रभाव दाखवावाच. आपण पुढें सरसावून त्यांचीं राज्यें कांहीं घेत नाहीं पण आपल्याच जागेंतून आपल्याला हांकून लावण्याचा हा काय म्हणून त्यांचा जुलूम सोसायचा ?

मुंडकोटि त्यावर हंसून म्हणतो: " सोसायचाच नाहीं असा निश्चय नुसता करून जर तो टळत असेल तर कोण टाळं नये म्हणणार आहे ? पण आपल्याला काय शक्य आहे, आपल्यावर येणारीं सैन्येंचीं सैन्यें उध्वस्त करण्याचें शक्य असलें तर तसें करणें आपण काय सोडून देऊं. इतकी सिद्धि अजून प्राप्त झाली नाहीं; म्हणून ना इतका खटाटोप ? "

कपालेश्वर:— मुंडकोटि, तूं कांहीं म्हण, पण तूं आतांशा जरा चमत्का-रिक झाला आहेस. कांहींही म्हणायला गेलें तर उत्साहकारक भाषण तूं करीत नाहींस. उत्साहमारक भाषण करतोस. तूं—तुझ्यासारखा आमचा अगदीं आधारस्तंभ—अशा प्रकारें बोलूं लागलास म्हणजे मग आमच्यासा-रख्याच्या उत्साहाचा भंग होण्याला काय अवकाश लागणार आहे ? तूं असें बोलूं नयेस. "

" कपालेश्वरा ! " मुंडकोटि त्यास एकदम म्हणाला: " तूं म्हणतोस हें मलाही समजतें, परंतु वस्तुस्थिति आहे ती लपवून ठेवून भलतेंच कांहीं तरी बोलावयाचें हा न्याय कुठला ? म्हणून मी मला जें योग्य वाटतें, तें बोलतों. मी नुसतें उत्साहपूरक असें कांहीं बोललों तर उपयोग काय ? उलट घात होणार नाहीं ? "

कपालेश्वर त्यावर कांहीं बोलला नाहीं, मात्र म्लेंच्छ भाषेंत त्या दुसऱ्या गृहस्थास म्हणतो: " आमच्या या बोलण्यांतलें आपल्याला कांहीं समजलें नाहीं, हें उघडच आहे. आमच्यावर मोठें संकट आलें आहे, त्याचा विचार आह्मी करतों आहोंत. काय करावें कांहींच सुचत नाहीं. आणि संकट तर अगदीं जवळच येऊन ठेपलें आहे " " काय, काय तें संकट ? " रोषनवलीनें उत्कंठेनें विचारलें. " आमच्या हातून कांहीं मदत झाली तर आह्मी करूं. "

" नाहीं. आजमित्तीस आपल्या हातून कांहीं होणें शक्य नाहीं. " इतक्यांत मुंडकोटि मध्येंच म्हणतो: " कपालेश्वरा, तूं तरी त्या राजांना विनाकारण इतका कां चिडवतोस ? त्यांची बायको,—मुलगी—आणखी राज्याचा भावि वारस ह्यांस जर तूं इकडे आपल्याकडे अडकवून ठेविलें आहेस तर त्यांनीं त्यांना सोडवायला येऊं नये ? शहाणपणाचा मार्ग ह्मटला म्हणजे हा, कीं तूं आपला मुकाट्यानें विमलेला आणखी जयचंद्राला वैतर्णीच्या तीरावर नेऊन सोड, जाऊं दे. त्यांना आतां आपल्या मंत्रसामर्थ्याची गोडी लागली आहे. आज नाहीं उद्यां हा जयचंद्र अजमीरच्या राज्यावर बसणार, मग तो आपला झाला. "

" मुंडकोटि, " कपालेश्वर एकदम ओरडून म्हणाला: " तूं आतां भलभलतें कांहीं तरी काढूं नकोस. या विमलेला मी आतां सोडून देईन ? तिला विधवा करून तिच्या हातून......पण त्या गोष्टी तुला आतांच कशाला सांगूं ? बरें जर यदाकदाचित् आमच्या इच्छेप्रमाणें झालें नाहीं, तरी हिला मी त्या विजयपाळाच्या किंवा अनंगपाळाच्या हातीं जाऊं देणार नाहीं. या रोषनवलीच्या हातीं देऊन म्लेंच्छ राजाकडे पाठवून देईन. तिचा तसा नाश करीन. देवीला नाहीं तर दैत्यांच्या राजाला वाहीन पण..."

तें त्याचें अत्यंत निष्ठुरपणाचें भाषण ऐकून मुंडकोटि फार विलक्षण प्रकारें त्याच्याकडे पाहूं लागला. हा आपल्या समोर बोलतो आहे हा कपालेश्वरच काय ? असा त्याला संशय वाटला असावा असें दिसलें. त्याच्या

कपाळास आपोआप आंठ्या चढल्या, परंतु त्यानें आपलें हृद्गत बाहेर न दाखविण्याचा प्रयत्न करून तो त्यास म्हणतो: “ कपालेश्वरा, तुझ्या मनांत असले विचार येत असतील हें संभवनीयच नव्हे. ”

इतकें कपालेश्वरास उद्देशून म्हणून तो त्या रोषनवलीकडे वळून म्लेंच्छ भाषेंत म्हणतो: “ कांहीं माणसें अशीं असतात, कीं दुसऱ्यांना भेवडाविण्यासाठीं उगीच वाटेल तें वेडेंवांकडें बोलतात. तीं स्वभावतः मनानें चांगलीं असून उगीच आपण वाईट आहोंत असें दाखविण्यांतच त्यांना मोठेपणा वाटतो. आमचे कपालेश्वर त्यांपैकीं आहेत. आतां हे बोलले त्यांतलें एक शतांशसुद्धां त्यांच्या मनांत नाहीं. परंतु उगीच बोलून टाकलें झालें ! ”

रोषनवली तें ऐकून कांहीं बोलला नाहीं. त्यानें नुसती मान हलविली. कपालेश्वराच्या मनांत त्यावर कांहीं बोलावें असें आलेलें दिसलें, त्याचे ओंठ बोलण्यासाठीं कांहीं तरी हलले,परंतु पुनः कांहीं बोलूं नये ह्मणून मनांत येऊन त्यानें ते शब्द मागें ओढले असावे. तो थोडा वेळ गप्प बसला. नंतर त्यानें मुंडकोटीस म्हटलें: “ मुंडकोटि, रोषनवलीबरोबर मला कांहीं एकांतांत बोलायचें आहे. तूं थोडा दुसरीकडे गेलास—गुरुजींकडे गेलास तर त्यांना तेवढें समाधान होईल, करितां तिकडेच चार घटका जा. आम्ही काय बोलतों तें तुला ऐकायला हरकत नाहीं. पण तुला कांहीं त्यांत समजायचें नाहीं. त्यांच्या मंत्रविद्येची आणखी आमच्या मंत्रविद्येची तुलना करावयाची आहे. तुझी सिद्धि अजून त्या पायरीपर्यंत गेली नाहीं. म्हणून म्हणतों, घटकाभर आह्मांला दोघांना एकटेंच असूं दे, हा अष्टांगवक्र आहे याला घेऊन जा वाटेल तिकडे. चार घटकांनीं ये. मग मला तुझ्याशींहि पुष्कळसें बोलायचें आहे. कांहीं कांहीं गोष्टी तुला सांगितल्याच पाहिजेत. पण त्या मग......” मुंडकोटीनें आपली मान हलविली आणि थोड्या मर्मभेदी खोंचीनें अष्टांगवक्रास ह्मणतो: “ अष्टांगवक्रा, तूं पूर्ण वेडा आणि मी अर्धा वेडा, आपल्याला कांहीं समजत नाहीं. आपली विद्या यांच्या इतकी झाली नाहीं. ह्यांची आपण बरोबरी करून यांच्यांत कशाला लुडबुडावें. तुझें आमचें चांगलें जमेल, तूं मज बरोबर चल. आपण वाटेल तिकडे जाऊं...”

असें ह्मणून त्यानें अष्टांगवक्राला ओढलें. तोहि बिचारा त्याच्याबरोबर गेला.

ते दोघे गेले असें पाहून कपालेश्वर आपल्या यवन मित्रास त्याच्या त्या म्लेंच्छ भाषेंत म्हणतो: “ आपला व माझा पूर्वपरिचय होता असें आपण मुंडकोटीला कळविलें कीं काय ? ”

" छे, मुळींच नाहीं. पण तो मोठा तीक्ष्ण दृष्टि आहे. तर्क करून त्यानें जाणलें तर सांगवत नाहीं. "

" छे. छे तर्कबिर्क कसला करतो; परंतु त्याला कळूं नये याचें कारण, कीं तो अजून माझ्या मताप्रमाणें पूर्णपणें चालण्यासारखा झालेला नाहीं, दुसरें कांहीं नाहीं. बाकी तो विश्वासांत घेण्याजोगा आहे. विश्वास टाकला तर त्याचा दुरुपयोग करायचा नाहीं, तें सगळें ठीक आहे. पण मला आपण आधीं असें सांगा कीं.. ... "

" तें सांगण्यापूर्वीं मला तुम्हांला कांहीं विचारायचें आहे. ही स्त्री कोण आणि कोणत्या राजाची तें मला सांगा. "

रोषनवलीचें तें भाषण ऐकतांच कपालेश्वर थोडा चपापून त्याच्याकडे पाहूं लागला. क्षण दोन क्षण याप्रमाणें पाहिल्यावर त्यास म्हणतो, " कोणती स्त्री म्हणतां ? "

रोषनवली शांतपणें त्यास म्हणतो: " कोणती स्त्री म्हणजे ? तुम्ही ज्या स्त्रीविषयीं आतां बोलत होतां ती. "

" बोलत होतों ? आह्मी कधीं कोण्या स्त्रीबद्दल बोलत होतों बोआ ? मला तर कांहीं आठवत नाहीं कोण्या स्त्रीबद्दल विशेष बोलल्याचें. स्त्रीबद्दल ? कोणी स्त्री आमच्या देवीसाठीं...... "

" मी म्लेंच्छ खरा; परंतु मला इकडली आपली भाषा समजते, अगदींच कांहीं समजत नाहीं असें नाहीं. तेव्हां तसें सोंग कांहीं तुम्हीं करूं नका. कोणाबद्दल बोलत होतां तें मला माहितीही आहे. ज्या स्त्रीच्या बरोबर तुम्ही दोन राक्षस देऊन जिला थोड्या वेळापूर्वीं गुहेंत नेऊन कोंडलें आहे ती कोण—कोणाची—तेवढी माहिती मला सांगा. उगीच लपवालपवी—आपल्या एकमेकांत लपवालपवी कशाला ? बोलाच आतां. "

" ती स्त्री ? ती आपण केव्हां पाहिली आणखी तिला गुहेंत नेऊन कोंडली हें तरी तुम्हांला काय ठाऊक ? "

" माझ्या नेत्रांनीं पाहिली आणि तिच्याबद्दल कानांनीं ऐकलें म्हणून मला ठाऊक, नाहीं तर कशाला ठाऊक झालें असतें ? "

" नेत्रांनीं पाहिली ? आपण नेत्रांनीं पाहिली म्हणतां, तेव्हां......"

" तेव्हां काय ? मीं या नेत्रांनीं पाहिली आणखी ती कोण काय वगैरे हकीकतही अनायासें ऐकून मला ठाऊक झाली आहे. पण आपण माझ्यावर

इतका विश्वास आहे म्हणतां तर तो कितपत आहे हें तरी आपण पाहूं म्हणून विचारतों. ”

“ अं: अशी परीक्षा देत नाहीं आपण बोआ. एखादी स्त्री आपण पाहिलीन् ती कोण म्हणून आपण विचारलें असतांना आम्हीं सांगितलें नाहीं म्हणजे काय विश्वास गेला ? मग विश्वासाची तऱ्हाच कांहीं—”

“ आपण जरी तो दिसूं दिला नाहीं, तर आम्ही जास्तच कसून त्याची परीक्षा करूं. त्या परीक्षेला आपण उतरलां नाहीं, तर बादशहापर्यंत आपली भेट करविण्याच्या भानगडींत आम्ही पडतों कशाला, आणखी शिफारस करतों कशाला ! तें कांहीं नाहीं. मी विचारतों तें आपण सांगितलें पाहिजे. ”

“ बरं आहे. आह्मी सांगतों. ही अजमीरच्या राजाची राणी आहे. हिचें नांव देवी विमला आहे. ही माझी शिष्या आहे. हिला येऊन थोडे दिवस झाले तोंच ती जाण्याची धांदल करूं लागली. देवीला तिच्या हातची सेवा घडावी, आमच्या सर्व कार्यांत आम्हांला इच्छित फलप्राप्ति व्हावी म्हणून आम्हीं तिला जाऊं देत नाहीं. ती कदाचित् डोळा चुकवून जाईल म्हणून तिच्यावर नजर ठेवण्याला त्या दोघां धटिंगणांला सांगितलें आहे. दुसरें काय ?”

“ बरें, पण तिला यवनबादशहाकडे पाठविण्याचा धाक घातलात तो कसा काय ? वेळ प्रसंग पडला, तर तो तुम्ही खरा करणार काय ? या तुमच्या एका कृत्यानें आमचा बादशहा जितका खुष होईल तितका तुमच्या दुसऱ्या हजारों गोष्टींनीं होणार नाहीं. ”

कपालेश्वरानें कपाळास एकदम आंठ्या घातल्या आणि तो रोषनवलीकडे पाहूं लागला. रोषनवलीनें त्याच्या आंठ्यांकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. तो आपला त्यास पुढें म्हणाला: “ मी म्हणतों हें उगीच कांहीं तरी म्हणत नाहीं. आपण त्याचा विचार करा. ”

“ वलीसाहेब, आपण हें काय बोलतां हें ? आम्ही आपल्या देवीला संतुष्ट करण्यासाठीं जी सामग्री जमा करतों ती काय यवन बादशहाला देण्याविषयीं आपण मला बुद्धि शिकवितां ? ”

कपालेश्वराचें हें भाषण ऐकून रोषनवली हंसला व त्यास म्हणतो: “ तुमची दगडांधोंड्याची देवी अशा बलीनें आणि सामग्रीनें संतुष्ट

होईल न होईल तें तुमचें तुम्हांला ठाऊक. पण आमचा मानवी बादशहा अशा बळीनें खचित संतुष्ट होईल, आणि तुमच्या इच्छा तावडतोब पूर्ण करील. आतांपर्यंत तुम्हांला जें वाटतें आहे तें सर्व साधायचें असेल तर तें या एका उपायानें साधणार आहे. कपालेश्वरा, तुझी ती राणी काय खुप-सुरत आहे म्हणतोस ! ही संधि तूं व्यर्थ दवडूं नकोस, माझें तुला सांगणें आहे. ”

“ वलीसाहेब ” कपालेश्वर एकदम त्यास म्हणतो, “ वलीसाहेब, हें तुम्ही म्हणतां तरी काय ! आपलें हें बोलणें क्षणभर तरी ऐकेन काय ? भलतेंच कांहीं बोलूं नका. आपल्याला आमच्या उपासनेंत शिरणें आहे, तर ती उपासना आपल्या दृष्टीस पाडावी अशी योजना केली, आपल्याला आमचे मंत्र सांगतों म्हणून कबूल केलें. एवढ्यावरून तुम्ही काय म्हणाल तें सगळें होय म्हणेन अशी तुमची कल्पना झाली काय ? आतां कृपा करा आणि हें बोलणें सोडून द्या, ती स्त्री विधवा होऊन या आमच्या कर्म-भूमीची अधिष्ठात्री होणार आहे. आज ती शोक करते आहे, परंतु उद्यां तिला एकदां येथले सर्व अष्टाधिकार प्राप्त झाले म्हणजे मग तीच .....”

“ येथल्या अष्टाधिकारापेक्षां आमच्या सुलतानाचे अष्टाधिकार तिला जास्त आवडतील. तेव्हां तुम्ही आपल्या या कामासाठीं दुसरी एखादी तरुण विधवा पहा, पण मी म्हणतों या कारणाकरितां तुझे हे दोंघे भिल्ल माझ्या-बरोबर देऊन तिला माझ्या स्वाधीन कर म्हणजे मी तिला घेऊन जातों. तूं पाठविलेली ही नजर म्हणून आमच्या बादशहास देतों. आणि तूं ज्या कार्याबद्दल विनवणी केलीस तें कार्य आतां त्वरित केलें पाहिजे म्हणून बाद-शहाला आग्रह करतों. तूं त्याची काळजी करूं नको. ”

त्यावर कपालेश्वर कांहीं बोलला नाहीं. रोषनवली त्याच्याकडे अगदीं आतुरतेनें पहात राहिला. पुढें कांहीं बोलला मात्र नाहीं.

कपालेश्वर व तो याप्रमाणें एकमेकांकडे बराच वेळ पहात राहिल्यानंतर कपालेश्वर हलकेंच हंसून रोषनवलीस म्हणतो: “ वलीसाहेब, आपण बराच माझा विनोद केलात. मला वेड्याला तें सारें खरेंच वाटलें. आतां आपण पुनः एकदां गुरुजींकडे जाऊं या. आपल्या इच्छेप्रमाणें गुरुमहाराज आप-ल्यास आमच्या उपासनामार्गीं घेतील कीं नाहीं त्याचा पक्का कयास काढूं. त्यांतला खरा प्रकार वलीसाहेब असा आहे कीं गुरुमहाराज भोळे आहेत. पण माझ्यासारखे जे दुसरे भोळे शिष्य आहेत त्यांना हा विचार कसासाच

वाटणार. ते त्यांना हो म्हणूं देणार नाहींत. म्हणून त्यांचें मन वळविणें मोठें अडचणीचें आहे पण अगत्याचेंही आहे. त्यांनीं नुसतें हो म्हटलें म्हणजे झालें. म्लेंच्छांचें प्रेत जर साधनाला चालतें, तर म्लेंच्छ साधन करून घेण्याला कां चालूं नये. आणखी त्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं कीं आपल्याला पुढें काय साधावयाचें आहे. ''

रोषनवलीचें चित्त आतां त्याच्याकडे नव्हतें. त्याचें चित्त दुसरीकडेच असावें असें स्पष्ट दिसलें. परंतु आपलें चित्त दुसरीकडे आहे असें कपाले-श्वरास वाटूं नये म्हणूनच कीं काय, तो त्यास पुढें म्हणतोः " ठीक आहे. आपण आणखी आपले गुरु काय करणार तें करा, मग आमचें काय आहे तें...'' परंतु तें वाक्य त्यानें अर्धवटच सोडून म्हटलें: "चला तर मग आपल्या गुरुजींकडे. आमच्या बादशहानें सांगितलें आहे त्याप्रमाणें आपण काय काय करतां तें तरी पाहूं. आपल्याला जें योग्य वाटेल तेंच करा. मला जो अगदीं सोपा मार्ग आपला सुचला तो मी आपणांस कळविला. दुसरें काय ? ''

असें म्हणून ते दोघे पुनः अघोरघंटाच्या गुहेंत गेले. अघोरघंट अजून आपला नेहमींप्रमाणें बसला होता. कपालेश्वरास पहाण्याबरोबर मात्र त्यास म्हणाला: " कपालेश्वरा, या पोराची आई कोठें आहे ? हा तिच्याकरितां मघांपासून अगदीं सैरावैरा धांवतो आहे. सगळ्या तपोवनभर हिंडून आलों म्हणाला पण तिचा पत्ता लागला नाहीं. तूं तिला कोठें तरी घेऊन गेलास आणखी......''

परंतु कपालेश्वर मध्येंच घाबरलेला आवाज काढून ह्मणतो: " गुरुजी, आपण या पोराच्या आणखी त्या मूर्खेच्याबद्दल कसला विचार करतां ? आपल्यावर आलेल्या संकटाचा विचार करा. आधीं राजा अनंगपाळ आणखी या पोरट्याचा बाप आपल्यावर चाल करून आपली तपोभूमि उध्वस्त करा-यला सिद्ध झाले आहेत. इतकेंच नव्हे, तर जवळ आले आहेत याचा विचार करा. या पोराची आई आणखी हा पोरगा हीं इथें आलीं म्हणून तर हा प्रसंग आतां आपल्यावर ओढवला आहे. ''

"अरे, असें असेल तर यांना वैतरणीच्या पार त्या धौम्याच्या आश्रमाजवळ सोडून दे म्हणजे झालें. त्यांना कसें कळलें हीं इकडे आलीं आहेत म्हणून. बरें, आलीं तर आलीं. त्यांचीं त्यांच्याकडे पोंचतीं केलीं तर ते जातील परत. आण, त्या बिमलेला मजकडे आण, मी तिला आणखी याला दोघांनाही प्रसाद देऊन लावून देतों. ''

" वाहवा ! गुरुमहाराज, काय हा आपला विचार. अहो आतांपर्यंत सगळं ठीक होतं, त्या विमलेला आपल्या तपोभूमीची कांहीसुद्धां माहिती नव्हती, परंतु आतां तसें नाहीं. ती फार चाणाक्ष; तिनं आपली पूर्ण माहितीं मिळवून घेतली आहे. जर का तिच्या मनांत आलं, जर का तिच्या नवऱ्यानं तिचं मन वळवलं, तर आपलीं पाळंमुळं खणून काढायला ती आयतीच कुदळ त्याला उपयोगी पडेल ना ? महाराज, ती मंडळी येण्याच्या आधीं आपण आतां आपलं चाललेलें सत्र पुरें करा, आणखी या विमलेचा बळी द्या. चंडिकामाता संतुष्ट होईल, आणि आपलं कार्य सिद्ध करील. आतां आपल्याला दुसरा मार्ग नाहीं. राजाची पट्टाभिषिक्त पत्नी आजपर्यंत कधीं कोणाही सिद्धानं बळी देऊन माता भवानी संतुष्ट केली नसेल. तें आज आपल्याला अनायासं साध्य होणार आहे. "

अघोरघंट अगदीं स्वस्थ बसला. त्यास यावर काय बोलावं तें सुचलें नसावें असें दिसतें, परंतु बराच वेळ अगदीं मूकपणांत गेल्यावर तो एकदम म्हणाला: " कपालेश्वरा, आपली शिष्या ही विमला आणखी हिचा बळी द्यावा म्हणतोस ? "

" गुरुमहाराज, तिचा पति आपल्या हातीं सांपडून त्याचा बळी देऊन जर चंडिकामातेचा संतोष करावयास सांपडला तर फारच चांगलें होईल. परंतु तसा आपल्याला प्रसंग सावेल असें वाटत नाहीं. विमला अनुकूल झाली असती तर तें शक्य होतें. तिच्याकडून त्याला मायापाशानें ओढून येथें आणलें असतें; आणि दुसरे पाश त्याच्या गळ्याला आवळून त्याचें मुंड चंडिकेला वाहिलें असतं. ती विधवा होऊन येथें साधन करीत व आमच्या कर्माला यथासांगत्व देत रहाती. या पोराला आपण राज्यावर नेऊन बसविलें असतें. सर्व कांहीं यथास्थित झालें असतें. परंतु तिचें चित्त तसें दिसत नाहीं. येथून निघून आपल्या पतीकडे केव्हां जाईन असें तिला झालें आहे. ती आपल्या म्हणण्याप्रमाणें कसलें काय करणार ? अर्थात् आतां राहिलेला काय तो एकच मार्ग आपल्याला स्वीकारला पाहिजे. तो हाच कीं, तिचाच बळी देऊन या पोराला ताब्यांत ठेवायचा. जास्त गडबड करशील तर तुझ्या बायकोचा बळी दिला तशी या पोराची व्यवस्था लावूं असा धाक त्याला घालायचा दुसरें काय ? म्हणजे तो फार गडबड करणार नाहीं. महाराज, मी म्हणतों यांत फार अर्थ आहे. तो अर्थ आपण ध्यानीं घ्या. दुसरें कांहीं नाहीं. माझ्या म्हणण्याप्रमाणें आपण करा...... "

परतु अघोरघंट त्यास मध्येंच म्हणाला: " अरे, सारे आम्ही करतों तें तुझ्याच म्हणण्याप्रमाणें करतों. परंतु या पोराची मला फार कींव येते. याच्या देखतें असल्या गोष्टी बोलूं नकोस. आणखी त्याची आई त्याला भेटव. "

" त्याची आई ? त्याला भेटायला मी काय आड येतों आहें ? कोठें असेल तेथें माणसें पाठवून बोलावून आणा आणखी भेटूं द्या. "

" तूंच कोठें तरी तिला अडकावून ठेवलें आहेस असें मला सगळीं सांगतात म्हणून मी तुला सांगतों. "

" मी ? मी ? आपल्या आज्ञेवांचून कधींच कोणती गोष्ट करीत नाहीं. आपण म्हणत असाल तर माणसें पाठवून तिला शोधशा. तिला येथें बोलवा. आणखी वैतरणीपलीकडे पाठवून द्या. त्यांच्याबरोबर मलाही बंदीवान म्हणून पाठवा. म्हणजे मला शासन करायला आजपर्यंत ते टपले आहेत, ते त्यांचें आयतेंच काम होईल. आपल्यावरही त्यांची मर्जी सुप्रसन्न होईल. वावगें काय त्यांत ? "

" असें वेड्यासारखें बोलूं नकोस ? या दोघांना जर पाठवून दिलें तर आपल्यावर संकट ओढवणार नाहीं. पाठवून दिलें नाहीं तर संकट ओढवेल अशी माझी समजूत आहे...... "

" आपल्या समजुतीप्रमाणेंच जर आम्हीं आजपर्यंत सर्व चालविलें असतें तर आपलीं व माझीं हाडें सुद्धां औषधाला सांपडलीं नसतीं. आपली समजूत ती आहे तरी काय ? "

कपालेश्वर अत्यंत रौद्रपणें बोलूं लागला.

---

## प्रकरण १४ वें

[ कपालेश्वराचा आणि त्याच्या गुरूचा जंगी वाद झाला. पण अघोरघंटानें आपलें म्हणणें सोडलें नाहीं. आणि त्यानें कपालेश्वराला मुळींच जुमानलें नाहीं. त्यामुळें संतापून त्यानें रोषनवलीस विमलेला घेऊन जाण्यास सांगितलें. कोणत्याही रीतीनें त्या उद्धट स्त्रीला हात दाखवायचा त्याचा निश्चय होता. वलीसाहेबांचा हर्ष गगनांत माईना. विमलेला कसकशी न्यावयाची याविषयीं त्याचे बेत चालले असतां त्याच्या शेजारच्या एका झाडावर एक माणूस छपून बसून त्यांचें भाषण ऐकत होता, पुरेशी माहिती मिळतांच तो मनुष्य हळूच खालीं उतरून तेथून चालता झाला. इतक्यांत कपालेश्वरास विमलेला ताबडतोब घेऊन येण्याविषयीं अघोरघंटाचें बोलावणें आलें. त्यानें तो आणखी चिडला. आणि त्यानें त्या निरोप घेऊन येणाऱ्या शिष्यालाच गुरूविरुद्ध चिथविण्यास आरंभ केला. सारे शिष्य अनुकूल करून गुरूला पदच्युत करावयाचा त्याचा विचार होता, आणि त्या मार्गाला तो लागला. ]

### विमलेचें धाडस.

किती झालें तरी विमला राजकन्या, राजपत्नी व राजमाता होती. प्रथम संकट येतांक्षणींच ती जरी भांबावून गेली तरी थोड्याच वेळांत या संकटांतून निसटून जाण्यास आपण काय योजना केल्या पाहिजेत या विचारास ती लागली. आपण आतां बंदींत पडलों, आतां या बंदींतून सुटण्यास उपाय चारः पहिला उपाय कपालेश्वराच्या मर्जीप्रमाणें वागावयाचें हा. दुसरा उपाय त्याला फसवावयाचें हा. तिसरा उपाय आपल्याला मदत करण्याला कोणाला तरी अनुकूल करून घ्यावयाचें हा आणि चवथा उपाय कपालेश्वराचें व ज्याचें बरें नाहीं असा कोणी गांठून त्याला आपल्याला अनुकूल करून घ्यावयाचें हा. यांपैकीं चारही अगर जो कोणता साधेल तो उपाय करून पहावयाचा, असा तिचा विचार झाला. कपालेश्वर आतां आपल्या अहितावर उठला. आतां तो आपल्या शब्दावर

मुळींच भरंवसा ठेवणार नाहीं, आपण सांगाल त्याप्रमाणें अक्षरशः वागेन असें म्हटलें तर आतां त्याला तें खरें वाटावयाचें नाहीं. हें ती जाणून होती. तेव्हां आतां त्याला फसविण्याचा विचार मनांतच आणूं नये हें चांगलें. त्याच्या मर्जीप्रमाणें वागणें हा विचारच इतका भयंकर होता, कीं तो मनांत येण्याबरोबर तिनें दुसऱ्याक्षणींच दूर सारला. तिसरा उपाय त्या ठिकाणच्या कोणा तरी सुस्वभावी माणसास आपल्या स्वतःबद्दलची दया उपजवून त्याची मदत मागणें; परंतु हेंही फारसें सुसाध्य असें तिला वाटलें नाहीं. प्रत्यक्ष गुरुमहाराज, हे तर कपालेश्वराच्या ओंजळीनें पाणी पिणारे, यामुळें त्यांचेकडे गेलें असतां आपल्यास कांहीं फायदा होईल ही आशा करणें अगदीं वेडगळपणाचें होणार आहे. हें जाणून तिनें खुद्द गुरुमहाराजांच्या अनुकूलतेविषयीं तर विचार सोडून दिला. पुढें आणखी विचार म्हटला म्हणजे अष्टांगवक्र किंवा ते भिल्ल आपणास अनुकूल होतील तर पहावयाचें. अष्टांगवक्राविषयीं तिला विशेषशी आशा दिसेना. तो कपालेश्वराचा पूर्ण दास बनला असावा असें स्पष्ट दिसलें. केवळ आपलें शरीरच नव्हे, तर आपलें मनही त्यानें त्याच्या स्वाधीन केलें, त्याला वाहिलें असें स्पष्ट दिसत होतें. कांहीं दास असे असतात, कीं आपल्या धन्याबद्दल त्यांच्या मनांत कितीही प्रेमहीनता असली तरी पण केवळ प्रसंग पडला, कीं त्याच्या आज्ञेनें जीव देण्याची पाळी आली तरीसुद्धां जीव द्यावयाचा. तो आपलें हित कधी पाहत नाहीं आपल्याकडून वाटेल ती सेवा मात्र करून घेतो असें जरी मनाला पक्कें वाटत असलें, तरी त्यानें आज्ञा केली, तो त्यांच्यासमोर उभा राहिला कीं त्यांची अप्रीति, त्यांचा द्वेष, त्यांचें धैर्य, हीं सर्व विलयाला जाऊन त्यांची आज्ञा पार पाडावयाची एवढेंच काय तें त्यांना दिसूं लागतें. हा दास गरीब खरा. मूर्खही असेल, परंतु त्याला आपल्या मालकाचा दुष्टपणा, कावेबाजपणा वगैरे समजत नसतात असें नाहीं. तीं त्याला चांगल्या प्रकारें समजत असतात. परंतु त्याच्या पुढें आपलें कांहीं चालावयाचें नाही, तो रागावला तर कोण्या वेळीं आपलें काय करील याचा नेम नाहीं. असें वाटून तो भेदरून जातो व यामुळें तो त्या मालकाच्या अत्यंत अंकित असतो. आपण आपल्या मालकाच्या तावडींतून पूर्णपणें सुटूं असें ज्या दिवशीं त्याच्या मनास वाटेल तेच दिवशीं कदाचित् तो त्याच्याविरुद्ध कांहीं करण्यास तयार व्हावयाचा.

अष्टांगवक्र हा अशाच प्रकारचा कपालेश्वराचा दास आहे असा विमलेस प्रत्यय आला होता. कपालेश्वराचे ठिकाणीं त्याची निष्ठा नव्हती, त्याचें प्रेम

नव्हतें, किंबहुना तो त्याचा अत्यंत द्वेष करीत असे; हें अगदीं उघड होतें. जसें एखादें कुत्रें केवळ नेहमीं खाव्या लागणाऱ्या मारामुळें आपल्या दुष्ट मालकास वश होऊन राहतें, त्याच्यापुढें जावयाचा प्रसंग आल्यास थरथर कांपतच जातें, त्याप्रमाणेंच अष्टांगवक्र आणि कपालेश्वर या दोघांचें असावें असें विमलेच्या निदर्शनास येऊन चुकलें होतें. अर्थातच अष्टांगवक्राकडून आपल्यास कोणत्याही प्रकारचें साहाय्य मिळेल, याबद्दल आशा धरण्यास तिला मुळींच जागा नव्हती. कपालेश्वर दुसऱ्या कोणाच्या तडाक्यांत सांपडून पेंचांत आला, त्याच्यावर मोठें थोरलें संकट आलें, आता यातून हा सुटत नाहीं यांत मरतोच अशी अष्टांगवक्राची जेव्हां खात्री होईल तेव्हा आजपर्यंतच्या आपल्यास भोगाव्या लागणाऱ्या सर्व यातनांचें उट्टें आपण काढूं असें मनांत योजून तो त्याचें मरण जितकें संकटमय होईल तितकें करण्यास कधींही चुकणार नाहीं; परंतु असें जोंपर्यंत झालें नाहीं तोंपर्यंत ना कपालेश्वराच्या विरुद्ध कधींही कांहींही करणार नाही. याकरिता आपणास ज्या कामीं साह्य पाहिजे त्या कामीं त्याचा कांहीं उपयोग होणार नाही. आपणास साह्य करणारा कपालेश्वराच्या बरोबरीचा माणूस पाहिजे. त्याखेरीज आपणास पाहिजे तें साह्य केव्हांही मिळणार नाहीं; परंतु अघोरघंटाच्या त्या कर्मभूमींत असलेल्या लोकांपैकीं एकाही माणसाबद्दल तिला खात्री वाटेना. एकामागून एक असे सर्व शिष्य एखाद्या चित्रांच्या रांगेप्रमाणें तिनें आपल्या डोळ्यांसमोरून घालविले. प्रत्येकाची तिनें जणूं काय अंतः-चक्षूनें परीक्षा केली. तिच्या साह्यास धांवेल असा तिला कोणी दिसला नाहीं. इतकेंच नव्हे तर, ते सर्व कपालेश्वराचे केवळ दास असल्याकारणानें आपण साह्य मागण्यास गेलों असें होतांच ते कपालेश्वराच्या कानीं घालण्यासाठीं सर्व तत्पर असावयाचेच. अशी स्थिति असल्यामुळें तिनें येथून सुटका होण्याबद्दल प्रयत्न करण्याची आशा सोडूनच दिली होती. तिच्यावर नजर ठेवण्यासाठीं गुहेवर बसलेले रौद्रमुख आणि वैकंकत हे दोघे जर अनुकूल होतील तरच आपली येथून गुप्तपणें सुटका होईल. परंतु या आडदांडांस आपले मनाप्रमाणें वळविण्यास काय युक्ति करावी हेंच तिला समजेना. ते लोक एकदां वळले तर आपल्यास त्यांच्यापासून पूर्ण सहाय्य मिळणार याबद्दल बिलकुल शंका नाहीं. परंतु ते वळावे कसे असा विचार करतां करतां तिला असें वाटलें कीं, कांहीं तरी याच मार्गानें युक्ति केली पाहिजे. तेव्हां आपण प्रयत्न तरी करून त्यांचें मन वळविलें पाहिजे. तिच्या मनाला एकदां असें वाटलें कीं, आपण एकवार त्या लोकांना आपल्या

जवळ बोलावून आणून त्यांची करुणा तर भाकावी. मग त्यांच्या अंतःकरणास द्रव आल्यास आपलें काम होईल. हे आडदांड लोक असेच असतात. त्यांना एखाद्याची दया आली कीं मग त्याचे प्राण वांचविण्यासाठीं आपले प्राणसुद्धां खर्ची घालण्यास कधीं कमी करणार नाहींत. परंतु आतां हा उपक्रम कसा करावयाचा ? त्यांचेजवळ आपलें बोलणें कसें आरंभावयाचें ? हा तिला मोठा विचार पडला. परंतु तिला आतां त्याच विचारात सोडून आपण दुसरीकडे जाऊं.

कपालेश्वराचा आणि त्याच्या गुरूचा जंगी वाद झाला. शेवटीं कपालेश्वरास असें सुद्धां वाटलें कीं, आपण आतां गुरुजींशीं बोलण्यांत कांहीं आपलें बळ व वेळ घालविण्यांत अर्थ नाहीं. त्यांना कोणीतरी चांगलेंच भेदरवून टाकलें असावें आणि म्हणूनच विमलेला जिकडच्या तिकडे पावती करून देण्याचा आग्रह आहे, तेव्हां आतां आपण खरा प्रकार काय आहे तो कळेपर्यंत असें करावें कीं आपण हो हो म्हणावें आणि आपल्याला काय करावयाचें तें करावें. विमलेला त्यानें धाक दाखविला होता कीं, तूं माझ्या हातून निसटतेस असें वाटलें तर मी तुला म्लेंच्छ राजाच्या ताब्यांत देण्यासही कधी कमी करणार नाहीं.

आपल्या गुरूनें म्हटल्याप्रमाणें जर विमलेला तिच्या पतीकडे व पित्याकडे पाठवून दिलें तर आपल्या धाकाची किंमत काय ? आपण म्हणजे एक शुद्ध बढाईखोर आहोंत असेंच तिला वाटावयाचें. आतांपर्यंत आमच्यापैकीं प्रत्येक व्यक्ति असें समजत आली कीं खरा गुरु मीच. अघोरघंट हा केवळ नामधारी होय. माझ्या मनांत जें येईल तेंच येथें घडावयाचें. अघोरघंटाच्या मनांत एक आणि माझ्या एक अशी स्थिति असली तर माझें तें खरें म्हणून सिद्धीस जावयाचें आणि त्याचें तें आपल्या जवळच तो गुंडाळून ठेवावयाचा; परंतु आज आपला सर्व भ्रम दूर झाला. अघोरघंट आपलेंच घेऊन बसला. मला त्यानें “ तूं वेडा आहेस, तुझें सगळ्याच बाबतींत मी ऐकतों, एवढ्यावरून तूं वाटेल तें करण्यास मला सांगितलें असतां मी निमुटपणें ऐकेन आणि त्याप्रमाणें करीन ही तुझी कल्पना तूं दूर राख. ”

हें अघोरघंटाचें निक्षून सांगणें कपालेश्वरास फार चमत्कारिक वाटलें. अघोरघंट आपल्यास कधीं अशा हेळसांडीनें किंबहुना अपमानानें वागवील हें त्यास कधींही शक्य वाटलें नाहीं. परंतु जें शक्य वाटलें नाहीं तें आतां

प्रतीतीस आलें. आतां आपण स्वीकारावयाचा मार्ग तो एवढाच कीं त्याच्या इच्छेप्रमाणें गोष्टी घडूं द्यावयाच्या नाहींत. विमलेला तिच्या मंडळीकडे तो कसा पाठविणार तें मी पाहतों. ही विमला आपल्याशीं फार उद्दामपणानें व तिरस्कारानें वागत आहे तर तिला एकवार आपला हात दाखविलाच पाहिजे.

कपालेश्वराच्या मनांत अशा प्रकारचे भयंकर विचार एकसारखे घोळत होते आणि त्या विचारांच्या भरांतच रोषनवलीकडे वळून त्यानें खूण करून त्यास अघोरघंटाच्या समोरून बाहेर नेलें. आपण काय करतों, शेवट याचा परिणाम काय होणार आहे, या गोष्टीविषयीं केवळ अंध झालेला तो कपालेश्वर रोषनवलीस अगदीं एकीकडे नेऊन एकदम म्हणाला, "वलीसाहेब, मघाशीं मी जी गोष्ट कदापि करणार नाहीं असें म्हटलें तीच गोष्ट करण्याचा इतका लवकर प्रसंग मजवर येईल ही कल्पनाहि मला नव्हती. वैकंकत आणि रौद्रमुख हे दोघेही माझे पूर्ण दास आहेत. अघोरघंटाहि त्यांतलाच. परंतु तो मूर्ख आहे. त्याला मागचा पुढचा पोंच नाहीं. तेव्हां त्याच्यावर माझा भरंवसा नाहीं. परंतु त्या दोघां आडदांडांवर वाटेल तसा भरंवसा टाकून वाटेल तें काम सोंपवावें. आपण मला मघाशीं म्हणालां होतां कीं, बादशहा शहाबुद्दीनासाठीं ही विमला तुमचे स्वाधीन करावी. आणि ती स्वाधीन केल्यास माझें काम होणार आहे. तुम्ही म्हणतां त्या गोष्टीवर मीं भरंवसा ठेवाना काय? ठेवावा असें तुमचें म्हणणें असल्यास आणि तशी तुम्ही माझी खातरजमा केल्यास मी त्या दुष्टेला तुमच्या स्वाधीन करतों. हे दोघे आडदांड गडी तुमचेबरोबर येतील. तिचेवर कांहींतरी मंत्र चालवून मी तिला बेशुद्ध करतों. सहा दिवसपर्यंत कांहीं केलें तरी ती शुद्धीवर येणार नाहीं. मजलदरमजल करून तुम्ही आपल्या प्रांतांत जाऊन पोंचलां म्हणजे तिचा पूर्ण ताबा आपलेकडे घ्या आणि माझे गडी मजकडे परत पाठवून द्या. त्या चांडाळणीचें तुम्ही आतां कांहीं केलें तरी त्याची मला पर्वा नाहीं. माझें कार्य—म्हणजे देवीचें कार्य—तिच्या हातून घडावें अशी माझी उत्कट इच्छा होती, परंतु ती इच्छा तृप्त होत नाहीं हें आतां ठरलें. तर मग तुमची तरी इच्छा मी कां तृप्त करूं नये ? जा. आज तिला आतां तुम्ही घेऊन जा आणि कपालेश्वर म्हणेल तें खरें केल्याखेरीज कधींही रहाणार नाहीं, हें तिला एकदां पक्कें कळूं द्या."

इतकें बोलून कपालेश्वर आपलें अत्यंतविकट असें गर्दभहास्य करून रोषनवलीकडे पाहूं लागला.

कपालेश्वर आपल्या मतें रोषनवलीशीं अगदीं गुप्तपणेंच वरील कारस्थान करीत होता. त्याला असें स्पष्ट दिसून चुकलें होतें कीं, आपलें आतां कांहीं चालणार नाहीं. आपला गुरु अघोरघंट हा घाबरला आहे. या घाबरल्या स्थितींत त्याला धाडसाचें काम कधींही होणार नाहीं. तो आतां विमलेला व तिच्या पोराला तिच्या नवऱ्याकडे पाठविणार आणि आपला बचाव करून घेणार. त्याच्या मनाला ती गोष्ट यत्किंचितही आवडली नाहीं. तो अघोरघंटाला एक वार इतकेंसुद्धां म्हणाला, कीं आपण असा अधीरपणा करूं नका. ही राजपत्नी व राजपुत्र आपल्या तावडींत सांपडलीं आहेत तर त्यांस आतां आपण देवीला बळी देऊन टाकण्याचें भय विजयपाळ आणि त्याचा सासरा, दोघांसही घालून उलट आपलें यांनीं ऐकावें असें करूं. परंतु अघोरघंट पाय धरीना. तो म्हणे पहिली गोष्ट या दोघांना त्यांच्याकडे पाठवून देऊन त्यांना असें विनवावयाचें कीं मी गरीब माणूस आपल्या धर्मक्रिया करीत असतों. त्या मला आपण क्लेश कां देतां ? मला सोडून द्या. आपलीं माणसें माझ्याकडे आलीं आहेत तीं परत पाठविल्यावर मला आपण कां छळावें ? असें त्यांस ह्मणावें. आतांपर्यंत अघोरघंट म्हणजे आपल्या ताटाखालचें मांजर अशी कपालेश्वराची समजूत होती, आणि तीच समजूत इतर सर्व शिष्य मंडळीची होती. परंतु आज कपालेश्वराच्या दृष्टीवरील भ्रांतिपटल थोडेंबहुत दूर झालें. त्याला असें पक्कें दिसून आलें, कीं अघोरघंटाला कोणी तरी दुसराच गुरु भेटला आहे. अघोरघंट आतां आपलें ऐकत नाहीं, असें त्याच्या मनांत येतांच निव्वळ सूड उगविण्याच्या हेतूनें त्यानें विमलेस वर सुचविल्याप्रमाणें रोषनवलीच्या स्वाधीन करण्याचें ठरवून रोषनवलीशीं भाषण केलें.

तें भाषण ऐकतांच रोषनवलीस फार आनंद झाला. विमलेस त्यानें प्रथम पाहिलें तेव्हांपासूनच त्याच्या मनाची चलबिचल झाली होती—नव्हे त्याला एक प्रकारच्या वेडानें पछाडलें असें म्हटलें तरी चालेल. कांहीं तरी करून कपालेश्वरापासून ही मुलगी आपल्या ताब्यांत घ्यावयाची असें त्यानें मनांत योजिलें होतें; परंतु ती गोष्ट सरळपणानें त्यानें कपालेश्वराजवळ काढली तेव्हां त्याच्या भाषणाचा त्यानें राग दाखविला आणि आतां एकदम आपण होऊन तो त्या सुंदर स्त्रीस आपल्या स्वाधीन करतो तेव्हां यांतलें इंगित काय तें त्यास समजेना. तथापि इंगित समजून आपल्याला काय करावयाचें आहे ? आपला हेतु तडीस गेल्याशीं

कारण. असा विचार करून त्यानेंही त्यास म्हटलें: “ कपालेश्वरा, मीं हीच गोष्ट प्रथम तुझ्याजवळ काढली, तेव्हां तुला जरी रुचली नाहीं तरी शेवटीं तुला योग्य बुद्धि झाली हें पाहून मला फार आनंद झाला. आतां तुला मी आमच्या विद्येंत पारंगत करीन; आणखी दुसरीही तुझी इच्छा पूर्ण होईल याबद्दल तुला मुळींच शंका नको समजलास ? आतां हिला माझ्या स्वाधीन कशी काय करणार तेवढें मला सांग म्हणजे झालें. ”

“ अंः, त्यांत काय आहे ? ” कपालेश्वर आढ्यतेनं म्हणालाः “ तुम्हांला त्याची काळजी नको. रौद्रमुख आणखी वैकंकत हे दोघे म्हणजे माझे अगदीं अंध दास आहेत. त्यांना आपले प्राण माझ्यापुढें काढून ठेवा म्हणून सांगितलें तरी ते तितकें करण्याला मागें म्हणून घ्यावयाचे नाहींत असे ते आहेत. त्यांच्याकडून मी तिला भूल देववून उचलून नेऊन तुमच्या बरोबर तुमच्या हद्दीपर्यंत पावती करवितों. तेथून पुढें तुम्ही तिला घेऊन चला, दुसरा कांहीं मार्ग नाहीं. मला आतां एवढ्याच कामीं खर्च करायला वेळ नाहीं. करितां तुम्ही तांतडी करा. गुरुजी आपल्याला अनुकूल होतील अशी माझी समजूत होती. परंतु गुरुजी उलट माझ्या मार्गांत अडथळेच आणणार आहेत. तेव्हां आतां त्यांनाच मला बंदींत टाकून आपलें काय तें करण्याची पाळी आली आहे. हे सारे शिष्य माझ्या तंत्रानें चालण्यास अनुकूल झाले, तर मी आतां गुरुजींस विमलेच्या जागीं गुहेंत घालून ठेवून या दोघां चौघां राजांची खोडकी मोडण्यास सिद्ध होईन. पण ही मंडळीच जर मला अनुकूल झाली नाहीं तर मला काय करणें शक्य आहे. मग मी...मग मी. ....”

पुढें त्याच्या मनांत काय बोलावयाचें होतें, तें त्यानें तितकेंच ठेविलें आणि तो अगदीं स्तब्ध बसला.

वर एकवार म्हटलेंच आहे कीं, कपालेश्वरास असें वाटत होतें कीं आपलें हें सारें बोलणें गुप्त चाललें आहे. परंतु वस्तुस्थिति तशी नव्हती. तो ज्या झाडांजवळ उभा राहून हें सारें हितगुज करीत होता, त्या झाडांपासून सुमारें दहा पंधरा हातांच्या अंतरावर एक मोठा सांबरीचा वृक्ष होता. त्याच्या गर्द छायेंत एका मध्यम उंचीवरल्या फांदीवर एक माणूस बसला असून त्याच्या कानीं हीं सारीं भाषणें पडत होतीं. इतकेंच नव्हे तर तो तीं भाषणें ऐकण्याच्या बुद्धीनेंच तेथें बसला असावा असें त्याच्या चर्येवरून दिसत होतें. कपालेश्वर कांहीं बोलला आणि तें यानें ऐकलें म्हणजे हा आश्चर्य-

चकित मुद्रा करी किंवा धाक दाखविणारी मुद्रा करी. नंतर आपल्याशींच कांहीं पुटपुटे. हें त्याचें करणें अव्वलपासून अखेरपर्यंत चाललें होतें. विमलेला त्या मुसलमान वलीच्या ताब्यांत कसें काय द्यावयाचें याबद्दल त्यानें आपल्या मिशांवर ताव दिला. पुढें अघोरघंटास विमलेच्या जागीं बंदींत टाकून शिष्यांना बरोबर घेऊन राजाशीं झगडा करावयास जावयाच्याबद्दल यानें भाषण केलें. तेव्हां त्यानें अर्थपूर्ण अशाप्रकारें मान हलविली. सारांश त्याचें पूर्ण चित्त त्या दोघांच्या भाषणाकडे असून तो काय होतें, काय नाहीं हें जाणण्याविषयीं अत्यंत उत्कंठित दिसला.

रोषनवली व कपालेश्वर यांचें याप्रमाणें भाषण झाल्यानंतर तो त्या झाडापासून खालीं उतरण्याविषयीं फार उत्सुक दिसला. परंतु आपण असें एकदम उतरलों तर या गृहस्थांना आपण त्यांचें भाषण ऐकल्याची शंका येईल, तेव्हां आपण या झाडावरून त्या झाडावर अशा दोन चार झाडांवर उड्या मारून मग थोड्या अंतरावर उतरावें असा त्यानें बेत केला. पुढें पुढें आणखी कांहीं त्यांचीं भाषणें झालीं तरी विशेष काय होणार ? मुख्य ऐकावयाचें तें आपण ऐकलें. आतां आपल्याला काय करावयाचें तें करण्याच्या तयारीला लागावें असा त्याचा निश्चय झाला असावा असें दिसलें.

त्यानें लागलीच एखाद्या पटाईत वानराप्रमाणें या झाडावरून त्या झाडावर त्यावरून पलीकडच्या झाडावर अशा उड्या मारून या दोघांपासून बऱ्याच लांब अंतरावर प्रयाण केलें. कपालेश्वर आणि रोषनवलीनीं त्याच्या पहिल्या उडीस त्या झाडाच्या बाजूला पाहिलें परंतु त्यांस विशेष कांहीं दिसलें नाहीं. एखादा मोठा शाखामृग—हुप्या वानर—असेल, आणि तो या झाडावरून त्या झाडावर जात असेल असें त्यांनीं अनुमान केलें व तिकडे दुर्लक्ष करून पुढें काय भाषण करावयाचें होतें तें त्यांनीं केलें व शेवटीं बऱ्याच भाषणानंतर त्यांचें असें ठरलें कीं, रौद्रमुख व वैकंकठ यांनीं तिला कांहीं तरी भुलीचें औषध चारून गुंगींत पाडावी आणि उत्तररात्रीं तिला खांद्यावर टाकून रोषनवलीच्या बरोबर गांधार देशाकडे घेऊन जावें असें ठरलें.

त्यांचा तो विचार कायम ठरविण्याचीं भाषणें होऊन आतां ते एकमेकांपासून दूर होणार तों अघोरघंटापासून एक शिष्य कपालेश्वराची चौकशी करीत करीत तेथें आला, व त्यास एकदम म्हणतो: “ गुरुमहाराजांनीं आतांच्या आतां विमलेला व जयचंद्राला घेऊन बोलाविलें आहे ” असें सांगितलें. तें ऐकतांच कपालेश्वराचें डोकें भणभणल्याप्रमाणें झालें आणि

तो एकदम त्या माणसावर कडाडून म्हणाला: " जा. जा. ती चांडाळीण आणि तो कारटा कोठें असतील तेथें जाऊन त्यांना हुडकून घेऊन जा. मला ठाऊक नाहीं तीं कुठें आहेत तीं समजलास. गुरुजींना सांगा कीं, तुम्ही लोटांगण घालीत तेथपर्यंत जा त्या दोघांना बरोबर घेऊन. मूर्खांनों, तुम्हांला कांहींसुद्धां शरम वाटत नाहीं काय कीं आपण आपल्या हातानें आपल्या कर्माचा विच्छेद करून घेण्याला उद्युक्त झाला. असे बळी आपल्या हातांत आले असतां आपण हा केवढा प्रमाद करतों आहोंत, कीं यांना हातांतून दवडतों आहोंत. अरे गुरुजींनी स्वत: मला सांगितलें कीं हे बळी एकवार देवी करालेला मिळाले कीं, आपला सर्व कार्यभाग उरकला. आणखी आज तेच भेदरून जाऊन मला काय बोलतात ! चल जा. जर तुम्हांला सगळ्यांना आपला कार्यभाग करून घेऊन पूर्णसिद्धि मिळवावयाची असली तर या वेळीं गुरुजींची क्षिति बाळगूं नका. आणि आपल्यापैकींच कोणाला तरी पुढें करून कार्यभाग करून घ्या. समजलांत. असें तुम्ही केलेंत तरच तुमचा बोज राहील. तुमचें कल्याण होईल. सर्वांचें कल्याण होईल. नाहींतर विनाकारण गुरुजींच्या भित्रेपणामुळें आपल्या जिवाला मुकाल. "

आपण कोणाला आणि काय बोलतों आहोंत याचें भानच कपालेश्वरास त्यावेळीं राहिलें नाहीं असें दिसलें. तो वर दिलेलें बोलून जरा थांबला आणि एकदम त्याच शिष्यास म्हणतो: " अरे मूर्खा, तूं आतां गुरुजींकडे परत न जातां आपल्या सगळ्या दुसऱ्या शिष्यमंडळीकडे जा आणखी त्यांना एकत्र जमव. केवळ गुरुजींच्या भित्रेपणामुळें आपला केवढा घात होतो आहे, याचा विचार करा. असें मी त्यांना सांगणार आहें. राजा, राजपत्नी, राजपुत्र, इतके बळी देवी करालेला एके समयीं देण्याची संधि सांपडली असतां ती दवडावी हा मूर्खपणा नव्हे, तर त्याला काय म्हणावें ? तूं आतां मला हा गुरुजींचा निरोप सांगायला आला आहेस तर त्यांच्याकडे परत जाऊंच नको. मी सांगतों हीच कामगिरी कर म्हणजे ठीक होईल. आपल्या होमशाळेंत सगळ्यांना आतां जमव. मी पाठोपाठ येतों " असें म्हणून त्या शिष्यास एके बाजूला लावून दिलें आणि रोषनवलीस घेऊन कपालेश्वर स्वत: दुसरे बाजूस गेला.

---

# प्रकरण १५ वें.

[ विमला हातीं येणार याचा रोषनवलीस भारीच आनंद झाला. विमलेला अशी पाठविण्यांत कांहीं व्यत्यय येऊं नये, नव्हे तिनें स्वतःच मोठया खुषीनें आश्रमाबाहेर पडावें म्हणून कपालेश्वर तिच्याकडे गेला आणि अघोरघंट तुला मुसलमान बीरमंत्र्याला देणार आहे, तरी तूं माझ्या भिल्लांबरोबर एकदम एथून निघून जा, ते तुला तुझ्या नवऱ्याकडे पोंचावितील म्हणून नाना तऱ्हांनीं मोठ्या कळवळ्यानें सांगितलें. आपण तुझ्यावर रागावलों होतों, पण तें उगीच, तुझा असा कांहीं भयंकर परिणाम व्हावा अशी आपली बिलकुल इच्छा नाहीं म्हणून तुला आधीं सुचवीत आहें असें परोपरीनें कळविलें. विमलेला हें त्याचें नाटक पाहून फार आश्चर्य वाटलें. पण ती बेसावध राहिली नाहीं. येथून आपली सुटका आपणच करून घेतली पाहिजे, हें तिनें मनांत पक्कें धरिलें होतें. ]

## रोषनवलीचा आनंद.

विमलेला पाहिल्या वेळेपासून रोषनवलीचें मन अगदीं बावरल्यासारखेंच झालें होतें. तो ज्या हेतूनें इकडे आला तो हेतु त्याच्या मनांतून पार जाऊन ही स्त्री आपल्या स्वाधीन व्हावी ह्याच गोष्टीचा निदिध्यास त्याला लागला होता. परंतु आपला हेतु इतका सुसाध्य व शीघ्रसाध्य होईल ही कल्पनाही त्याला नव्हती आणि एकाएकीं कपालेश्वरानें आपण होऊन तिला आपल्या स्वाधीन करण्याचें योजिल्यावर मग आणखी काय पाहिजे होतें ? त्याचा आनंद गगनांत मावेनासा झाला. तो कपालेश्वराची नाना प्रकारांनीं प्रशंसा करूं लागला. त्याला त्यानें नाना प्रकारचे आशीर्वाद दिले. नाना प्रकारचीं आश्वासनें दिलीं, आपण आपल्या बादशहाकडून त्याला अमुक राज्य काबीज करवून देववूं असलीं अभिवचनें देऊं लागला. परंतु या प्रसंगीं कपालेश्वरास त्या अभिवचनांचें किंवा दुसऱ्या आश्वासनांचें कांहींसुद्धां वाटलें नाहीं. त्याचें सर्व मन सूड उगविण्याच्या विचारांत अगदीं गढून गेलें होतें. मी जर आतां ह्या चांडाळणीला या लोकांच्या स्वाधीन केलें; तरच कृतकृत्य होईन हें त्यास दिसत होतें. तो आपण

ठरविल्याप्रमाणें सर्व गोष्टी पार पडतात कशा एवढ्याच विचारांत काय तो गर्क होता. आणि त्याप्रमाणेंच त्यानें रोषनवलीला बोलूनही दाखविलें. " तुमची इच्छा तृप्त करण्यासाठीं मी विमलेला तुमच्या स्वाधीन करीत नाहीं तर माझ्या मनांत जी सूडाची इच्छा आहे ती मी तृप्त करून घेण्यासाठीं हें करतों आहें. आपण म्हणतां त्याप्रमाणें पुढें करा न करा, मी त्याची पर्वा करीत नाहीं. ज्याची मी आजपर्यंत एकनिष्ठपणानें सेवा केली त्यानें एका-एकी कोणाच्या तरी धाकट्पटीला भेदरून मला दूर फेंकून द्यावें हें फार वाईट. त्याचा मला राग आला आहे. हिला तुमच्या स्वाधीन केल्या-नंतर मी काय करणार, हें तुम्हांला दिसतेंच आहे. हीं सारीं मेंढरें मात्र मला अनुकूल झालीं पाहिजेत. म्हणजे गुरुजींना त्या गुहेंत अडकवून ठेवून त्या चोरांना चंडीच्या उपासकांचें काय अवसान असत तें दाखवीन. मी आतां तुमच्या देखतच यांना आपल्या मनाप्रमाणें करण्याविषयीं सांगणार आहें. परंतु हे सारे खरे खरे अजापुत्रच आहेत. यांच्या मस्तकांत कधीं खरी तिडीक उठायची नाहीं. तरी पण कांहीं तिडीक आली तर पहाणार आहे. तशी ती आलीच तर काम फत्ते होईल. "

इतकें बोलून त्यानें पुनः रोषनवलीच्या कानीं कांहीं सांगितलें, आणि रोषनवली लागलीच तेथून निघाला. जातांना पुनः त्यानें कपालेश्वरास नाना प्रकारांनी आशीर्वाद दिले. नाना प्रकारचीं आश्वासनें दिलीं आणि मी अमुक जागीं जाऊन वाट पहातों असें मोठ्यानें कपालेश्वरास म्हटलें. नंतर दोघेही दोन बाजूस गेले. कपालेश्वर थोड्या अंतरावर जाऊन थोडा थबकला. कांहीं विचारांत निमग्न झाल्याप्रमाणें त्यानें आपलें मस्तक चोळलें. बरोबर असलेल्या त्या शिष्याच्या खांद्यावर एक जोराची चापट मारली. आणखी त्यास म्हणाला: " अरे मूर्खा, हा व्यूह रचला जाऊन तो सिद्ध झालाच पाहिजे, तुमच्यासारख्या अजागळांच्या हातूनच हा रचून घेऊन सिद्धीस नेईन तर मी खरा कपालेश्वर. आजपर्यंत केलें तें सारें वायां घाल-वीन काय ? ही चांडाळीण तर आतां महमदी धर्माच्या खाणींत पडलीच. आतां तिची सुटका होत नाहीं. आतां आपला डाव साधला पाहिजे. मूर्खांनों, अजागळांनों, आतां जर तुम्ही माझ्यावर थोडा विश्वास ठेवून वागाल तर आर्यचाणक्यानें जसा आपल्या मुठींतला राजा मगधावर बसविला आणखी त्याचा अपमान करणाऱ्या नंदांचीं पाळेंमुळें खणून टाकिलीं, तसें मी करीन, पण तुमची मदत पाहिजे. तुम्हीं आपला अजागळपणा सोडला पाहिजे. "

असे उद्गार त्याच्या तोंडांतून एकसारखे निघत होते. हे त्या बरोबरीच्या शिष्याला अनुलक्षून किंवा उद्देशून होते असें नाहीं. ते बहुतेक आपल्या स्वत:शींच होते. थोडयाच वेळांत त्यानें त्या शिष्यालाही कांहीं सांगून तेथून अघोरघंटाकडे लावून दिलें आणि तो विमलेला ज्या गुहेंत बंदींत घालून ठेविलें होतें तिकडे गेला. तेथें वैकंकठ आणि रौद्रमुख दोघेही दोन भयंकर लांडग्यांप्रमाणें त्या गुहेच्या दारापाशीं बसले होते. त्यांच्यापाशीं जें काय बोलावयाचें तें तो त्यांच्याच भाषेंत बोलला. तो कांहीं तरी त्यांना न आवडणारी अशी गोष्ट सांगत असावा असें त्यांच्या चर्येवरून स्पष्ट दिसत होतें. ते मधेंच त्याला कांहीं विचारीत, मधेंच त्याचा निषेध केल्याप्रमाणें करीत, पुन: हात जोडून आपण सांगाल तें करण्याला आम्ही दास तयार आहों असें सांगत, असा कांहीं वेळ प्रकार चालला. नंतर कपालेश्वरानें आपली चर्या बदलली आणि ती अतिशय मोहक केली आणि विमलेच्या-पुढें उभा राहून तो तिला म्हणतो: "विमले, आतांपर्यंत मी जें तुला बोललों, तें अगदीं वेडगळपणानें कांहीं तरी रागाच्या भरांत बोललों. तें तूं आतां सगळें मनांतून काढून टाक. मला क्षमा कर आणि आतां दोन घटकांनीं अंधार पडला, कीं या दोघां भिल्लांबरोबर येथून चालती हो. तूं येथें आतां क्षणभरही राहूं नकोस. अघोरघंटाची—आपल्या गुरु महाराजांची मति फिरली आहे. जें मी केवळ विनोदानें तुला भिववावें म्हणून बोललों तेंच गुरुमहाराजांच्या मस्तकांत शिरलें आहे. म्लेंच्छधर्मी सिद्ध पुरुष रोषनवली जो एकदां तुमच्या अजमिरास येऊन धरणें धरून बसला होता त्याच्या-पासून, त्यांची मंत्रविद्या शिकून घेण्याची इच्छा त्यांना झाली आहे, आणखी ती सफल करून घेण्यासाठीं ते आतां तुला त्याच्या स्वाधीन कर-ण्यास तयार झाले आहेत, त्यांना मीं पुष्कळ म्हटलें कीं, हा असला अना-चार आपण करूं नका, पण ते ऐकत नाहींत. आज मध्यरात्रीला ते तुला त्याच्या स्वाधीन करणार, आणखी मग पुढें काय होणार हें मी तुला सांगूं शकतच नाहीं. तो प्रकार इतका भयंकर आहे कीं, तो मनांत येऊनच माझ्या अंगावर कांटे उभे राहिले आहेत. मी तुझ्यावर इतका रागावलेला, परंतु मला तें भयंकर वाटून मी आपला राग विसरून तुला ही हकीकत सांगून तुला इथून निघून जाण्याची, आणखी सुखरूपपणें आपल्या बापाकडे पोंच-विण्याची सगळी व्यवस्था करून द्यायला आलों. विमले, तूं माझी शिष्या. तुझ्यावर मी फार रागावलों. परंतु अशा भयंकर हालअपेष्टांत आणखी देहाच्या विटंबनेंत तूं पडावेंस हें माझ्या स्वप्नांतसुद्धां यायचें नाहीं. मी तुला

आपला तसें बोललों यावर जाऊं नको. आतां तें सारें विसर. आणखी मी सांगतों तसें कर. आतांपर्यंत तुझ्यावर पहारे करण्याला ठेवलेले हे भिल्ल-वैकंकठ आणि रौद्रमुख हेच तुझे आतां वाटाडे. यांना मी अगदीं सारें कांहीं समजावून सांगितलं आहे. ते तुला बरोबर मार्ग दाखवून तुझ्या बापाजवळ नेऊन सोडतील. त्यांच्यावर अविश्वास करूं नको. आणखी माझ्यावरही विश्वास नसल्यासारखें माझ्याकडे पाहूं नको. तूं असें पाहणार, तुझा एकदम विश्वास बसणार नाहीं, हें मी अगदीं पक्कें जाणून होतों. आणखी म्हणूनच आदरून तुला सावध करायला व खरी स्थिति सांगायला स्वतः आलों. तूं अगदींसुद्धां शंका घेऊं नको. नाहीं तर तुला विनाकारण संशय येऊन तूं भलत्याच संकटांत आपल्याला पाडून घेशील. तसें करूं नको. ”

कपालेश्वर अशा प्रकारें बोलत होता तरी विमला त्याच्याकडे संशयित मुद्रेनें पहात होती. तें अर्थातच साहजिक होतें. आतांपर्यंत जो माणूस अत्यंत क्रूरपणानें आपल्याला वाटेल तसें बोलत होता तोच आतां एका-एकीं इतक्या प्रेमानें व कळकळीनें बोलूं लागला हें पाहून तिला आश्चर्य वाटावें, संशय वाटावा यांत नवल काय ? तिची ती आश्चर्यचकित व संश-यित मुद्रा पाहून कपालेश्वर किंचित् हंसला व तिला एकदम म्हणतो: “ विमले, तुला आश्चर्य वाटलें किंवा संशय आला तर त्यांत नवल नाहीं. पण आतां ही आश्चर्य करीत बसण्याची किंवा संशय घेऊन स्तब्ध होण्याची वेळ नव्हे. तूं एकदां या संकटांतून सुटून आपल्या बापाच्या व नवऱ्याच्या जवळ जाऊन पोंच मग खुशाल आश्चर्य करीत बस. मग मी सुद्धां एखादे वेळ तिकडे येऊन तुला गुप्तपणानें भेटेन. मग तूं माझी प्रशंसा करून आपल्या नवऱ्याला मी तुला केवढ्या संकटांतून सोडविलें तें सांगून माझ्या-वर त्याची कृपा होईल असें कर. परंतु आतां नुसती त्वरा करून येथून निघून जा. दुसरें कांहीं करूं नको. समजलीस. आतां मी येथें मुळींच थांबत नाहीं. थांबण्यांत वेडेपणा होईल. गुरुमहाराजांस माझा संशय येईल. आणि सगळें फसेल तर आतां मी जातों. मी तुझी सगळी तयारी केली आहे. तुला त्याची शंका नको. याउपर तुझी इच्छा, मी आणखी काय करणार ? तूंच सांग. ”

इतकें बोलून त्यानें एकवार मोठ्या कळकळीनें तिच्याकडे पाहिलें. या वेळची त्याची मुद्रा इतकी विलक्षण होती, कीं तिला खरोखर आपण स्वप्नांत

आहोंत कीं जाग्या आहोंत याची शंका वाटली. परंतु तिच्या मनाची खात्री पटेना. कपालेश्वर इतक्या कळकळीनें आपल्याला संकटांतून वांचविण्यासाठीं आपल्याला युक्त्या सांगतो आहे हें आहे तरी काय ? आणि तें संकट पुनः कोणतें ? तर जें संकट आपल्यावर आणण्याबद्दल तोच आपल्यास धाक घालीत होता तें ! तथापि ती कांहींच बोलली नाहीं. तिच्या मनानें तिनें निराळाच बेत केला होता. तो बेत पार पाडण्यासाठीं ज्या काय युक्त्या करावयाच्या त्याही तिनें मनांत योजिल्याच होत्या. त्या युक्त्या कोणत्या व काय हें पुढें वाचकांस आपोआप कळेल. कपालेश्वर गेल्यानतर तिनें आपल्या मनांत सर्व गोष्टींचा विचार केला. कपालेश्वराचें कांहीं तरी कपट असावें हें तर तिच्या मनास वारंवार वाटे; परंतु मधून मधून एखादे वेळ अशीही शंका येई, कीं न जाणो कपालेश्वराला पश्चात्ताप होऊन त्यानें मला संकटांतून वांचविण्याचाही विचार केला नसेल कशा-वरून ? परंतु तें कसेंही जरी असलें तरी आपण आतां स्वतःच्या युक्त्यां-वर व धाडसावर भरंवसा ठेवूनच काय करावयाचें तें करावें, हेंच तिनें ठरविलें. कपालेश्वर तिला सांगून गेला होता कीं तुझी निघण्याची वेळ झाली म्हणजे मी येतों आणि तुला येथून रवाना करून देतों. त्याप्रमाणें तो येईल यांत शंका नव्हती; परंतु आपण आपली युक्ति त्याच्या आधींच योजावी कीं तो काय करतो तें पाहून त्याच्या हातून येथून सुटल्यानंतर योजावी याचाच काय तो विचार होता. तोही तिनें आपल्या मनांत पूर्णपणें ठरविला.

---

# प्रकरण १६ वें.

[एका निबिड अरण्यांत तीन मुसलमान घोडेस्वार बसले होते. त्यांत यवन पादशहा होता. तो रोषनवलीची वाट पहात होता.. हिंदुस्थानांत आपल्याला कोठें तरी पाय घुसवायला जागा मिळावी अशी त्याची फार इच्छा होती. इतक्यांत त्याचा एक सेवक अबदुल्ला रोषनवलीबरोबर गेला होता; तो पुढें धांवत येऊन त्यानें रोषनवली विमलेला घेऊन येत असल्याचें कळविलें.]

## निबिड अरण्यांत.

घोर अरण्य. इतकें निबिड, कीं चार पावलें सरळ जाईन म्हणून कोणी यत्न करील तर तो सुद्धां सिद्धीस जावयाचा नाहीं. भ दिवसां—दोन प्रहरीं टळटळीत दुपारीं बारा वाजतां सूर्यनारायण बरोब डोक्यावर आला असतां सुद्धां त्याचे किरण ज्याच्यांतून शिरत नसत- शिरणें शक्यच नव्हतें—असलें अरण्य. हिमालयाच्या अंतर्भागांत चार पावले तरी जो गेला असेल त्यालाच थोडीबहुत अशा अरण्याची कल्पना याव याची. इतरांला ती येणें शक्य नाहीं. त्या अरण्यांतील वृक्षांची निबिडत इतकी विलक्षण, कीं [illegible] जरी एखादी मोठी थोरली उल्का पडली तरी ती वरच्या वरच झाडांच्या डोक्यावर रहावयाची. अशा त्या अरण्यांत पशू व पक्षी यांची वस्ती किती असेल याची कल्पना काय करावयाची मात्र मनुष्यवस्तीचें नांवसुद्धां काढावयास नको, असा प्रकार होता; परं हें यावेळीं, ज्या वेळाबद्दल आम्ही लिहितों आहों, त्या विवक्षित वेळ कांहीं खरें नव्हतें. कारण एका भागांत कोणी तरी मनुष्यें बोलताहेत असें स्पष्ट ऐकूं येत होतें. मनुष्यें फार नव्हतीं. कारण गलगा ऐकूं येत नव्हता. मनुष्यें फार तर तीन किंवा चार असावीं. व मधून मधून त्याच बाजूकडून घोड्यांचें फुरफुरणें ऐकूं येत असे. अर्थात् त्या चाहुलीच्य आधारावर आपण गेलों असतां आपल्याला एका मोठ्या थोरल्या सांवरीच्य झाडाखालीं तीन माणसें बसलेलीं दिसलीं असतीं व पलीकडे दुसऱ्या एका झाडाखालीं एक एक याप्रमाणें तीन घोडेही बांधलेले दिसले असते. घोडे अस्सल

काबुलकंदाहारी होते व जे तिघे बसले होते तेही म्लेंच्छच होते हें त्यांच्या एकंदर ऐटीवरून व बरोबरीचा जो लवाजमा होता त्यावरून स्पष्ट दिसत होतें. त्या प्रचंड वृक्षाखालीं गोठा थोरला गाशा पसरून त्यावर झाडाच्या बुंध्याला टेंकून एक उशी व लहान गादी ठेवलेली होती. शेजारीं एक हुक्का प्रज्वलित केलेला होता व तो त्या गादीवर बसलेला गृहस्थ मधून मधून त्याच्या नळीला तोंड लावून त्यास व आपल्या तब्यतीस प्रज्वालित ठेवीत असे. दुसरे दोघे नुसतेच बसले होते, एकमेकांशीं कांहीं तरी मोठी कारस्थानाची गोष्ट चालली असावी असें दिसलें. त्या सर्वांच्या चर्येवर तितकी ती आतुरताच दिसत होती.

बराच वेळपर्यंत मंडळी अगदीं स्वस्थ होती. तो मध्यभागीं बसलेला गृहस्थ आपला हुक्का ओढण्यापुरतीच काय चळवळ करीत असेल तेवढी; परंतु थोडा वेळ अशा प्रकारें गेल्यानंतर स्वारी एकदम म्हणते: “ कायरे हा माणूस आपल्याला अशाच माशा मारीत किती दिवस बसविणार ? बातम्या काढण्यासाठीं गेलेला माणूस इतके दिवसपर्यंत तिकडेच ? त्याची कांहीं तरी हालचाल आपल्याला त्यानें कळवावी ? मला नाहीं वाटत ते हिंदुस्थांनातले जादुगार आपल्या जादूच्या आशेनें त्याला आपल्यांत घेतील असें ! याला आपली उगीच ती आशा. त्यांची जादू त्यांना काय थोडी आहे ! पण हाहि वस्ताद आहे, त्यांच्या पोटांत शिरल्याखेरीज राहणार नाहीं; पण आपल्याला उतावळी. कारण आपण त्यानें सांगितल्यापैकीं तिसऱ्या मुक्कामाला आलों. हे दगड हे खूण मारून टाकलेले त्याच्या संकेताप्रमाणें नाहीं का टाकलेले !

दुसरा गृहस्थ मोठ्या अदबीनें व लवून मुजरा करून त्यास म्हणतो, “ खाविंद लतीफ पुरा हरहुन्नरी आहे. तो काम फत्ते केल्याखेरीज यायचा नाहीं. शिवाय त्याच्याबरोबर आपण अबदल्याला दिला आहे. काम फत्तेह करून निघाल्याबरोबर आपल्याला कळविण्याकरितां त्यानें धांवत यावें म्हणून तर त्याला बजावलें आहे. तो जर अजून आला नाहीं, तर अद्यापि आपल्याला कळविण्याजोगें कांहीं त्याला लाभलें नाहीं असेंच दिसतें. त्या कपालेश्वराला इच्छा फार मोठी, पण त्याच्या हातून कितपत काम होईल हें सांगणें कठिण आहे. खाविंद मला तर कित्येक वेळां अशी शंका आली कीं तो आपल्यालाच थापा मारून फसवीत असावा. त्याला जितक्या गोष्टी साधतील असें वाटतें, तितक्या साधल्या नाहींत आणि आपल्याला तर

इकडे नानाप्रकारच्या थापा मारलेल्या तेव्हां आतां काय करणार ? असें होऊन तो अधिक अधिक थापा देत असावा अशी आपली मला शंका येते."

" त्याच्या थापा असोत कांहीं असो. कोणच्या तरी एका राज्यांत आपला पाय चांगला शिरकला पाहिजे. तेवढा शिरकला म्हणजे आपल्या-सारखे दुसरे केव्हां होतील या बुद्धीनें हेच लोक मदत करूं लागतील. मी ज्या त्यांच्या स्वभावाच्या गुप्त बातम्या आणल्या आहेत त्या सगळ्या एक केल्या म्हणजे परस्परविरोधि भाग कितीहि जरी काढून टाकले तरी एक अगदीं सर्व बाजूंनीं सारखा असा भाग आहे तो हा कीं, एक बळी गेला कीं तो बाकीच्यांना आपल्या सारखे बळी देण्यासाठीं धडपड करायला लागतो. तसा एक मोठासा राजा आपल्याला गिळायला सांपडला पाहिजे. तो गिळला तर त्याला सोडवायला कांही कोणी धांवायचे नाहींत. तो आपल्यां-तून गेला म्हणून नाद सोडतील. किंबहुना त्याचा द्वेष करूं लागतील. सुटण्यासाठीं त्यानें धडपड केली तर ती दाबून टाकतील, असा कांहीं या लोकांचा प्रकार आहे. म्हणून तर मी तरी एवढी धडपड करतों आहें, कीं एकदां एक प्रांत मिळाला कीं तो आपल्याला पचला. मग तो राजा आपला अंकित. तो इतरांना आपल्या जाळ्यांत आणून टाकणार. फितुरी करायला या लोकांसारखे लोक नाहींत."

तिसरा गृहस्थ अद्यापपर्यंत या त्यांच्या भाषणांत मुळींच बोलला नव्हता. तो त्या दोघांचें भाषण स्वस्थपणें ऐकून घेत होता. त्या झाडाच्या बुंध्याशीं ठेवलेल्या गादीवर बसलेल्या गृहस्थानें वरील वाक्य उच्चारल्यानंतर संमती-साठीं या गृहस्थाकडे पाहिलें. तेव्हां तो त्यास कुर्निसा करून अर्धवट उठून म्हणतो: ' खाविंद, आपण काढलेलें अनुमान अगदीं बरोबर आहे. पडले-ल्यास हात देऊन उठवून पुनः आपल्याजवळ करण्याची बुद्धि या लोकांत नाहीं, उलटी बुद्धि आहे. पडला कीं गेला. त्याला कांहीं मग पुन्हां वर डोकें करून त्याच्या लोकांत आणणें शक्य नाहीं. खाविंदांनीं हें या लोकांचें वर्म काढलें तें अगदीं बरोबर आहे. अगदीं बरोबर आहे."

ज्यास ते दोघेही ' खाविंद ' ' खाविंद ' म्हणून संबोधित होते, तो गृहस्थ वरील भाषण ऐकून हंसला व म्हणतो: " एकूण आपली आमच्या मताला संमति आहे ! ठीक आहे. नुसत्या संमतीनें कामें होतीं, तर आपली आम्हांला हरएक बाबतींत फार मोठी मदत आहे असें समजलों असतों; परंतु आतां या रिकाम्या संमतीपेक्षां थोडीशी कामगिरी करा. आम्ही दोघे

येथेंच बसतों किंवा हलके हलके पुढें सरकूं, पण तुम्ही एकटेच थोडे जलदी पुढें व्हा. आणखी अबदुल्ला किंवा लतीफ यांची कांहीं बातमी कळली किंवा कोठें माग लागला तर पहा. माझ्याबरोबर एक हा खावाज आहे तेवढा पुरे. आमच्यापासून दूर होऊन आपला कांहीं तरी प्रताप दाखवा. संमति काय मी आपल्याला झोपेंत किंवा स्वप्नांत कांहीं जरी विचारलें तरी संमति— अगदीं पुरे पूर संमति मिळणारच. तिची वाण भासते आहे कोणाला ! ”

हें सर्व बोलणें त्या दुसऱ्या माणसाला लागून होतें. तो अर्थातच थोडा खजिल झाला इतकेंच. थोडा म्हणण्याचें कारण इतकेंच कीं त्याला असें बोलणें ऐकून घेण्याचा हा प्रसंग कांहीं पहिलाच नव्हता. हरहमेश अशाच प्रकारचें भाषण ऐकून निर्ढावून गेल्याप्रमाणेंच त्याला झालेलें होतें; तथापि या वेळीं संमतीखेरीज आपल्या मालकाला दुसरें कांहीं हवें असेल ही कल्पना त्याला नसल्याकारणानें त्यानें वरील भाषण केलें. परंतु याबद्दल वर सांगितल्याप्रमाणें त्यास थप्पड बसली. त्या थपडीचा अर्थातच त्यानें क्षणार्धापेक्षां अधिक वेळ परिणाम न होऊं देतां लागलीच रुमालानें हात बांधून उठून आपल्या मालकास म्हटलें, ‘ खाविंद, आपण आज्ञा करण्याचा अवकाश, मी वाटेल तेथें उडी टाकीन कीं नाहीं पहा. आपण केव्हांच हुकूम केला असता, तर एव्हांना मी त्या दोघांचा पत्ता काढण्यासाठीं किती तरी प्रदेशांत गेलों असतों. पण खऱ्या दृष्टीनें पहातां त्यांची वाट पहाणेंच...... ’

परंतु पुढें बोलण्यांत अर्थ नाहीं असें त्याच्या मालकाच्या चर्येनें त्याला सुचविलें. त्याबरोबर त्यानें आपलें बोलणें तितकेंच ठेवलें व तावडतोब उठून उभा राहून आपली ती कंदाहारची वांकडी तलवार सांवरीत म्हणतो, “ खाविंद, हा आपला बंदा चालला. त्या दोघांना तावडतोब येऊन येतों. आपल्याला त्याच्याबद्दल मुळींच शंका नसावी. ”

असें म्हणून तो उठला व आपल्या घोड्याकडे गेला. थोड्या अंतरावर निरनिराळ्या झाडांना जे तीन घोडे बांधून ठेवले होते त्यांपैकीं एक त्याचा होता. तेव्हां तो त्याच्याजवळ जाऊन त्याला थापटून अगदीं हळूच म्हणतो, “ बच्चा, आपण कितीही जपून वागलों; तरी जें बांकडें तें बांकडेंच. मला तर बिलकुल इच्छा नव्हती पण काय करावयाचें ? तुला इच्छा होती कीं नव्हती त्याचा विचार जसा आम्हीं केला नाहीं, आम्हांला करावासासुद्धां वाटला नाहीं, तसाच हा प्रकार आमचा. आम्हांलाही आमच्या

मालकानें विचारलें नाही. चला म्हटलें आणि आम्हीं निघालों आतां त्या-बद्दल कुंथून काय उपयोग ? त्या खावाजानें जशीं उत्तरें दिलीं तशींच मीं दिलीं, तींही माझ्याकडून कांहीं तरी उत्तर पाहिजे आहे, असें वाटलें म्हणून दिलीं, पण माझें उत्तर वाईट वाटलें, फोल वाटलें आणि त्याचें—पण जाऊं दे बेटा, जोंपर्यंत आपल्याला नोकरी करावयाची तोंपर्यंत असेंच सोसलें पाहिजे. खरा हितकर्ता आणखी खरा सेवक कोण हें मालकाला समजायला मालकाच्या अंगीं तरी गुणाची चहा असावी लागते. ''

हे सर्व तो आपल्याशीच पुटपुटला आणि घोड्यावर स्वार झाला व पुनः मालकास दुरूनच कुर्निसा करून चालता झाला. पुन: ' काय हुकूम आहे, अमूक करूंना ' असें यानें त्यास विचारलेंसुद्धां नाहीं.

त्याचा मालक त्याच्याकडे पाहून नुसती मान हालवीत होता. अधिक कांहीं बोलला नाहीं. खवाजखानानें मात्र ओरडून त्यास म्हटलें, खुणेचे फत्तर लक्ष्यांत धर. त्यावांचून तूं धोक्यांत सांपडून कोणीकडे जाशील आणि कोणीकडे नाहीं, याचा कांहीं अंदाज करतां येणार नाहीं. या पर्वतांतील अरण्यें फार भयंकर आणि निबिड आहेत.

खवाजखानाचें हें भाषण ऐकून त्या दुसऱ्या गृहस्थानें नुसत्या कपाळास आंठ्या घातल्या, उत्तर कांहीं दिलें नाहीं व घोड्यास टांच मारून तेथून कूच केलें. त्यास एक प्रकारें सुटल्यासारखेंच झालें म्हटलें तरी चालेल. तो गेला असें पाहून तो बुंध्यापासल्या गादीवर बसलेला गृहस्थ त्या उरलेल्या गृहस्थास म्हणतोः " याची अशी समजूत झाली आहे, कीं मी त्याच्यावर अगदीं नाराज आहें आणखी काय असेल तें असो; त्याला कामापेक्षां बोलणं फार पाहिजे अशी माझी समजूतही पण झाली आहे. त्याला आपल्याबरोबर आणला. तो इकडे गुंतवायचा—आपल्या पश्चात् तिकडे राहून उलाढाल्या करावयाला नकोत. आतां माझ्या मनांत त्याला चांगला धारेवर धरायचा आहे. तसा धरल्याखेरीज त्या मागल्या खुळांतून त्याला काढायला दुसरा मार्गच नव्हता. आतां हा नीटपणें जाईलना ? गेला तर ठीकच आहे. नाहीं गेला, आणि कुठें खड्यांत पडला तरी काय आपल्याला हरकत आहे?" इतकें बोलून तो गृहस्थ हंसला आणि त्या हंसण्याला त्या दुसऱ्या गृहस्थाकडून साथ मिळाली, " खावंद, आपण त्यास आपल्याबरोबर घेतलें हें खरोखर फारच उत्तम झालें. माझी सुद्धां अशी समजूत आहे कीं त्याला जर तिकडे मोकळीं सोडला असता, तर त्याला त्या मागल्या खुळांत माणसांनीं तेव्हांच

ओढला असता. पण आपण फार थोर, फार उदार म्हणूनच त्याला आपल्याबरोबर बाळगला. नाहींतर वाहवता. ”

परंतु या शेवटच्या बोलण्याकडे त्याच्या मालकाचें लक्ष नव्हतें असें दिसलें. दुसऱ्या कोठें तरी कांहीं तरी खजबज चालली आहे तिची चाहूल लागल्याप्रमाणें तो उठला आणि सभोंवतालीं पाहूं लागला, अर्थात् खवाजखानही तसाच खडबडून उठला व पाहूं लागला. कोठें कांहीं सावज आलें कीं काय असा त्यांस भास झाला म्हणावें तर त्यांचे हात त्यांच्या तरवारीकडे गेले नाहींत यावरून तसें खास नव्हे. मग त्यांस कसली चाहूल लागली असावी बरें ? त्यांनींच आपल्या सभोंवताली पाहिलें असें नाहीं, तर त्यांच्या घोड्यांनीहि कांहीं तरी चाहूल लागल्याप्रमाणें आपले कान टोकारले.

त्यांनीं सभोंवतालीं पाहिलें इतकेंचें नव्हे तर कांय आहे तें पाहण्यास आपण जावें असें त्यांच्या मनांत येऊन ते इकडे तिकडे हिंडूं लागले; आतां चाहूल लागली ती अधिक स्पष्ट वाटूं लागली तेव्हां ते दोघेही एकदम त्या चाहुलीच्या मागावर जाऊं लागले. त्यांनीं घोडे जेथल्या तेथेंच ठेवले आणि पायानेंच त्या रस्त्यानें कीं—आतां ज्या रस्त्यानें आतांपर्यंत त्यांनीं आपल्या पुढें गेलेल्या लोकांनीं संकेत म्हणून टाकलेल्या दगडाच्या खुणेनें एवढा प्रवास केला—त्याच खुणांच्या दगडांचा माग काढीत ते चालले.

परंतु त्यांस फार वेळ जावें लागलें नाहीं, थोड्याच वेळांत एक प्रचंड म्लेंच्छ त्यांच्या नजरेस पडला. हा पुरुष फारच मोठा चांगला सात फूट उंचीचा होता. त्याचे हातपाय भले थोरले लठ्ठ आणि एकंदर शरीर फारच मोठ्या प्रमाणावर होतें, त्याचेकडे पहाण्याबरोबरच हा पूर्वीच्या काळचा कोणी दैत्य चुकून अद्यापि पृथ्वीवर राहिला आहे आणि आपला सोबती कोणी जगांत उरला नाहीं, तेव्हां आपण तरी माणसांच्या वस्तींत कशाला जावें ? आपल्याच तोडीच्या सबळ व क्रूर दिसणाऱ्या श्वापदांत आपले दिवस काढावे अशा विचारानें या निबिड अरण्यांत येऊन राहिला असावा असा भास होई. असो.

हा प्रचंड माणूस जो तेथें आला तो अगदीं बिलक्षण धापा टाकीतच आला. फार पळून पळून थकलेल्या श्वापदाप्रमाणेंच त्याची जीभ त्याच्या उघड्या तोंडांतून बाहेर दिसत होती. त्यांतून लाळही गळूं लागली होती; आमचे वरचे दोघेही गृहस्थ त्यास दिसतांक्षणींच तो थक-

कला— जागच्याजागीं उभा राहिला. त्यानें एक वेळां तोंड मिटून आंवढा गिळला—पुनः तोंड उघडलें आणि पुनः भात्याप्रमाणें धांपा टाकीत टाकीत त्या दोघांपाशीं येऊन फार लवून कुर्निसा केला. नंतर तो बराच वेळ अगदीं स्तब्ध उभा राहिला. त्यास बोलण्याची ताकद नसावी असें दिसलें. हा धांवत—फार वेगानें धांवत—आल्यानें याला इतका दम लागला आहे हें तर या दोघांस स्पष्ट दिसलें. अर्थातच त्यांनीं त्याला लागलीच प्रश्न विचारून बेजार केलें नाहीं. मात्र ज्यास खावंद खावंद म्हणून म्हणत असत तो अगदीं त्याच्याजवळ गेला व एखादा गृहस्थ आपल्या आवडत्या कुत्र्याला थापटतो थोपटतो व कुरवाळतो, त्याप्रमाणें करून त्यास म्हटलें: " अबदल्या, गुलामा, इतका कां धांवत सुटला होतास ? थोडा हळू हळू चालतास तर अशी तुझी स्थिति झाली नसती. आतां अगदीं पुरता विसावा घे..आणखी मग काय सांगावयाचें तें सांग. मला घाई नाहीं. त्यांत आणखी तुझ्या तोंडावरून मला दिसतेंच आहे कीं, तूं कांहीं तरी आनंदाची बातमी सांगण्यासाठीं इतका धांवत आलास. "

त्या कुरवाळण्यानें व थोपटथापटीनें अबदुल्ला फारच आनंदित झाला. आपल्या सर्व श्रमांचा पार परिहार झाला असें त्याला वाटलें असावें असें त्याच्या चर्येवरून दिसलें. तो लागलीच म्हणतो: "खावंद, बातमी खरोखर तशीच आहे. अजमीरची राणी—अजमीरची राणी—कोठली तरी एक राणी आणि तिचा मुलगा—आपल्या ताब्यांत सांपडली. आणखी एक प्रहराच्या आंत आपल्यापुढें ती येऊन उभी राहील."

---

अबदल्ला अगदीं ओशाळला. त्याला या प्रश्नाचें उत्तर देतां येईना. हें उघडच आहे. त्याला ज्यांनीं निरोप सांगितला, त्यांनीं जें काय सांगितलें होतें त्यांतलें जेवढें त्याला आठवलें तेवढें त्यानें जसें ध्यानांत राहिलें, तसें सांगितलें. आणखी काय तो सांगणार ? यांना मात्र कोठली तरी राणी आपल्या तावडींत सांपडली एवढेंच ऐकून समाधान होण्याजोगें नव्हतें. त्यांनीं त्याला प्रश्न विचारण्याचा अगदीं सपाटा लाविला. "नीट आठवण कर कुठली राणी, आणखी ती आपल्या मंडळीच्या ताब्यांत कशी आली ती ? "

परंतु अबदल्याला त्याचें स्मरण कोठलें ? त्यानें पुनः पुनः "कोठली तरी राणी—कोठली तरी महाराणी " असेंच सांगितलें. शेवटीं त्यांनीं त्याला 'अरे आतां तूं अजमीरची राणी आणि तिचा मुलगा असें म्हणत होतासना ? ' असेंही विचारलें. तरी पण तो म्हणतोः "काय मीं पहिल्यानें म्हटलें असेल ते खरें बोआ. आतां माझ्या ध्यानांत कांहीं नाहीं. कोठली तरी राणी आणि तिचा मुलगा एवढेंच माझ्या ध्यानांत आहे. जें ध्यानांत आहे तें मीं आपल्या पायांजवळ सांगितलें. आणखी आतां काय सांगूं ? आपण पुनः हुकूम करीत असाल तर धांवत जाऊन आपल्याला पुनः येऊन सांगतो त्यांना विचारून कीं खावंदांनीं विचारलें आहे कुठली राणी आणि कोण तिचा मुलगा. ती मंडळी त्या दरींतून बाहेरसुद्धां पुरती पडली नसतील, मी तेव्हांच पुनः जाऊन येईन. तिच्याबरोबर एक भिल्ल आहे. तो त्यांना वाट दाखवतो आहे. त्या भिल्लानेंच तिला आणखी पोराला मुटकुळयाप्रमाणें पाठीवर घेतलें आहे म्हणाना ? येऊं का जाऊन ? बोला आतां हां हां ह्मणतां पळत जाऊन येतों. त्यांना विचारतों, आणखी जें काय सांगतील तें अगदीं वोकीत येतों. "

परंतु आतां खाविंद व त्याचा सोबती या दोघांचें त्याच्याकडे लक्ष नव्हतें. ते आपआपसांत कांहीं बोलत होते.

"आपल्याला यानें ही बातमी सांगितली, पण ती खरोखरी आपल्याला मोठीशी इष्ट नाहीं. आपल्याला जी माहिती पाहिजे ती न मिळतां जर कोण्या राजाची राणी यांनीं पकडून आणली, आणखी ती जर आपण नेली, तर उलट आपल्याला जें काय अगदीं अनिष्ट तेंच घडून येणार. तें काय उपयोग ? आपल्या हातीं असें असें माणूस सांपडलें आहे हें कळतांच सारे राजे एकत्र होऊन आपल्यावर उठतील आणखी आपला जो हेतु

अबदुल्ला अगदी ओशाळला. त्याला या प्रश्नाचें उत्तर देतां येईना. हें उघडच आहे. त्याला ज्यांनीं निरोप सांगितला, त्यांनीं जें काय सांगितलें होतें त्यांतलें जेवढें त्याला आठवलें तेवढें त्यानें जसें ध्यानांत राहिलें, तसें सांगितलें. आणखी काय तो सांगणार ? यांना मात्र कोठली तरी राणी आपल्या तावडींत सांपडली एवढेंच ऐकून समाधान होण्याजोगें नव्हतें. त्यांनीं त्याला प्रश्न विचारण्याचा अगदीं सपाटा लाविला. " नीट आठवण कर कुठली राणी, आणखी ती आपल्या मंडळीच्या ताब्यांत कशी आली ती ? "

परंतु अबदुल्याला त्याचें स्मरण कोठलें ? त्यानें पुनः पुनः " कोठली तरी राणी—कोठली तरी महाराणी " असेंच सांगितलें. शेवटीं त्यांनीं त्याला ' अरे आतां तूं अजमीरची राणी आणि तिचा मुलगा असें म्हणत होता-सना ? ' असेंही विचारलें. तरी पण तो म्हणतो: " काय मीं पहिल्यानें म्हटलें असेल ते खरें बोआ. आतां माझ्या ध्यानांत कांहीं नाहीं. कोठली तरी राणी आणि तिचा मुलगा एवढेंच माझ्या ध्यानांत आहे. जें ध्यानांत आहे तें मीं आपल्या पायांजवळ सांगितलें. आणखी आतां काय सांगूं ? आपण पुन: हुकूम करीत असाल तर धांवत जाऊन आपल्याला पुनः येऊन सांगतो त्यांना विचारून कीं खावंदांनीं विचारलें आहे कुठली राणी आणि कोण तिचा मुलगा. ती मंडळी त्या दरींतून बाहेरसुद्धां पुरती पडली नसतील, मी तेव्हांच पुनः जाऊन येईन. तिच्याबरोबर एक भिल्ल आहे. तो त्यांना वाट दाखवतो आहे. त्या भिल्लानेंच तिला आणखी पोराला मुटकुळ्याप्रमाणें पाठीवर घेतलें आहे म्हणाना ? येऊं का जाऊन ? बोला आतां हां हां ह्मणतां पळत जाऊन येतों. त्यांना विचारतों, आणखी जें काय सांगतील तें अगदीं बोकीत येतों. "

परंतु आतां खाविंद व त्याचा सोबती या दोघांचें त्याच्याकडे लक्ष नव्हतें. ते आपआपसांत कांहीं बोलत होते.

" आपल्याला यानें ही बातमी सांगितली, पण ती खरोखरी आपल्याला मोठीशी इष्ट नाहीं. आपल्याला जी माहिती पाहिजे ती न मिळतां जर कोण्या राजाची राणी यांनीं पकडून आणली, आणखी ती जर आपण नेली, तर उलट आपल्याला जें काय अगदीं अनिष्ट तेंच घडून येणार. तें काय उपयोग ? आपल्या हातीं असें असें माणूस सांपडलें आहे हें कळतांच सारे राजे एकत्र होऊन आपल्यावर उठतील आणखी आपला जो हेत

सुईच्या अग्रानें शिरून हत्ती जाईसें भगदाड पाडायचें तें मुळींच जुळायचें नाहीं. एखादी दुसरी राणी नाहीं तर राजपुत्र आपल्या तावडींत सांपडली म्हणून उपयोग काय ? रोषनवली अगदीं मूर्ख आहे. त्याला मीं पाठबिला काय कामाला ? आणखी त्यानें केलें काय ? हुरळला कांहीं तरी पाहून. आणखी ही अमक्या देशची राणी म्हणून तो दुष्ट कापालिक खोटीच एखादी बया आणखी तिचा एखादा पोर आपल्यापुढें आणून उभा करणार नाहीं म्हणून कशावरून ? ”

इतकें बोलून खाविंदांनीं एक नुसता सुस्कारा टाकला व पुढें पुनः म्हटलें “ माणसें सांगितल्या कामाच्या पलीकडे जाऊन त्यांनीं कांहीं तरी विचित्र केलें म्हणजे मला मोठा संताप येतो. सांगितलेलीं कामें निमूटपणें करून यावें. पाठविलेल्या माणसांनीं दुसरें कांहीं करूं नये. त्या कापालिकाच्या पोटांत शिरून त्याला आपली विद्या शिकवण्याचें मिष करून आपल्याला जी माहिती पाहिजे, ती काढावयाची ती सोडून मध्येंच यांनीं काय आरंभिलें आहे ? तें कांहीं नाहीं. ‘ अबदल्या आतांच्या आतां तूं परत जा आणि त्यांना सांग कीं तुम्ही कोणी राणी पकडून आणली असेल ती त्वरित सोडून देऊन मूळ कामाचें काय केलें तें मला सांगायला या. मला दुसरें तिसरें कांहीं नको. आपला एकदां प्रवेश झाला म्हणजे मग आपल्याला छपन्न हजार राण्या आणि राजकन्या पकडून आणायला कठिण नाहीं, पण हें काय आतां ? ’

खाविंदांचें हें भाषण चाललें असतां त्याचे बरोबरचा दुसरा गृहस्थ अगदीं अदबीनें मान खालीं करून त्याचें तें बोलणें ऐकत होता. परंतु त्याला तें भाषण बिलकूल आवडलें नसावें, असें दिसलें. परंतु तसें दाखविणें कधीं शक्यच नव्हे, याकरितां तो आपला नुसताच कुर्निसा करून स्वस्थ बसला. अबदुल्ला काय ? अगदीं हुकमाचा चाकर. तो जाण्यास निघाला. हें अगदीं बरोबर नव्हे. आपण आतां कांहीं तरी बोलावेंच. काय नाराजी होईल ती होईल. असा विचार त्या दुसऱ्याच्या मनांत आला आणि तो लागलीच म्हणाला: “ खावंद, आपण म्हणालां तें अक्षरक्षः खरें आहे. पण कांहीं विशेष प्रसंग होऊन जर ती बाई आयतीच यांच्या जाळ्यांत सांपडली असली तर वाईट काय त्यांत ! माझी तर अशी समजूत आहे कीं, आपल्या तावडींत सांपडलेली शिकार आपण होऊन मोठेपणा करून जर सोडून दिलीत, बहुमानानें जिकडच्या तिकडे पाठविलीत

तर उलट। आपलाच वडेजाव वाढून आपल्यावर विश्वास बसेल. पण त्यांची त्यांनींच सोडून दिली तर त्यांत काय होणार ! आपणच विचार करा. माझी आपल्याला अशी विनंति आहे कीं आपण ती कोण धरून आणली आहे तिला इकडे येऊं द्या. पहा. चौकशी करा, आणखी मग आपण मान-सन्मान करून तिला तिच्या राज्यांत तिच्या नवऱ्याकडे परत पाठवा. त्यांत जो मोठेपणा आणखी इभ्रतदारपणा होईल, तो कांहीं परस्पर तिला सोडून देऊन होणार नाहीं. आपण असेच बसूं. कोण मंडळी येताहेत, कोणाला आणताहेत, त्याची वाट पाहूं. मग सगळ्या गोष्टीचा निकाल होईल. माझ्या अल्पबुद्धीला वाटलें, तें आपल्यापुढें मांडलें आहे. याचा विचार व्हावा. दुसरें कांहीं म्हणणें नाहीं. ”

तो दुसरा गृहस्थ त्याचें तें बोलणें ऐकून एकदम हंसला. आणि त्यास म्हणतो, “ तूं म्हणतोस त्यांतही कांहीं अर्थ आहे, नाहीं असें नाहीं. परंतु सर्व आपल्या मर्जीप्रमाणें साधलें तर तो अर्थ आणखी भलतेंच झालें तर ? ”

“ भलतेंच काय होणार ? ” त्या दुसऱ्यानें नम्रपणानें विचारलें.

“ काय होणार ? अशा वेळीं हजारों गोष्टी होतात. अमुकच म्हणून काय सांगावें ? तिला शोधण्याकरितां आलेल्या मंडळींनीं आपल्या लोकांवर हल्ला करून तिला सोडवून नेल्यावर मग ? मग आपला वडेजाव तर लांबच राहिला, पण आपण तेवढ्याच हेतूनें इकडे आलों व आपल्यावर आतां अधिक डोळा ठेवला पाहिजे असें व्हायचें. किंबहुना आपल्यालाच कैद केलें तर ? ”

“ खाविंद, आपल्याला कैद करण्याची छाती कोणांत आहे. तो माणूस अजून आह्मांला तर काय परंतु साऱ्या पृथ्वीला दिसायचा आहे. हें आपण काय असें भलतेंच ह्मणतां ? आपण एवढी छाती करून इतक्या लहान लवाजम्यानिशीं इकडे आलों ते काय असली भीति मनांत धरायला ? खाविंद गरिबाची परीक्षा पहाण्यासाठीं आपला सगळा भाषणप्रकार दिसतो, दुसरं तर मला कांहीं वाटत नाहीं. नाहीं तर आपल्या स्वतःला कोणी पकडील ही भीति आपल्या मनाला अणुभरसुद्धां शिवेल हें मला संभवनीयच वाटत नाहीं. शक्यच नाहीं. ”

खाविंद तें आपल्या अनुचराचें बोलणें ऐकून हंसले. नंतर त्या अबदुल्याकडे वळून म्हणतात: “ बरं तर अबदुल्ला, तूं उमीच आतां कुऱ्या-

सारखा धांवत सुटूं नको. स्वस्थ इथेंच उभा रहा. आम्हीही इथेंच उभे राहतों. मग पाहूं आतां मजा काय होते ती. ”

इतकें बोलून ती सर्व मंडळी तेथेंच थबकली व इकडे तिकडे पाहूं लागली. माणसांच्या चालण्याची चाहूल कोठून ऐकूं येते, तिकडे त्यांचें लक्ष्य लागलें. परंतु नुसतें स्तब्धपणें चाहूल ऐकत कोठपर्यंत बसवणार ? थोडयाच वेळांत त्या मुख्य गृहस्थास कांहीं बोलण्याची इच्छा होऊन तो अबदुल्यास म्हणतो: “ कायरे अबदुल्ला, मंडळी आतां येणार ही कोण कोण येणार?”

अबदुल्ला लागलीच म्हणाला: “ मंडळी फार नाहींत. तो एक भिल्ल, त्याचेबरोबर आणखी दोघे रखवालीसाठीं आलेले भिल्ल, आणखी रोषनवली-साहेब यांखेरीज कोणी नाही. त्या भिल्लाच्या खांद्यावर ती परी आणखी तिचा तो मुलगा हीं आहेत. परी एकसारखी रडत होती; परंतु रोषनवली-साहेबांनीं आपल्या मंत्रांनीं तिला झोंप आणली असावी, यामुळें ती अगदीं मुकाटयानें त्याच्या खांद्यावर लोंबकळते आहे. साहेब, ती पण अशी खुब-सुरत आहे, कीं तिच्यासारखी दुसरी आपण कुठें पाहिली नसेल. ”

“ तर. तर. खुपसुरत कोण आणखी बदसुरत कोण याची तुला केवढी परीक्षा ! मोठा परीक्षावानच तूं. पण कायरे, तो मुलगा केवढा आहे ! ही कोणाची मंडळी असावी ? ”

“ जर का हस्तिनापुरच्या गादीवरल्या त्या थेरडयाची आवडती मुलगी आणखी मुलगा—ज्याला तो आपल्या गादीवर बसवणार आहे— तींच दोघें असली तर फार चांगलें होईल. तीं दोघें नसलीं तर त्याची दुसरी मुलगी आणखी तिचा पुत्र अशीं असावीं. पण त्या थेरडयाच्या मुलींपैकीं असावीं म्हणजे झालें. ”

“ होय. होय. त्या थेरडयाच्या मुलींपैकीं एक आहे. ही पहा खाविं-दांच्या पुढें मीं आणून उभी केली आहे. इतक्या लवकर हा सुप्रसंग मला लाभेल अशी आशा नव्हती, परंतु लाभला. खाविंद, आपली परवानगी घेऊन मी ज्या कार्याकरितां निघालों, तें कार्य एकीकडेच राहिलें. पण ही शिकार मधल्यामधेंच मिळाली. तिला मी आपल्या मंत्रांनीं अगदीं भारून टाकून बेशुद्ध करून आणली आहे. तिनें माझ्या तावडींत सांपडूं नये म्हणून नानाप्रकारच्या युक्त्या केल्या. पण तो कपालेश्वर कसला वस्ताद ! तो काय ऐकतो तिला ! त्यानें तिला माझ्या स्वाधीन केलें. आणखी सांगि-तलें कीं, तुमची मंडळी तुम्हांला मिळण्याच्या ठिकाणापर्यंत आमचे हे

भिल्ल तुम्हांला पोंचवतील. हिला मारून पाठविली म्हणजे त्या भिल्लाच्या पाठीवर ती हूं कीं चूंसुद्धां करणार नाहीं. तिच्यावर त्याच्या मनांत सूड उगवायचा असला पाहिजे म्हणूनच त्यानें एवढें केलें, नाहीं तर केलें नसतें, अशी माझी समजूत आहे. कसेंही असो, परंतु आपण फार भाग्यवान्, आपल्याला पहिल्या—प्रथमच कसलें टाऊक सांपडलें पहा. असा आह्मां गरिबांचा आपल्यासारख्यांना उपयोग असतो......"

ज्यास ही सर्व मंडळी खाविंद् ह्मणत असत, तो गृहस्थ त्या भिल्लानें खालीं ठेवलेल्या त्या मानवी गांठोड्याकडे पहात राहिला व नंतर त्या वलीस ह्मणतो, " काय ह्मणतां वलीसाहेब, ही त्या थेरड्याच्या मुलींपैकीं एक आहे ? का त्या कापालिकानें तुला फसवून कोणी तरी एक स्त्री तुझ्या स्वाधीन केली ? "

" छे.छे. खाविंद् त्या स्त्रीचा नुरच पाहण्याबरोबर आपल्याला ती कोणा तरी राजघराण्यांतली नव्हे फार मोठ्या राजाची स्त्री आहे हें दिसून येणार आहे. आपण त्याबद्दल शंका कां घेतां ? तो कापालिक पुरा आपल्या आधीन आहे. तो आपल्याला कधीं फसवणार नाहीं, हें आपण खास ध्यानांत धरा. त्याला जें पाहिजे तें मात्र आपण अगदीं पूर्णपणें त्याला देण्याला अनमान करूं नका. "

वलीसाहेबांचें तेवढें बोलणें ऐकून तो गृहस्थ त्या स्त्रीकडे एकसारखा पाहूं लागला. तिच्या सौंदर्याचा त्याच्या मनावर खास परिणाम झाला असावा असें स्पष्ट दिसलें.

# प्रकरण १८ वें.

[ आपण बजावलेली कामगिरी फार महत्त्वाची आहे, असें वलीसाहेब पादशहाच्या डोक्यांत भरवीत होते. पण ही कामगिरी तितकी कांहीं महत्त्वाची त्याला वाटली नाहीं. शेवटीं इतकी हा स्तुति करतो आहे तर विमलेचें सौंदर्य तरी पहावें म्हणून तिला सोडण्याचा त्यानें हुकूम केला. अजूनपर्यंत विमला व जयचंद गांठोड्यांतच पडलीं होतीं. पण तिला सोडवावयला वलीसाहेब पुढें होतांच तिच्याबरोबरचा भिल्ल संतापून मध्यें उभा राहिला, आणि तिला कोणालाही हात लावूं देईना. त्यामुळें संतापून अबदुल्ला त्या भिल्लाच्या अंगावर धांवला, व दोघांची खूप जोराची झोंबी सुरू झाली. अबदल्यानें पुष्कळ धडपड केली, पण त्याचें भिल्लापुढें कांहींच न चालतां शेवटीं तो धडपणीं सुटतो कसा असें झालें. आतां हा भिल्ल मुकाट्यानें ऐकत नाहीं असें पहातांच पादशहानें संतापून आपली फरशी उचलली. पण ती दुसऱ्या एका भिल्लानें मागून काढून घेतली. आणि हळुहळु अनेक रजपूत लोकांनीं या मंडळीला वेढा दिला. या मंडळींत विजयपाळ आणि अनंगपाळ होते. त्यांनीं येतांच विमला व जयचंद याची सुटका केली. आपण केवळ शिकारीला आलों होतों, आपल्याला मुकाट्यानें जाऊं द्या म्हणून पादशहानें सांगितलें, व अनंगपाळानें रजपुताच्या ब्रीदाला स्मरून सर्व मंडळी विरुद्ध असतां त्याला जाण्यास सांगितलें तेव्हां क्रोधानें जळफळत तो आपल्या अनुयायांसह तेथून चालता झाला. ]

## विमलेची सुटका.

या प्रमाणें 'खाविंद' या शब्दांनीं बारंबार संबोधलेला गृहस्थ आणि अबदुल्ला व तो दुसरा गृहस्थ यांचीं भाषणें चाललीं तोंच ज्यांच्याविषयीं इतकी वाटाघाट चालली होती ती मंडळी येऊन पोंचली. एक राक्षसी उंची रुंदीचा भयंकर मुद्रेचा आणि विलक्षण शक्तीचा भिल्ल त्याच्या खांद्यावर तें एक मुटकुळें—एक मुटकुळें म्हणण्यापेक्षां दोन मुटकुळीं म्हटलें

तर विशेष शोभेल. कारण एक लहानसें गांठोडें होतें व एक मोठें होतें. एकांत विमला व दुसऱ्यांत तिचा तो लहान मुलगा हें निराळें सांगावयास पाहिजे असें नाहीं. त्यांस पहातांच खाविंदाच्या मनांत काय आलें आणि त्यांच्या मनावर काय परिणाम झाला हें वर ध्वनित झालेंच आहे. आपण जें काय केलें तें खाविंदांस आवडलें नाहीं असें त्या वलीसाहेबांच्या नजरेस येतांच त्याला फार वाईट वाटलें आणि तो एकदम त्यांस म्हणतो: "खाविंद, आपण म्हणतां ती गोष्ट खरी. आपण ज्या कामासाठीं मला पाठविलें तें काम मी करून आलों नाहीं ही गोष्ट खरी; परंतु मी जी कामगिरी केली आहे ती अत्यंत महत्त्वाची आहे अशी माझी समजूत आहे. एक राजस्त्री आणि तिचा ज्येष्ठ पुत्र धरून आणून आपल्या स्वाधीन केलीं याहून आणखी काय पाहिजे ? "

तें ऐकून खाविंद एकदम हंसून म्हणतात:– "वलीसाहेब आपण जंतरा-मंतरांतच वस्ताद. आपल्याला या राजकीय बाबतींत काय समजतें ? आपली काय अशी समजूत कीं, मी आज इतकीं वर्षें याकरितां धडपड करतों आहें. नानाप्रकारचे लोक या देशांत पाठवून फितुऱ्या झाल्या तर पहातों आहें तें एखाद्या स्त्रीच्या लाभाकरितां ? तुम्हां जादुगारांची दृष्टिच तितकी. एखादी स्त्री सांपडली, कीं तिला मारून तिचें कुत्रें मांजर बनवावें आणि तिला सदोदित आपल्या बरोबर हिंडवावें. वलीसाहेब, मघाशीं मीं या मूर्खाला सांगितलें तेंच आपल्याला सांगून ठेवतों कीं मला जी स्त्री पाहिजे आहे ती हाडामासांची नको आहे. मला पाहिजे ती मातीदगडाची पाहिजे आहे. एखादी स्त्री अशी भुरटे भामटेगिरी करून पळवून आणण्याचा पराक्रम मला नको. मला असा पराक्रम पाहिजे, कीं ज्याच्या योगानें या हिंदुस्थानां-तली वाटेल ती स्त्री या वेळीं माझ्यापुढें हजर ठेवा असा हुकूम फर्माविला, तर तिच्या आईबापांनीं किंबहुना नवऱ्यानेंहि तिला माझ्यापुढें आणून उभी केली पाहिजे. मूर्खांनों, तुमच्या अकला गेल्या कोठें ? मी तुम्हाला सांगतों एक आणखी तुम्ही करतां एक. "

"खाविंद" तो वलीसाहेब त्यांस पुढें म्हणतो:— "आपण म्हणतां त्यांत आणखी आमच्या करण्यांत अंतर कोठें पडलें ? आपण ही स्त्री ओळ-खली नाहीं. ही स्त्री अजमीरच्या विजयपाळाची पत्नी, हा त्याचा युवराज. ही हास्तिनापूरच्या अनंगपाळाची कन्या आणि हा त्याचा नातू. अशीं माणसें तावडींत सांपडल्यावर आणखी काय पाहिजे. यांना अडकवून ठेवून किंवा

यांना भ्रष्ट करण्याचा धाक घालून हिच्या नवऱ्यापासून व बापापासून वाटेल तें कबूल करून घेतां येईल ना ? खाविंद ! त्या कपालेश्वराचा आणखी त्याच्या गुरूचा सध्यां फार बेबनाव झाला आहे, यामुळें आपल्याला जी गोष्ट पाहिजे आहे ती आतांच घडून येणें शक्य नाहीं; पण आपल्या नशि-बानें त्या कपालेश्वराच्या नादीं लागलेली ही आयतीच तेथें आली होती ती आपल्या उपयोगीं पडली. यांत काय वाईट झालें. " खाविंद तें ऐकून त्यास ह्मणतो: " वाईट आणखी चांगलें हें ज्याच्या त्याच्या मर्जीवर— ज्यांच्या त्यांच्या मनाच्या कलावर असतें. असो. चला. आतां ती तुम्ही येथें आणलीच आहे; तर पाहूं. तिचा बुरखा आणखी तिची झोंप तर दूर सारा. काय एवढी तारीफ करतां आहां तिच्या खुपसुरतीची ती तरी पाहूं द्या. कां त्यांतही तुमचा नादानपणाच दिसतो हें तरी दिसेल. विजयपाळा-ची पत्नी, आणखी अनंगपाळाची कन्या इतकी तुम्ही वाखाणतां ती तरी पाहूं. "

असें म्हणून खाविंद उठले व पुढें सरकले. वलीसाहेबही पुढें सरकून हात लावून तिचा बुरखा काढून तिच्यावर त्यांनीं टाकलेला मंत्र काढून घेण्यासाठीं तिच्याजवळ जाऊन बसणार तों तो भिल्ल पुढें झाला व एकदम संतापल्याप्रमाणें होऊन म्हणतो: " हां, वलीसाहेब, आपण त्या आमच्या बहिणीला खबरदार हात लावाल तर ? तुह्मांला वाटत असेल, कीं तुह्मी तिच्या पवित्र देहाचें काय वाटेल तें करूं शकाल, पण तें बाजूला ठेवा. मी एकटा तुह्मांला चौघांना पुरा आहें. " तो भिल्ल आपल्या भाषेंत बोलला, त्याच्या ह्मणण्याचा सर्व अर्थ काय तो त्यांना समजला नाहीं, परंतु तो रागावला असून आपल्यास त्या विमलेच्या देहाला स्पर्श करूं देत नाहीं एवढें वलीसाहेबांस समजलें. तो फार चमत्कारिक दृष्टीनें त्या भिल्लाकडे पाहूं लागला. भिल्ल अत्यंत क्रूर मुद्रा करून त्या प्रेतवत् पडलेल्या मायलेकरांचे जवळ जाऊन उभा राहिला. त्याचा त्या वेळचा पवित्रा असा होता, कीं जणूं काय आपल्या देखत पुढें येऊन कसा हात लावतो तें पाहूं दे. गुला-माच्या हाडांचा चूरच करून टाकतों, असेंच त्यांस म्हणतो आहे. वलीसा-हेब तें पाहून त्यास म्हणतो: " मूर्खा, दूर हो. उगीच आपल्या जीवाला कां मुकतोस ? शिवाय फार वेळ झाला आणि माझी जादू जर मी उतरली नाहीं, तर कधींच न उतरतां या दोघांना या अशाच स्थितींत रहावें लागेल तर दूर हो. उगीच भलत्याच परिणामावर गोष्टी नेऊं नको. "

परंतु भिल्लास कांहीं केल्यानें उमज पडेना. जसा एखादा अतिशय क्रूर परंतु स्वामिभक्त कुत्रा आपल्या धन्याच्या रक्षणाकरितां आपल्या जिवाकडे बिलकूल न पाहतां अंगावर केंस उभारून कान टवकारून, दांत बाहेर काढून गुरगुरत राहतो तशी या वेळीं त्या भिल्लाची स्थिति होती. ती त्याची स्थिति पाहण्याबरोबर वलीसाहेब फारच चमत्कारला. आपल्या मुठींतला म्हणून जो भिल्ल कपालेश्वरानें आपल्याबरोबर दिला, ज्याच्या पाठीवर विमलेला त्यानें दिली तो भिल्लच अशा प्रकारानें उलटलेला पाहून त्यास कसेंसेंच झालें. त्या भिल्लाला तशा स्थितींत पाहून अबदुल्लाही संतापला असावा. या भिल्लाच्या मनांत वलीसाहेबांस मारावयाचें किंवा असें कांहीं तरी करावयाचें असावें असें त्यास दिसलें, आणि तो एकदम मागचा पुढचा विचार न करितां त्या भिल्लाच्या अंगावर चढून गेला.

झालें. हिमालयांतील दोन प्रचंड रानबैल—गवे—एकमेकांवर चिडलें म्हणजे जसे धडाधड एकमेकांला धक्या मारून एकमेकांच्या जीवाला अपाय करायला झटूं लागतात त्याप्रमाणें तो अबदुल्ला आणि हा वैकंकठ यांची लढाई सुरू झाली. वैकंकठ भिल्ल कांहीं केल्या विमलेच्या त्या देहापासून हलेना. दोघेही एकमेकांना ठीक आहेत असें मनांत येऊन बाकीची मंडळी स्वस्थपणानें त्यांच्या या धडकींची मौज पहात उभी राहिली. आपला अबदुल्ला हा या भिल्लाला तेव्हांच खालीं पाडून जमीनदोस्त करील असें खाविंदांस खात्रीनें वाटत होतें. यामुळें एखाद्या कुस्तीसाठीं तयार केलेल्या हेल्याचा मालक आपला हेला कुस्ती मारूं लागला म्हणजे कौतुकानें पाहूं लागतो तशी त्याची स्थिति झाली. आपला अबदुल्ला म्हणजे एक क्रूर व रानटी पशू, त्याला अंगशक्तींत मागें सारणारा जगांत कोणी नाहीं, कोणी असणें शक्यच नाहीं अशी त्याची भावना. यामुळें ते हीच वाट पाहात बसले, कीं अबदुल्ला आपल्या त्या प्रतिस्पर्ध्याला उखडून खालीं पाडतो कधीं. परंतु घटका झाली दोन घटका झाल्या. अबदुल्ल्यानें त्या भिल्लास उखडून पाडण्याचें लांबच राहिलें. पण तो ज्या जागीं उभा होता तेथून पांच सात पावलेंसुद्धां त्यास पुढें ओढतां आलें नाहीं. त्याच्या अंगावर तो अबदुल्ला धडाधड धडक्या मात्र देत होता. शेवटीं आपलें सगळें बळ व्यर्थ झालें काय ? म्हणून खें खें करीत त्यानें आपलें मुंडकें खालीं घातलें. आणि एखाद्या भयंकर रानडुकराच्या मुसंडीप्रमाणें मुसंडी मारीत तो त्या वैकंकठाजवळ येऊन त्यानें त्याच्या छातींत धडकी मारली. पण एखाद्या दगडावर मारलेल्या धडकी-

प्रमाणेंच त्याही धडकीचें झालें. फरक इतकाच कीं, इतका वेळ तो भिल्ल उगाच लीलेनें म्हणून उभा होता, आतां तोही चिडला आणि त्या धडकीसरशी त्यानें अबदुल्लयाची मुंडी आपल्या काखेंत धरली व त्याचीं कानशिलें सपाटून दाबण्यास सुरवात केली आणि दुसऱ्या हातानें त्याचें तंगड धरण्याचा उपक्रम त्यानें चालविला. त्याच्या हातांत तें तंगड सांपडतांच आपला एक पाय त्याच्या दुसऱ्या तंगडीवर देऊन त्यास उभा चिरून टाकावयाचा. अबदुल्लयाचें मानगूट त्या भिल्लाच्या काखेंत सांपडतांच एखाद्या मांजरीच्या पिलाचें मानगूट धरलें असतां तें जसें तडफड करून चारी पायांना झटके देऊं लागतें, तसेंच अबदुल्ला करूं लागला. यामुळें एकवार वेंकंकठाच्या हातांत त्याचें एक तंगडही आलें व दुसरें त्यानें पायांखालीं दाबलें.

आतांपर्यंत बाकीची मंडळी अशा आशेवर भिस्त ठेवून होती कीं, अबदुल्ला मुळींच हार जावयाचा नाहीं. परंतु वर सांगितल्या प्रकारची स्थिति होतांच ती त्यांची आशा लुप्त झाली व लागलीच आपल्या पठ्याला सोडवावा कसा ही काळजी वाटूं लागली. लागलीच वलीसाहेब व खाविंद व तो तिसरा गृहस्थ असे तिघेही उठून त्या भिल्लाच्या अंगावर धांवले. परंतु तो भिल्ल अगदीं क्रोधांध झाला होता. त्या एका अबदुल्लयाचे दोन अबदुल्ले केल्याखेरीज कांहीं मी राहत नाहीं असें तो म्हणूं लागला. परंतु इतक्यांत वलीसाहेबांस अबदुल्लयाचा जीव वांचविण्याची युक्ति सुचली. ते तट्कन् विमलेजवळ गेले आणि तिच्या अंगाला स्पर्श करण्याचा त्यांनीं आविर्भाव आणला. त्याबरोबर अबदुल्लयाला त्या भिल्लानें झट्कन् दूर फेंकून दिला. तो इतका जोरानें कीं तो त्या वलीसाहेबांच्या अंगावरच जाऊन कोलमडला.

हा प्रकार पाहिल्यावर आपण आतां अगदीं स्वस्थ बसणें सर्वथा योग्य नाहीं असें मनांत येऊन खाविंदांनीं आपली फरशी उचलली व ती त्या भिल्लाच्या डोक्यांत घालण्यास उभारली. खाविंद या शब्दानें संबोधिला जाणारा गृहस्थ या वेळीं संतापून उठला होता; तोही फार धिप्पाड आणि क्रूर दिसत होता. त्याची ती मुद्रा पाहूनच कोणी घाबरला असता. त्याची ती फरशी अवजड परंतु ती तो अगदीं फार सहजपणें पेलत होता. त्यानें ती उगारली आणि त्या भिल्लाच्या डोक्यावर घालणार, इतक्यांत वरच्यावरच ती त्याची फरशी दुसऱ्या कोणी तरी काढून घेतली. हा असें धाडस करणारा कोण म्हणून तो अर्थातच पाहूं लागला, तों आपण ज्या

भिल्लावर आघात करणार होतो त्या भिल्लासारखाच दुसरा भिल्ल आपला हात आंखडून धरीत आहे असें त्यानें पाहिलें. त्याबरोबर त्यास अधिकच चीड आली आणि तो त्या भिल्लाकडे वळला तों आणखी दोघे चौघे लोक तेथें आले; हे भिल्ल नव्हते. कोणी तरी मोठ्या पदवीचे वीर होते असें त्यांच्या चर्येवरून स्पष्ट दिसलें. त्यांस पाहतांक्षणीं आमचे पहिले सर्व लोक अगदीं चपापून गेले. ज्यांना आपण येथें आणलें आहे, त्या स्त्रीचेच हे कोणी तरी लोक असावेत असें एकदम त्यांच्या मनांत आलें. त्या खाविंदाची फरशी त्याच्या हातांतून हिसकून घेतली आणि खालीं दूर फेंकून दिली. तें पाहतांच त्या गृहस्थास इतका संताप आला, कीं त्याचें अंग थरथर कांपूं लागलें. आजपर्यंत अशा प्रकारचा अनुभव—अपमानाचा अनुभव—त्या प्राण्यास कधींसुद्धां आला नव्हता असें अगदीं स्पष्टपणें त्याच्या त्या वेळच्या चर्येवरून दिसलें.

इकडे विमला व तिचा तो मुलगा यांचीं गांठोडीं तेथें टाकलीं होतीं तीं इतका वेळ अगदीं निश्चेष्ट पडली होतीं, तीं चळवळ करूं लागलीं. वलीसाहेबांच्या मंत्रामुळें किंवा दुसऱ्या कारणामुळें आतांपर्यंत त्यांना जी निश्चेष्टता आली होती, ती आतां आपोआप नाहीशी होत चालली. त्याबरोबर वलीसाहेब एकदम पुढें होऊन म्हणतो, “ खाविंद खाविंद पहा पहा ती......”

परंतु तितक्यांत त्या दोन चार क्षात्रिय वीरांपैकीं एकजण पुढें विमलेच्या जवळ गेला. विमलेला त्यानें पाहिली व विमले, विमले, ऊठ, काय ही तुझी स्थिति; आम्ही वेळेवर आलों म्हणून बरें झालें. या तुझ्या रौद्रमुख, भिल्लानें आह्मांला बातमी देऊन इकडे आणलें. असो, आतां तरी ऊठ; हा बाळ जयचंद......

इतकें तो बोलतो, तों आणखी दहा पंधरा क्षात्रिय तरुण तेथें आले आणि त्यांनीं त्या म्लेच्छ मंडळीच्या भोंवतीं गराडा घातला. त्यांचेबरोबर एक पालखी होती. चार भिल्लांनीं त्या विमलेस व जयचंदास पालखींत बसविलें. म्लेंछ मंडळी तें सर्व पाहून अगदीं चकितच होऊन राहिलीं. आपण काय उद्देशानें येथें आलों आणि काय विलक्षण प्रसंग झाला याचा त्यांस जणूं कांहींच उमग पडेना. ते फक्त चौघे आणि त्यांच्या भोंवतीं आतां इतका मोठा गराडा. परंतु तेही कांही कमी नव्हते. आपल्या भोंवतीं गराडा पडलेला पाहून तो त्यांचा मुख्य एकदम त्यांस म्हणतो, ‘ तुम्ही आमच्या भोंवतीं गराडा घालण्याचें कांहीं कारण नाहीं. आम्हीं आपल्या वाटे

जातों, आपल्या आपण वाटेनें जा. या स्त्रीचा कोणत्याही रीतीनें आम्ही उपमर्द केला नाहीं— करण्याची आमची इच्छाही नाहीं. हिला आणण्याचें कांहीं प्रयोजन नव्हतें हेंच मी यांना थोड्या वेळापूर्वी सांगत होतों. तेव्हां मी सांगतों त्याप्रमाणें आपण वागावें. आपण यांना घेऊन जावें. आम्ही आपल्या वाटेनें जातों. विनाकारण वैमनस्य वाढवूं नये. ''

तें ऐकतांच विजयपाळ मोठ्यानें हंसला, आणि म्हणतो, " ठीक ठीक. आमच्या घरांत शिरून आमच्या माणसांना फितूर करून हा भयंकर प्रकार आपण करणार; आणखी आम्हीच वैमनस्य वाढवितों असें आपलें म्हणणें?"

" आम्ही आपल्या माणसांना मुळींसुद्धां धक्का लागूं देणार नव्हतों, केवळ शिकारीसाठीं इकडे आलों. या माणसांच्या हातून थोडी गैरवागणूक झाली, परंतु ती मीं चालूं दिली नसती. "

वृद्ध अनंगपाळ लागलीच त्यांस म्हणतो, ' म्लेच्छराजा, तूं हें म्हणतो आहेस हें आतां जीव बचावण्याकरतांच केवळ नसलें तर मी खरें मानतों, आणखी तुला आल्या वाटेनें परत जाऊं देतों. आम्ही क्षत्रिय राजे, जो मला जाऊं दे म्हणून म्हणेल तो शरणच आला असें समजून त्याचे सगळे अपराध क्षमा करतों. "

" महाराज, महाराज ! " विजयपाळ एकदम आपल्या सासऱ्यास म्हणतो, " हें आपण काय करितां ? ज्यांनीं आपलें व माझें सर्वस्व हरण करण्याचा खटाटोप केला, त्यांना आपण जीवदान देतां ! पहा. या आपल्या कन्येकडे पहा. आपण जर आणखी पाव अर्धी घटका आलों नसतों तर काय प्रसंग झाला असता ? माझा जयचंद मला मुकला असता आणखी...... "

परंतु अनंगपाळ त्यास मध्येंच म्हणतो, " विजयपाळा, आपण कितीजण, हा एकाकी, त्यांतून खरें असो खोटें असो, आपल्या तोंडानें सांगतो कीं, आपण केवळ शिकारीसाठीं आलों, खरें असेल, तर आपण त्याला सोडून दिल्यानें न्याय्य तेंच होणार. खोटें असलें तर तो खोटें बोलून कां होईना पण जीवदान मागतो आहे तर तें दिल्यानें आपल्या क्षत्रियांच्या ब्रीदाप्रमाणें वागणें होणार आहे. तो जर गुमीच्या गोष्टी सांगता तर......... "

" पण महाराज, " विजयपाळ त्यास म्हणतो, " हा शिकारीला म्हणजे कोणच्या शिकारीला आला होता याचा आपण विचार करा. महाराज,

माझी तर अशी मनोदेवता धांवते कीं, हा अगदी कायमच्या शिकारीची तजवीज करायला आला होता. आणखी अशा माणसाला आपण सोडून दिलात तर काय म्हणावें ! अहो, यांनीं आपल्या देशांत पाय शिरकाविण्या-साठींच इकडे येण्याचा सगळा खटाटोप केला आहे. दुसरें कांहीं नाहीं. ही वेळ आहे. हा आपल्या तडाख्यांत सांपडला आहे आतां आपण अगदीं-सुद्धां गय न करितां याला......

" छे. छे. छे. " अनंगपाळ एकदम म्हणतो: " जे माझ्या तोंडून शब्द गेले, ते गेले. शरणागताला मरण मी कधीं देणार नाहीं. शिकारीच्या निमित्तानें आलों असें तो म्हणतो, तर तेंच खरें धरून मी चालणार, आणखी त्याच्या केंसालाही धक्का कोणाला लावूं देणार नाहीं. म्लेंच्छराजा, जा. आतां या उपर तूं माझ्या किंवा कोणाच्या नजरेसमोर फार वेळ उभा राहूं नकोस. तूं म्लेंच्छराजा आहेस. हें बरोबर ताडलें आहे. आणखी म्हणूनच मी म्लेंच्छ भाषेंत बोलून सांगतों कीं आपला जीव बचावण्यासाठीं तूं इतकें खोटें बोलतोस, असें हे म्हणताहेत, तो तूं आतां आपल्या येथून लवकर जाण्यानें खरोखरच बचाव. मी तुझ्या जीवाला अपाय होऊं देत नाहीं जा. "

हे अनंगपाळाचे शब्द त्या म्लेंच्छराजाला अतिशय कर्णकटु लागले, त्याच्या जीवाला झोंबले असावे असें त्याच्या चर्येवरून स्पष्ट दिसलें. त्याचा हात तीन वेळां शस्त्रांकडे गेला, परंतु तीन वेळां तो त्यानें मागें ओढून धरला. धैर्यापेक्षां सारासार विचार केव्हां केव्हां जास्त उपयोगी असतो हें पक्कें जाणूनच त्यानें त्यावेळी आपला हात अशा प्रकारें आंखडता घेतला हे उघड आहे; परंतु त्याच्या त्या वेळच्या त्या मुद्रेवरून अगदीं स्पष्ट असें दिसलें कीं, तो फार फार संतापला होता.

राजा अनंगपाळानें या प्रकारानें सर्वांस मोडून काढून त्यास तेथून जाण्याची मुभा दिल्यावर तो मुकाट्यानें आपल्या माणसांस घेऊन तेथून चालता झाला.

# पुस्तक दुसरें.

[अशा रीतीनें विमला घरीं आली. पण ती अगदीं शरमून गेल्यामुळें कोठें बाहेर पडत नसे; इतकेंच नव्हे ती कोणाशींही न बोलतां सारा वेळ एकांतात घालवी. इकडे अनंगपाळानें पृथ्वीराजाला अभिषेक करून अरण्यांत जाण्याचा निश्चय केला व मुहूर्त ठरवून तदनुसार आमंत्रणपत्रें सर्वत्र पाठविलीं. या आमंत्रणपत्राप्रमाणें विजयपाळानेंहि जाण्याची तयारी चालविली. आपली बायको कांहीं येणार नाहीं, तेव्हा तिला न कळवितांच आपण मुलांसह जावें असा त्यानें बेत केला. पण हा बेत विमलेला न कळता रहाणें शक्य नव्हतें. तिच्या तो कानावर गेलाच. आणि पुनः तिच्या मत्सरानें पेट घेतला. आपल्या नवऱ्यानें काहीं त्या समारंभास जाऊं नये असें तिला वाटत होतें. तें शक्य नाहीं तेव्हां निदान जयचंदाला तरी आपण दिल्लीस येत नाहीं असा हट्ट धरण्यास सांगावें असा तिनें विचार केला. पण तिचा निरोप जाऊनही जयचंदानें तिच्याकडे येण्याचें नाकारलें, त्यामुळें तर तिला भारीच चीड आली. ज्या पोराकरितां आपण धडपडतों त्याला त्याची कांहींच पर्वा नाहीं याचें तिला दुःख वाटलें. आणि अघोरघंटाच्या आश्रमांतून आपण उगीच आलों असेंहि वाटलें. नव्हे पुनः जाण्याचाहि तिचा बेत होऊं लागला येथें कशाला रहावयाचें ! आपली कोणालाच पर्वा नाहीं, त्यापेक्षां चंडीमातेची सेवा करीत राहिलेलें काय वाईट असें तिला वाटूं लागलें. ]

## अंकुरोद्भव.

विमला तशा स्थितींत मोठ्या संकटांतून सुटून आपल्या नवऱ्याबरोबर परत आल्यापासून अत्यंत खिन्न झाली. तिला कृतकर्माचा पुरा पश्चात्ताप झाला. आपण आपल्या शहाणपणाच्या घमेंडींत करायला काय गेलों आणि झालें काय असें तिला राहून राहून वाटूं लागलें. आपण आतां कोणास तोंड दाखवूं नये, अशी तिची स्थिति झाली. तिच्या ...ानें किंवा बापानें तिला कठोर शब्द बोलून यत्किंचितही दुखविलें नाहीं.

तिला जी स्थिति—जी भयंकर स्थिति—प्राप्त झाली होती तीच तिला कृतकर्माब-द्दल शिक्षा पुरे असें त्या दोघांस वाटलें आणि तें अक्षरशः खरें होतें. तिच्या त्या पश्चात्तापानें दग्ध झालेल्या मनानें तिला जितकी शिक्षा केली, तिला तें मन जितके कठोर शब्द बोललें, तितकी शिक्षा कोणासही करितां आली नसती. तितके कठोर शब्द कोणाच्या मुखावाटे निघणें शक्य नव्हतें. राहून राहून मी जर त्या अविंधाच्या हातांत आपल्या पोरासह सांपडलें असतें तर माझी अवस्था काय झाली असती ? माझी सगळी महत्त्वाकांक्षा कोणी-कडे गेली असती हें तिच्या मनांत येई आणि हें मनांत आलें म्हणजे तिच्या अंगावर कांटा उभा राहून तिचें अंग थरथरां कांपूं लागे. ती आतां कोणाच्याहि दृष्टीस पडत नसे. कोणा दासीस सुद्धां आपल्या पुढें येऊं देत नसे. अगदीं अव-श्यक तेवढ्याच वेळेपुरती एखादी दासी तिच्याजवळ यावयाची. बाकी सगळा काळ ती अगदीं एकटी असावयाची आणि सगळा काळ मनांत विचार बर सांगितलेले. आपण केवढा आत्मघात करून घेत होतों. आपला नवरा आपल्यास सोडविण्यास वेळींच आला नसता तर आपली स्थिति—आपल्या मुलांसह—पुनः किती भयंकर झाली असती ! कित्येक दिवसपर्यंत तिनें आपल्या नेत्रांसमोर जयचंद्रास किंवा चामुंडास कोणासही आणूं नका म्हणून फारच सक्त ताकीद दिली होती. तिच्या नवऱ्यानें तिच्या म्हणण्याप्रमाणें अगदीं अक्षरशः वागत जा असा सगळ्यांना हुकूम दिला होता. जयचंद्राला आईचें फार वेड. परंतु विमलेनें स्वतः " त्याला घेऊन या " अशी आज्ञा करीपर्यंत त्याला तिकडे नेऊं नये अशी ताकीद होती. यामुळें जयचंद्रानें एखादे वेळीं आपल्याला आईकडे जावयाचें असा हट्ट घेतला तरी त्याची कशी तरी समजूत काढून वेळ मारून नेली जात असे.

अशाप्रकारें जवळ जवळ चार महिने गेले. एके दिवशीं राजा अनंगपा-ळाकडून असें पत्र आलें कीं, कुमार पृथ्वीराजाला आपल्या सिंहासनावर बस-वून आपण तपोवनांत राहण्यास जाण्याचा कृतनिश्चय करून मुहूर्तही ठर-विला आहे. त्या मूहूर्तावर कुमार पृथ्वीराजास सिंहासनारूढ करणार तरी त्या समारंभास आपण सर्व मंडळींनीं यावें अशी माझी फार इच्छा आहे. तें पत्र येतांच विजयपाळानें तर स्वतः जाण्याचा निश्चय ठरविलाच; परंतु आपली पत्नी आपल्याबरोबर येईल किंवा नाहीं, तिला या समारंभाबद्दल वार्ता तरी कळवावी किंवा नाहीं, याबद्दल त्यास मोठा विचार पडला. तिला कांहीं एक न कळवितां आपण आपल्या दोघां मुलांना घेऊन मुकाट्यानें जावें

त्याच्या मनानें घेतलें. आलेल्या बातमीनें तिला समाधान होईल कीं असमाधान होईल—कीं तिचा पूर्वीचा द्वेषाग्नि भडकेल—काय होईल कांहींच सांगणें शक्य नाहीं, असें त्याच्या मनानें घेतलें. तेव्हां तिच्या कानांवर ही वार्ताच जाऊं द्यावयाची नाही असें त्यानें ठरविलें. मुहूर्त जवळचा होता, यामुळें त्यानें अवधि लागूं दिला नाहीं, लागलीच आपला पूर्ण लवाजमा घेऊन हस्तिनापुरास जाण्याचा बेत कायम केला. सर्वांस आज्ञा झाल्या, कीं ताबडतोब हस्तिनापुरास जाण्याची तयारी करावयाची. विजयपाळानें आपल्याकडून असें ठरविलें कीं आपल्या पत्नीस पृथ्वीराजाच्या राज्यारोहणाच्या वार्तेचा गंधही लागूं द्यावयाचा नाही. परंतु तसें करणें त्याच्या स्वाधीनचें नव्हतें. याला पत्र आलें त्याप्रमाणें हस्तिनापुरच्या लोकांचीं आपल्या आप्तेष्टांस आणखी किती तरी पत्रें आलीं, कीं समारंभ फारच मोठा होणार आहे तेव्हां तो पाहण्यासाठीं आपण अवश्य यावें. झालें, मग काय सगळ्या गांवभर ती बातमी पसरली. अर्थातच सगळ्या गांवभर दासदासींच्या तोंडींसुद्धां ती बातमी झाली आणि विमलेची वेणीफणी वगैरे करण्याला जाणाऱ्या दासीनें—दासींच्या नित्य संवयीप्रमाणें तिला ती बातमी मोठ्या विस्तारानें सांगितली. विस्तार अर्थातच केवढा समारंभ होणार आहे आणि सगळ्या आर्यावर्तांतल्या राजांना कसें बोलावलें आहे याबद्दल होता. ही दासी रोज बडबड करायला लागायची, परंतु विमलेला नसत्या उठाठेवींचा पूर्ण कंटाळा आला असल्याकारणानें तिला तिचें बोलणें मुळींच ऐकावेंसें वाटत नसे. अर्थातच तिला ताबडतोब ती गप्प बसण्यास लावीत असे; परंतु आज तिनें आपल्या आजपर्यंतच्या सगळ्या वाईट वाटण्याबद्दल सूड उगविला. रोज जरी यांनीं आपल्याला अगदीं गप्प बसविलें तरी आज आपल्याला गप्प बसावयाचें तर लांबच, परंतु उलट अधिक अधिक प्रश्न विचारून बोल बोल म्हणून पाठीस लागतील अशी तिची खात्री, यामुळें तिनें त्यांच्यापुढें येण्याबरोबर आधीं “ बाईसाहेब, पृथ्वीराज एकदां हस्तिनापुरचा राजा झाला हो. आपल्या वडिलांनीं अगदीं आपल्या म्हणण्याप्रमाणें केलं. आपण जाणार आहां का समारंभाला ? माझ्या मावशीच्या नवऱ्याचं हस्तिनापुराहून पत्र आलं आहे त्यांत त्यानं लिहिलं आहे, कीं असा समारंभ कधीं कोणाला पाहण्याला सांपडायचा नाहीं; तर तुम्ही या. पण बाई, आपण जर गेलांत तर आह्मांला जायला सांपडणार, नाहीं तर कुठून जायला मिळेल ? बाईसाहेब, आपण चला. महाराज तर जाणार आहेत. आणखी धाकट्या महाराजांना सुद्धां नेणार आहेत. आपणही कराच बेत जायचा.

पृथ्वीराज तर आतां सार्वभौम झाला, आणखी आपले जयचंद महाराज त्यांचे मांडलिक ?......"

परंतु तितक्यांत विमलेनें तिला एकदम गप्प बसण्यास सांगितलें व ह्मटलें: " काय ह्मणतेस ? पृथ्वीराजाला हस्तिनापुरच्या सिंहासनावर बसवून टाकण्याचा समारंभ लवकरच होणार आहे ? आणखी इकडून जाण्याचा विचार झाला आहे. " हें तिनें इतक्या उद्वेगानें व कपाळाला आंठ्या घालून ह्मटलें, कीं तिच्या अंतःकरणाला किती तरी पीडा झाली असली पाहिजे हें अगदींच उघड दिसलें. नंतर तिनें एक दीर्घ उसासा टाकला. ती त्या दासीकडे क्रुद्ध दृष्टीनें पाहूं लागली. तेव्हां दासी थोडीशी घाबरल्यासारखी होऊन तिला म्हणते, " बाईसाहेब, माझ्या कानीं आलेली गोष्ट आपल्याला कळविल्याखेरीज माझ्यानें राहवेना म्हणून मी आपली बोललें. अनंगपाळ महाराजांनीं तरी कमलाबाईसाहेबांच्याच मुलाला सगळं राज्य काय म्हणून द्यावं ? आपल्या जयचंद्राजांनाच अर्धं राज्य दिलं असत तर काय झालं असतं ? पण महाराजांचं चित्तच सगळं तिकडे—पण मी हें आपल्याला काय सांगतें आहें ? मला काय करायचं आहे या उठाठेवी करून ! आपण मला नेहमीं बोलूं नको, बोलू नको म्हणून दाबीत असतां अन् मी आपली आलं मनांत नें बोलतच असतें. त्यांतून आज तर माझ्याच्यानं राहवेना. कसं राहवावं बरं ? माझ्याही मनाला जरा अंमळ हेंच वाटलं—"

ती दासी आतां याप्रमाणें एकसारखी बोलत असतांना विमलेचें चित्त मुळींच तिच्याकडे नव्हतें. ती आपली आपल्या मनाशींच कांहींतरी विचार करीत होती. विचार करतां करतां मध्येंच थांबली व म्हणते: " काय ग ? काय म्हणालीस ? तिकडे जाण्याची तयारी चालविली आहे. आणखी जयचंद्राला बरोबर नेण्याचा विचार आहे. कुठपर्यंत आली आहे तयारी?"

" तयारी काय ? " दासी त्वरित म्हणाली, " तयारी जारीनें चालू आहे, कारण बरोबर बराच लवाजमा घेण्याचा विचार आहे. हजार पांचशें माणूस तरी जाणार आहे. तेव्हां तयारी म्हणजे काय विचारतां ? पण बाईसाहेब आपणही चलायचा विचार करायचा. आपण जर गेलां तर आमच्यासारख्यांना हा समारंभ पाहण्याला सांपडेल, नाहींतर कशानं सांपडणार ? कधीं सांपडणार नाहीं. तेव्हां बाईसाहेब, आमच्या सगळ्या दा एवढी इच्छा पुरवाच. आह्मांला नुसतं कोण जाऊं देणार ! आप

गेलांत तर सहज आह्मा शंभर सवाशे जणींना जायला सांपडेल. मी स्वरंच सांगतें आमची सगळ्यांचा इच्छा आहे कीं आपण जावं. ”

“ बर बरें ” विमला त्रासून म्हणते, “ तुमच्या सगळ्यांच्या इच्छेप्रमाणं वागण्याचे दिवस आले कीं नाहीं मला, म्हणजे मी तसंच करीन बरं का ? पण आतां तू सध्यां इथून चालती हो कशी. आज माझी वेणीफणीसुद्धां करायची नाहीं जा. मला अगदीं स्वस्थ एकटीला बसूं दे. बाहेर उभी रहा दाराशीं आणखी कोणी आलं तर सांग म्हणावं आज कोणाची गांठ मी घेणार नाही. चल. चल. उठ ! तुला जायचं असलं तिकडे तर तूं जा. माझी कांहीं— कांहीं सुद्धां हरकत नाहीं. मी एक नतद्रष्ट हतभागी झालें म्हणून सगळ्यांना मी कशाला नकोन् हवं म्हणूं. माझ्याजवळ आतां मला कोणीसुद्धां नको. समजलांत जा. जितक्या म्हणून माझ्या व्यवस्थेला ठेवलेल्या असाल तितक्या सगळ्या जा. अगदींसुद्धां अनमान करूं नका. आतां सार्वभौम राजाचा राज्याभिषेकसमारंभ पाह्यला जा आणखी तिथेंच रहा. पुनः या मांडलिकाच्या राज्यांत कशाला येतां ! पण जा. थांबलीस कां ! तुला मी सांगितलं होतं ना कीं तूं अगदीं इथें थांबूं नकोस म्हणून ? चल उठ. जा उठ. अगदीं बसूं नकोस इथें. तुला समारंभ पहायला जायचं आहेना ? जा. काय मोठ्या सोपस्कारानं मला सांगायला आली आहे... ? ”

असें एकसारखें विमलेचें भाषण चाललें होतें. दासी बिचारी बावरली आणि गप्प बसली. विमला तिच्यावर जास्तीच चिडली आणि ह्मणते “ तुला मी सांगतें आहेंना चालती हो म्हणून ? मग आतां कां उभी राहिलीस ! चल नीघ. मला आतां घटका दोन घटका अगदीं एकटी बसूं दे. माझ्या अंगाचा नुसता भडका झाला आहे. माझ्या दृष्टीसमोरून नीघ. निघते आहेस का नाहीं ? नीघ. ”

इतकें झाल्यावर अर्थातच ती दासी बिचारी तेथून चालती झाली. तिला असें पक्कें वाटलें कीं आतां आपण कांहीं वेळ जर येथें अशाच बसलों तर आपली पक्की निश्चितीच व्हावयाची. विमला आज कित्येक दिवसांत अगदीं सुद्धां रागावलेली कोणाच्या नजरेस पडली नाहीं. फक्त आपल्याजवळ दुसरें कोणीं नसावें एवढ्या हेतूनें ती ज्यास त्यास आपल्यापासून दूर घालवीत असे. परंतु तिचा पूर्वद्वेष एकदम आज उद्रेकानें उभा राहिला.

या बहिणीनें शेवटीं आपल्या बापाला मोह घालून आपल्या पोरास त्या

पृथ्वीराजास हस्तिनापुरचें सिंहासन दिलें. जो हस्तिनापुरचे सिंहासनावर आरूढ झाला तो अर्थातच सार्वभौम झाला. हिनें कपटानें आपल्या पोराला सार्वभौम बनविलें. आपल्या आचरटपणामुळें आपल्यास इतके दिवस तोंड लपवून बसावें लागलें. त्या अवधींत हिनें आपलें कार्य साधलें, दुसरें कांहीं नाहीं, असें तिच्या मनानें घेतले आणि इतके दिवस आपण अशा बसलों ही मोठी चूक केली असें तिच्या मनानें घेतलें. या आजच्या विलक्षण बातमीनें तिचें डोकें अगदीं बिघडून गेलें. तिचें पूर्वस्वरूप तिला पुनः प्राप्त झालें. आपल्या पोराला कांहीं न देतां हस्तिनापुरचें सिंहासन त्या पोराच्या हातीं दिलें. त्याच्यावर आपल्या बापाचें प्रेम जास्ती याबद्दल तिला फार फार वैषम्य वाटलें. आणि एकदम तिच्या मनांत असेंही आलें कीं आपण उठून हस्तिनापुरास जाऊन त्याच्याशी भांडावे. परंतु लहर थोड्याच अवकाशात गेली. मध्यंतरीं जे कांहीं प्रकार झाले त्यामुळें तिला अर्जुन अज्ञातवासांत राहिल्याप्रमाणें रहावें लागलें. त्याचा उपयोग इतकाच झाला कीं तिचा स्वभाव किंचित् बदलला. वर सांगितलेली लहर फारच थोडा वेळ टिकली.

याप्रमाणें विमलेची चित्तवृत्ति विलक्षण झाल्यामुळें तिला आतां आपण काय करावें आणि काय नाहीं हें सुचेनासें झालें. तिच्या अंतर्यामीं तिचा द्वेषाग्नि—तो पूर्वीचा वैराग्नि— तर फार भडकला. इतका भडकला कीं तिला आजपर्यंत ज्या स्वतःच्या कृत्याबद्दल फार पश्चात्ताप झाला होता तें कृत्य सुद्धां आतां इतकें पश्चात्ताप करण्याजोगें असें वाटेनासें झालें. आपण इतके दिवस अशा बसलों नसतों तर हा दुर्धर प्रसंग आपणावर आला नसता. आपण आपल्या बापाशीं भांडून त्याला ही अन्यायाची गोष्ट करूं दिली नसती. आपल्या पोराला त्याच्या राज्याचा अर्धा, चतकोर कांहीं तरी भाग मिळवून घेतला असता. परंतु यःकश्चित गोष्टीकरितां आपण लाजून अशा बसलों आणि आज असा प्रसंग आपणावर आला. हा विचार सुद्धां तिच्या मनांत आला. स्त्रीचें मन जितकें केव्हां केव्हां चंचल तितकेंच तें अत्यंत निश्चयी असतें! जो काय परिणाम दृष्टीस पडेल, त्यावरून मग आपण असें केलें नसतें, तर बरें झालें असतें असें त्यांस वाटावयास लागतें, विमलेची स्थिति अशीच झाली. धौम्याश्रमांतून आल्यावेळापासून झालेला पश्चात्ताप अगदीं योग्य असें जिला आतांपर्यंत वाटत होतें, तिलाच आतां आपण अशा बसून राहिलों याचा फायदा आपल्या बहिणीनें घेतला, आपण सर्वस्वीं फसलो, मुकलों असें पूर्णपणें वाट पश्चात्ताप करीत बसल्याबद्दल पश्चाताप वाटूं लागला! इतकेंच नव्हे तर...

मनांत असें सुद्धां येऊं लागलें की आपण त्या समारंभाला जाऊन बापाच्या जवळ आपल्या मुलाला, आपल्या लाडक्या जयचंद्राला कांही तरी प्रांत द्या असें म्हणावें. " मुख्य सिंहासनच आपल्या मुलाला द्यावयाचें तें सोडून भलत्याच मुलाला तें देतां आहां तर आतां इलाज नाही. परंतु निदान बराचसा प्रांत आपल्या मुलाला द्या. " असें म्हणण्याला जाण्याला कोणच्याही तऱ्हेची हरकत नाहीं असें ती आपल्या मनाला पटवून तिकडे जाण्यासाठीं तयारी करूं लागली. परंतु हा विचार फार वेळ टिकणार कसा ? लागलीच तिच्या मनांत दुसरे विचार येऊं लागले. आजपर्यंत आपण अगदीं गुप्तपणें अज्ञातवासांत दिवस काढल्यामुळें आपली गोष्ट कोणी काढीत नाही. किंबहुना जग आपल्याला विसरून गेलेंच आहे असें म्हटलें तरी चालेल. परंतु आपण आतां अशा गेलों म्हणजे पुन: आपल्याबद्दलचे सर्व अपवाद जोरानें उठतील, आणि लोकनिंदेला एक प्रकारचा ऊत येईल, त्याला काय करावें ? जो तो आपल्याकडे बोटें करून फिदी फिदी हंसेल, कुजबुजेल. आपला त्याग केला नाहीं म्हणून आपल्या पतीचीहि निंदा करूं लागेल, याला काय करावें ? असा विचार लागलीच तिच्या मनांत उभा राहिला आतां आपण गेलों, तर आपल्याला आपल्या पोराचा कोणच्या तऱ्हेनें फायदा करणें तर कांही शक्य नाही, परंतु आपली नाचक्की मात्र होईल. तेव्हां आपण या समारंभाला जाण्याचा विचार सुद्धां मनांत आणूं नये. जर जयचंद्र आपला मुलगा आहे, तर तो आपल्या शिकवणीनें पृथ्वीराजाचा द्वेष करूं लागून क्षत्रियाला उचित असा पराक्रम करून पृथ्वीराजापासून हें साम्राज्य— हें हस्तिनापूरचें सिंहासन हिसकावून कां घेणार नाहीं ? आपण आज तेथें जाऊन बापाजवळ तोंड वेंगाडून आपल्या मुलाला कांही द्या असें म्हणण्यापेक्षां जर जयचंद्राचें मन या पृथ्वीराजाच्या विरुद्ध बनवून त्याला अन्यायानें दिलेलें राज्य त्याच्यापासून हिसकावून घेणें हेंच आपलें ब्रीद असें शिकविलें, आणि त्याप्रमाणें त्याचें मन तयार केलें, तर केवढें तरी काम होणार आहे !

हा विचार तिच्या मनांत उभा राहिल्याबरोबर तिचें मन एकदम प्रसन्न झाल्याप्रमाणें झालें. आपण जिवंत असतां आपल्या मुलाला कांहीं एक न देतां कमलेच्या पोराला मात्र स्वतःचें राज्य दिलें, याबद्दल आपण अत्यंत संतापलों आहों हें दाखविण्याचा उत्कृष्ट मार्ग म्हणजे आपण समारंभाला जाऊन भांडण करणें हा नव्हे. तर आपण तिकडे ढुंकूनही न पाहणें हाच तर तिच्या मनानें ठरविलेंच. परंतु आपल्या नवऱ्यानें जाऊं नये गं आपल्या मुलास तर त्यानें मुळींच नेऊं नये याला उपाय काय

करावा ? याच विचाराला आतां तिचे चित्त लागलें, परंतु तिकडूनही तिला कांही सुचेना. आपला नवरा आतां आपलें मुळींच ऐकायचा नाहीं. तो आपल्यास या बाबतींत आपला विचारसुद्धां विचारावयाचा नाहीं, हें तिला पक्कें समजून चुकलें होतें, तेव्हां आपण त्याला बोलावून आणून कांही सांगून मुळींच उपयोग होणार नाहीं, हें तिला उघड उघड दिसलेंच. परंतु तिच्या मनाची तळमळ कांहीं केल्या जाईना. निदान आपल्या जयचंदाला तरी त्यांनीं नेऊं नये असा शेवटी तिच्या मनाचा कृतनिश्चय झाला. आणि तिने ठरविले, की आपल्या पोराला बोलावून आणून त्याला " मी हस्तिनापुराला येत नाहीं " असा हट्ट करायला शिकवावयाचें.

विमलेने लागलीच आपल्या त्या आवडत्या पुत्राला बोलावून आणण्याबद्दल दासीस सांगितलें. त्याप्रमाणें त्या दासीनें जाऊन निरोप सांगून जयचंद येईपर्यंत चांगल्या दोन घटका लागल्या. इतक्या त्या अवधींत विमलेच्या मनाची चलबिचल किती तरी झाली. इतकी झाली की, जयचंदास तूं येऊं नको असा निरोप पुनः पाठवावा असें तिच्या मनात आलें आणि त्याकरितां तिनें पुन: दासीला बोलावलेंही. आपल्या पोराने तेथें जावें इतकेंच नाही तर आपण स्वत:ही जावें आणि आपल्या बापापाशी भांडून याला कांही तरी प्रांत द्या, हा तुमचा नातू नाही का ? असे म्हणून त्रागा करावा. आपण जर गेलों नाहीं तर आपल्याला कोणीच विचारणार नाही. आपल्या जाण्यानें व भांडण्यानें जो थोडासा तरी प्रांत आपल्याला मिळायचा तोसुद्धां आपण गेलों नाहीं, तर आपल्याला मिळणार नाहीं. असें आपण होऊन आपलें नुकसान काय म्हणून करून घेणार ? देतना त्या कारट्याला हस्तिनापूरचें सिंहासन दिलें तर ? हस्तिनापुराचें सिंहासन ज्याला मिळेल, तो सार्वभौम चक्रवर्ती असें आपण कबूलच केलं नाहीं म्हणजे झालें. पराक्रमानें जो सगळ्यांना पादाक्रांत करील तो खरा सार्वभौम. नुसत्या हस्तिनापुरच्या सिंहासनावर बसल्यानें काय म्हणून म्हणूं सार्वभौम. तें कांहीं नाही. आपला विचार झाला तोच कायम. आपण स्वत:च जावयाचें आणि आपल्या बेताप्रमाणें आपल्या बापाशीं भांडावयाचें. असा विचार ठरल्याबरोबर तिनें पुन: एका दासीला बोलावलें व सांगितलें कीं महाराजांना ( आपल्या पतीला ) जाऊन सांग कीं हस्तिनापुराला समारंभ पाहण्यासाठीं येण्याचा विचार ठरला आहे. तेव्हां माझीही तयारी करवावी.

त्या दासीस तो निरोप ऐकून फार आश्चर्य वाटलें. विमलाबाई

हस्तिनापुराला जातील ही कल्पनासुद्धां कधीं कोणाच्या मनांत आली नव्हती, आणखी त्या जेव्हां आपण होऊन असा निरोप सांगूं लागल्या, तेव्हां तिला नवल वाटणें किती साहजिक आहे ? आजपर्यंत त्यांनीं याउपर मी कमलेचें व तिच्या कारट्याचें मुखावलोकनसुद्धां करणार नाहीं, अशी प्रतिज्ञा किती वेळां तरी करून तिच्या उच्चारानें प्रत्येकाचे कान विटविले होते आणि आतां तर आपण कार्यप्रसंगीं जाण्याची तयारी करण्याबद्दल निरोप घेऊन जाण्यास सांगूं लागल्या, परंतु सांगितलेलें काम, त्याच्यासंबंधानें हूं कीं चूं न करितां, पार पाडण्यापलीकडे दासीच्या हातांत काय? तिनें लागलीच "होय बाईसाहेब" म्हणून विजयपाळाच्या महालाची वाट धरली.

विमलेच्या मनानें याप्रमाणें उलट खाल्ल्यावर किंचित् वेळ जातो न जातो तों पहिली दासी जी जयचंद्राला बोलावण्याला गेली होती ती परत येऊन तिनें उत्तर दिलें कीं, "लहान महाराज दिल्लीला जाण्याच्या तयारींत गुंग आहेत. ते म्हणतात मी येथून हलावयाचा नाहीं. मला महाराजांबरोबर हस्तिनापुराला जावयाचें आहे. मी त्यांच्या पुष्कळ विनवण्या केल्या कीं आपण असें करूं नका. आपण त्यांना भेटून त्याच पावलीं परत या. मी आपल्याला आणून पोंचवीन पण कांहीं नाहीं. त्यांचा तो हट्ट खरा. महाराणीसाहेबांनीं आपल्याला बोलावलं आहे त्यांचा शब्द मोडूं नका, असें मी पुष्कळ सांगितलें, पण त्यांचा आग्रह एक कीं मी महाराजांपासून दूर जावयाचा नाहीं, मी जर इकडे तिकडे गेलों, तर तर ते मला मुळींच बरोबर घेऊन जाणार नाहींत. तेव्हां मी कांहीं येत नाहीं."

आपल्या मुलानें आपल्याला असा निरोप पाठविला हें पाहून विमलेच्या मनाची काय स्थिति झाली असेल ती वर्णन करून सांगणें अगदीं दुरापास्त आहे. ज्या पोराच्या हिताकरितां आतांपर्यंत इतका आपला फजीतवाडा करून घेतला, त्या पोरानें आपल्याला अशा प्रकारचा निरोप पाठवावा मग आपल्या जगण्याची किंमत तरी काय ? त्यापेक्षां आपण आतां आपलें तोंड काळें करावें, आपल्या पोरास कोणी तरी हें अशा प्रकारानें शिकविलेलें खास. त्याला असें उत्तर देण्याचें आपोआप कधीं सुचावयाचें नाहीं. मग असें उत्तर द्यावें म्हणून शिकविणार कोण ? अर्थातच आपला नवरा. आपण अशा लज्जित होऊन स्वस्थ बसलों तेवढ्या वेळांत त्या पोराला गांठून ... मनांत माझ्याबद्दल वाईट भरून दिलें. ज्याच्याकरितां आपण ... तऱ्हेनें वागलों त्यालाच असें बोलण्याला तयार केलें, तेव्हां मनांतला

मुख्य हेतुच हा, की आपल्याविषयीं त्याचें मन बिघडावें. ठीक आहे. आतां पुनश्च त्या मुलाचेही तोंड पहाणें नको आणि कोणाचेंच नको असा तिच्या मनाचा निर्धार झाला. अर्थात् आतां हस्तिनापुरास जाण्याचा विचार रहित झाला. आतां आपण आपल्या जागेवरून हलावयाचें नाहीं. वेळ प्रसंग सांपडला तर पुनः आपल्या गुरूच्या शोधाकरितां जाऊन त्याच्या त्या पुण्याश्रमांत आपला आयुष्याचा बाकीचा काळ काढावयाचा. ज्याच्याकरितां आपण धांवून धांवून एवढा खटाटोप करावयाचा तोच आपल्याला भेटायलासुद्धां— बोलावणें पाठवूनसुद्धां— बोलायला तर येत नाही तर आतां आपले राहिलें काय ? आपण म्हणजे एक इकडून तिकडून इकडे तिकडे लोळवण्याचें पोतेरें झालों. कपालेश्वर आपल्यास आयताच त्या पुण्यारण्यांत राहून आपला कार्यभाग करून घेण्यास सांगत होता, परंतु आपण त्यांचें ऐकलें नाही, त्यालाच आपला शत्रु समजलों. तो फार निष्ठुरपणें बोलत होता ही गोष्ट खरी. परंतु निष्ठुरपणें काय सांगत होता तर देवी भवानीच्या सेवेला रहा एवढेंच ना ? तें त्याचें म्हणणें आपण ऐकलें नाहीं म्हणूनच देवी चंडिका संतापून आपली स्थिति तिनें अशी केली नाहींना ? त्याखेरीज अशी इतकी विलक्षण स्थिति आपली झाली नसती. याला आतां उत्तम उपाय म्हणजे आपण पूर्वींप्रमाणें तिकडे निघून जाणेंच होय. आतांपर्यंत आपल्याला आपल्या पोराचा तरी पाश होता. परंतु आतां तोही राहिला नाहीं. आपण बोलावलें असतां त्यानें आपल्यास "येत नाहीं" असा निरोप पाठवावा. अशी स्थिति झाल्यावर आणखी विलक्षण अनिष्ट स्थिति ती काय व्हायची ? आतां आपण आपला विचार करून पुनः कोणी अपमान करूंच नये अशी स्थिति करून टाकावी म्हणजे झालें. दासींच्याकडून मला जयचंद्रानें असा अपमानकारक निरोप पाठवावा म्हणजे काय ? हें कांहीं कोणाच्या तरी शिकवणीवांचून झालें नाही. आणि शिकवणी म्हणजे दुसऱ्या कोणाची असणार, आपल्या पोराकडून आपल्या पत्नीचा अपमान करविण्यापर्यंत पाळी आली, मग आपण रहाणें म्हणजे एखादे दिवशीं सगळ्या चाकरनौकरांच्या देखत आपला अपमान करून घेण्यासारखेंच आहे.

झालें, असे वेडेवांकडे विचार मनांत घेऊन तिनें मनाचा निश्चय केला कीं आपण आतां येथें राहूं नये. आपण चालतें व्हावें.

त्याप्रमाणें तिनें केलें कीं आणखी कांहीं केलें हें पुढें पाहूं.

---